# दैनंदिन जीवनात श्री ज्ञानेश्वरी

प्रा. दत्तात्रय ना. दुभाषी



## निवडक ३६५ ओव्यांचा भावार्थ (खंड १ व २)

ॐ

# दैनंदिन जीवनात श्री ज्ञानेश्वरी

निवडक ३६५ ओव्यांचा भावार्थ

(खंड १ व २)

प्रा. द. ना. दुभाषी




केशव भिकाजी ढवळे, गिरगाव, मुंबई - ४

किंमत १५० रुपये

ॐ

**लेखक** - प्रा. द. ना. दुभाषी

**प्रकाशन क्रमांक** - ११६६

**मुखपृष्ठ** : श्री. विजय खापरे

**प्रथम आवृत्ती** : जून २००५
**दुसरी आवृत्ती** : महाशिवरात्र, फेब्रुवारी २००७
**सुधारित तिसरी आवृत्ती** : फेब्रुवारी २००८

**मुद्रित शोधन** : श्री. ज्ञानेश्वर भालेकर

**अक्षर जुळणी** :
ओंकार कॉम्प्युटर्स,
बी-३०, अपर्णा हौसिंग सोसायटी,
पं. दीनदयाळ मार्ग,
डोंबिवली (पश्चिम) दूरध्वनी : २४८ ७१ ५७

**मुद्रक** :
आंजनेय धनंजय ढवळे
समर्थ मुद्रणालय,
१३२, प्रगती इंडस्ट्रीयल इस्टेट,
ना. म. जोशी मार्ग,
लोअर परळ, मुंबई - ४०० ०११

**प्रकाशक** :
ज्योती धनंजय ढवळे
केशव भिकाजी ढवळे
श्री समर्थ सदन, पहिली भटवाडी,
गिरगाव, मुंबई - ४०० ००४

ॐ

# ।। आशीर्वाद ।।

**प. पू. श्री. अदृश्य काडसिद्धेश्वर स्वामीजी**
**सिद्धगिरी मठ, कणेरी**

ॐ

## प्रस्तावना

'गीता धर्मा'चे व्यापक तत्त्वरूप विशद करून सांगणारा 'ज्ञानेश्वरी' हा श्रेष्ठ ग्रंथ आहे. विश्वात्मक देवाला संतुष्ट करण्यासाठी विश्वात्मक झालेल्या ज्ञानदेवासारख्या महापुरुषाने विश्वकरुणेने केलेले हे धर्मकीर्तन आहे... त्यातील प्रतिपादन समस्त मानवजातीच्या कल्याणासाठी असल्याने गेली सात-आठ शतके या ग्रंथाचा अभ्यास केला जात आहे व यापुढील काळातही तो तितक्याच निष्ठेने सदैव होत राहील यात तिळमात्र अतिशयोक्ती नाही.

**आणि ग्रंथोपजीविये । विशेषीं लोकी इये ।**
**दृष्टादृष्टविजये । होआवे जी ।।**

हे ज्ञानदेवांनी पसायदानातच मागणे मागून त्यावर सद्गुरू निवृत्तिनाथांचा अनुकूल आशीर्वाद घेतला आहे. 'दैनंदिन जीवनात श्री ज्ञानेश्वरी' या प्रा. द. ना. दुभाषी यांच्या अभ्यासपूर्ण लेखनात ज्ञानदेवांचे हे मुख्य सूत्र कौशल्याने पाळले आहे. प्रत्येक अध्यायामध्ये कोणत्या ओव्यांना प्राधान्य द्यायचे? त्यातील तत्त्वज्ञान कसे समजावून घ्यायचे? ज्ञानदेवांना या ओव्यांमधून नेमके कोणते प्रतिपादन करायचे आहे? याचा सुंदर समन्वय प्रा. दुभाषी यांनी साधला आहे.

सामान्य माणसाचे ज्ञानेश्वरीद्वारा प्रबोधन ही दुभाषी यांची भूमिका आहे. निवडलेल्या ओव्यांचे ते ओघवत्या वाणीने प्रतिपादन करतात. संवेदनाक्षम मनाने रसग्रहण करतात आणि समरस होऊन चिंतन-मनन करीत करीत उद्‌बोधक विचारवैभव सांगत जातात. हा केवळ ज्ञानेश्वरीतील ओव्यांचा अनुवाद नाही. मूळ पदांची व प्रमेयांची साथसंगत न सोडता हे केलेले हृदयंगम विवेचन आहे. ज्ञानदेवच सांगतात -

**म्हणोनि मने काने वाचा । जो सेवकु होईल इयेचा ।**
**तो स्वानंद साम्राज्यीचा । चक्रवर्ती करी ।।**

ही ज्ञानेश्वरीची खरी 'फलश्रुती' आहे. ती सामान्यातील सामान्य वाचकाच्या पदरी सहजासहजी पडावी यासाठी केलेला हा एक प्रांजळ तसाच यशस्वी प्रयत्न आहे.

'ईश्वरनिष्ठ' होऊन जो कोणी ज्ञानेश्वरीच्या आशय सागरात शिरू पाहील त्या प्रत्येकाला निर्मळ, निष्कलंक अशा चैतन्यतत्त्वाचे दर्शन निश्चित होईल. स्वधर्म सूर्याचा उदय त्याच्या अंतर्यामी होऊन, सत्त्वगुणांच्या तेजस्वी प्रकाशाने त्याचे समग्र जीवन दीप्तिमान होऊन जाईल हे सांगण्या-शिकविण्याचा प्रा. दुभाषी यांचा उत्तम प्रयत्न आहे. मनःपरिवर्तन होऊन लौकिक आणि आध्यात्मिक दोन्ही पातळ्यांवर यशस्वी व्हायचे आहे. त्यासाठी गीता-ज्ञानेश्वरीचाच अभ्यास आवश्यक आहे. गीता-ज्ञानेश्वरीतील तत्त्वज्ञान हे नित्यनूतन आहे. ज्ञानदेवांच्या अंतरीचे गूज आपल्याला कळले पाहिजे, या तीव्र ओढीने जे कोणी हा ग्रंथ वाचतील व तसे जीवन जगण्याचा प्रयत्न करतील त्यांच्या जीवनात त्यांना धन्यता, कृतार्थता यांचा लाभ होईल, हे प्रा. दुभाषी यांना पटवून द्यायचे आहे. सामान्य माणसाच्या जीवनाला पोषक, उद्‌बोधक असे मार्गदर्शन या ग्रंथामधून पानोपानी झाले आहे.

ॐ

प्रा. द. ना. दुभाषी हे विद्यार्थिदशेपासून प्रभावी वक्ते, अभ्यासू समीक्षक, नाट्यप्रेमी रसिक आणि वृत्तपत्रकार म्हणून नावाजलेले होते. प्राध्यापक म्हणून शिक्षण क्षेत्रात आल्यानंतर त्यांच्या अध्ययन अध्यापनाला आणखी व्यापकता आणि सखोलता प्राप्त झाली. उपनिषदे, गीता, ज्ञानेश्वरी, तुकाराम गाथा यासारख्या शाश्वत मूल्ये सांगणाऱ्या ग्रंथांशी त्यांनी अंतरंग नाते जोडले. प्रा. दुभाषी यांचे चिंतनविश्व या ग्रंथांनी व्यापून गेले आहे. त्यांनी जो विचार-सिद्धांताचा शोध घेतला तो जिवंत, रसरशीत शब्दांत साहित्यरूपाने या ग्रंथात साकार झाला आहे!

'मी विश्वेसी विश्वात्मा' किंवा 'सर्व भूतांसी अभिन्नू' हे भगवंताचे सांगणे सर्व अध्यात्माचे मूळ सत्य स्वरूप आहे. ते पटण्यासाठी व अनुभवण्यासाठी अशा ग्रंथांचा, विवेचनाचा निश्चित उपयोग होतो. प्रा. दुभाषी यांच्या या ग्रंथाचे मी हार्दिक स्वागत करतो. त्यांना धन्यवाद देतो!

**– स्वामी प्रज्ञानंद (तथा प्रा. म. अ. कुलकर्णी)**
फोन - २६५२०२५ कोल्हापूर
अध्यक्ष,
स्वरुपानंद सेवा मंडळ, पावस

ॐ

## मनोगत

'दैनंदिन जीवनात श्री ज्ञानेश्वरी - निवडक ३६५ ओव्यांचा भावार्थ' या नव्या पुस्तकाचा पहिला खंड (२५० ओव्यांचा भावार्थ) वाचकांच्या हाती देताना खूप आनंद होतो आहे. श्री ज्ञानेश्वरी हा ग्रंथ म्हणजे महाराष्ट्राचा सांस्कृतिक, आध्यात्मिक ठेवा आहे. मराठी माणसाचा श्वास आहे. म्हणूनच संत नामदेव महाराज म्हणतात,

**नामा म्हणे ग्रंथ श्रेष्ठ ज्ञानदेवी ।**
**एक तरी ओवी अनुभवावी ।।**

केवळ याच हेतूने ही ग्रंथनिर्मिती केली आहे. आजच्या धावपळीच्या, संघर्षाच्या व गतिमान आयुष्यात माणसाला मनात असूनसुद्धा वाचन, मनन, चिंतन करता येत नाही. फास्ट फूड, फास्ट मनी याबरोबर फास्ट डेथ हा आजच्या जीवनाचा मंत्र झाला आहे. त्यामुळे ज्ञानेश्वरीच्या नऊ हजार ओव्या वाचायला वेळ कसा आणणार? म्हणून निदान ३६५ ओव्यांचा भावार्थ, अन्वयार्थ देऊन प्रत्येक ओवी सोप्यात सोप्या भाषेत समजावून सांगण्याचा प्रयत्न केला आहे. या ओव्यांतून संपूर्ण ज्ञानेश्वरीचे सारच देण्याचा प्रयास मी केला आहे.

गेली १५ वर्षे संतसाहित्यावर चिंतन, मनन, लेखन होत आहे. सतत प्रवचने, व्याख्याने या माध्यमांतून लोकसंग्रह वाढतो आहे. खूप सुशिक्षित पदवीधर मधूनमधून भेटतात व गोड तक्रार करतात, 'ज्ञानेश्वरी आम्हांला मनापासून वाचावयाची आहे, पण ती ७०० वर्षांपूर्वीची, त्या वेळची मराठी भाषा समजत नाही. शब्दांचा अन्वयार्थ देऊन आम्हाला समजावून सांगितलीत तर बरे होईल.' मला ज्ञानेश्वरीच्या वाचनातून जो बोध व अतीव आनंद झाला तो या लेखनाच्याही स्वरूपात वाटावा या हेतूने हा प्रपंच केला. श्री ज्ञानेश्वरी नित्य नूतन आहे. रोज वाचत असताना नवे नवे अर्थ, संदर्भ लक्षात यायला लागतात. त्यामुळे ज्ञानेश्वरी पूर्णार्थाने आकलन झाली असे कधी होतच नाही. अमृताचा एक थेंब व अमृताचा कुंभ या दोन्हींचे फळ एकच असते. त्यामुळे श्री माऊलींनी जगाला दिलेल्या या अमृतकुंभातील काही थेंब येथे या पुस्तकाच्या रूपाने प्रसिद्ध होत आहेत.

प. पू. अदृश्य काडसिद्धेश्वर स्वामीजी यांच्याच प्रेरणेने व आशीर्वादाने हा योग घडून येत आहे. सिद्धगिरी मठातर्फे हे माझे नववे पुस्तक प्रकाशित होत आहे. गेल्या सहा महिन्यांत 'सर्वांसाठी गीता - एक जीवनग्रंथ' याचे पाच खंड व तीन उपनिषदे प्रकाशित झाली आहेत. वाचकांचा प्रतिसाद उत्साह वाढवितो आहे. या नव्या ग्रंथाचेही असेच स्वागत व्हावे, ही इच्छा व्यक्त करतो.

या ग्रंथलेखनासाठी माझे मित्र प्रा. बाळकृष्ण चौगले यांनी दिलेल्या प्रोत्साहनाबद्दल मी कृतज्ञ आहे. छपाईसाठी अहोरात्र मेहनत करणाऱ्या सर्वांचा मी ऋणी आहे. श्री ज्ञानेश्वरीवर अधिकारवाणीने बोलणारे प्रा. म. अ. कुलकर्णी तथा स्वामी प्रज्ञानंद यांची प्रस्तावना, हा मला मिळालेला प्रसाद आहे असे मी समजतो. त्यामुळे उगाचच औपचारिक आभार मानत नाही.

**तरी न्यून तें पुरते । अधिक ते सरते ।**
**करुनि घेयावे हे तुमते । विनवितु असे ।।** (१.८०)

ॐ

''तरी उणे असेल ते पुरे करून घ्यावे आणि जास्त असेल ते सोडून द्यावे, अशी माझी आपणास विनंती आहे.''

श्री ज्ञानेश्वरमाऊलींच्या कृपेनेच हे माझ्या हातून घडले. त्यांच्या कृपेचा वर्षाव सर्वांवर आहेच पण तो ज्ञात व्हावा, ही प्रार्थना करून मी माझे मनोगत पूर्ण करतो.

**– प्रा. द. ना. दुभाषी**

'हरि-प्रसाद' ९०५/१३अ, प्लॉट नं.३,
सरदार पार्क, देवकर पाणंद, कोल्हापूर - ४१६ ०१२
फोन : ५६१२३८१ मो. - ९८२२५१८२४८

### तिसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना...

'दैनंदिन जीवनात श्री ज्ञानेश्वरी' या ग्रंथाची जून २००५ साली पहिली आवृत्ती, दुसरी आवृत्ती फेब्रुवारी २००६ व तिसरी आवृत्ती ७ फेब्रुवारी २००८ साली प्रकाशित होत आहे. वाचकांनी, साधकांनी व ज्ञानेश्वरप्रेमी मंडळींनी या दोन्ही खंडांचे भरभरून स्वागत केले.

सिद्धगिरी गुरुकुल फाऊंडेशन, कणेरी, कोल्हापूर व प. पू. अदृश्य काडसिद्धेश्वर स्वामीजींच्या आशीर्वादाने माझी एकूण बारा पुस्तके प्रकाशित झाली. प. पू. स्वामीजींची प्रेरणा व त्यांचे कौतुक यामुळेच हे कार्य माझ्या हातून घडले. त्यांच्याच आशीर्वादामुळे मठाचे कार्य हेच माझे आता जीवीतकार्य झाले आहे.

ब्रह्मलीन जगद्गुरु काडसिद्धेश्वर महाराजांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने ही पुस्तके प्रसिद्ध झाली. पुस्तके छापून प्रसिद्ध करणे हा काही मठाचा नित्याचा व्यवसाय किंवा कार्य नाही. म्हणून जेव्हा पुढील आवृत्ती काढण्याचा योग आला तेव्हा प. पू. स्वामीजींनी अन्य प्रकाशकांकडून ते प्रकाशित करण्यासाठी उदार अंतःकरणाने परवानगी दिली याबद्दल मी स्वामीजींचे आभार मानतो.

'आध्यात्मिक ग्रंथ संपदा' प्रकाशित करण्यात सदैव अग्रेसर असलेल्या, महाराष्ट्रातील ख्यातनाम अशा 'केशव भिकाजी ढवळे' या प्रकाशन संस्थेमार्फत ही तिसरी आवृत्ती प्रकाशित होत आहे. पूर्वीच्या दोन खंडांऐवजी एकाच ग्रंथाच्या स्वरुपात हे प्रकाशित होत असल्यामुळे यात वाचकांची सोय होणार आहे हे निश्चित. नव्या स्वरुपात येणाऱ्या या ग्रंथाचेसुद्धा पूर्वीसारखेच स्वागत होईल याबद्दल मला तिळमात्र शंका नाही.

श्री ज्ञानेश्वरमाऊलींच्या कृपेनेच हे कार्य माझ्या हातून घडले आहे. ज्ञानेश्वरीचे समर्थ विचार साध्या, सामान्य माणसाला सहज समजावेत म्हणून केलेला हा अट्टाहास आहे. दैनंदिन जीवनात श्री ज्ञानेश्वरीचे विचार जर आचरणात असतील तर प्रपंच तरी सुखाचा होतोच पण परमार्थसुद्धा गोड व फलप्राप्त करून देणारा होतो. अशी नित्य-नूतन असलेली श्री ज्ञानेश्वरी ही अधिकात अधिक लोकांच्या हातात पडावी व त्यांचे जीवन कृतार्थ व आनंदी व्हावे ही माऊलींच्या चरणी प्रार्थना...

पुन्हा एकदा 'केशव भिकाजी ढवळे' प्रकाशन संस्थेच्या प्रमुख आदरणीय ज्योती धनंजय ढवळे व अदृश्य काडसिद्धेश्वर स्वामीजी, कणेरी मठ यांचे अंतःकरणपूर्वक आभार मानून हे मनोगत पूर्ण करतो.

**– प्रा. द. ना. दुभाषी**

ॐ

# अनुक्रमणिका



ॐ

## ।। श्री ज्ञानेश्वरी माहात्म्य ।।

२१व्या शतकातील आपले सर्वांचे जीवन गतिमान, संघर्षमय, धावपळीचे झाले आहे. कॉम्प्युटर, टी.व्ही., फास्ट फूड, शॉर्ट कट् या परवलीच्या शब्दांनी जीवन व्याप्त झाले आहे. अनेक समस्यांनी घेरलेल्या मनुष्याच्या जीवनात वेळेअभावी अनेक चांगल्या गोष्टींना मुकावे लागत आहे. मनात असूनसुद्धा वाचन, चिंतन, मनन याला वेळ मिळत नाही. ही सार्वत्रिक तक्रार आहे. सुखाचा शोध व बोध करून देणारे अमृततुल्य आध्यात्मिक ग्रंथ, संतसाहित्य वाचकाची वाट पाहताहेत.

९००० ओव्यांची श्री ज्ञानेश्वरी म्हणजे अमृताचा कुंभ! रत्नांची खाण!! सोनियाच्या राशी... जीवन समृद्ध, सार्थकी, सुखी करू शकणाऱ्या या ग्रंथातील जीवन-तत्त्वज्ञान आत्मसात करायला आपल्याला पुरेसा वेळ नाही. नेमकी ही समस्या जाणून ७०० वर्षांपूर्वी स्वतः श्री ज्ञानेश्वरांनी तुम्हाआम्हा सर्वांना कळकळीची विनंती केली. ज्ञानेश्वरांचे द्रष्टेपण या ओवीत प्रकर्षाने जाणवते. ते म्हणतात -

**तरी अवधान एकवेळें दीजे । मग सर्व सुखासि पात्र होईजे ।**
**हें प्रतिज्ञोत्तर माझें । उघड ऐका ।। (अध्याय ९, ओवी १)**

**अर्थ -** अहो, श्रोते हो, तर तुम्ही एक वेळ (माझ्या बोलण्याकडे लक्ष द्या. म्हणजे मग सर्व सुखाला प्राप्त व्हाल. हे माझे उघड प्रतिज्ञेचे बोलणे ऐका.

संतशिरोमणी ज्ञानदेवांना हे प्रतिज्ञेवर सांगावे लागले.

सुखाचा राजमार्ग सांगणाऱ्या ज्ञानेश्वरीकडे एक वेळ तरी पाहावे... जीवनात यातील एक तरी ओवी अनुभवावी व जीवन शांत, तृप्त, निर्भय, आनंदी करून घ्यावे म्हणून हा लेखनप्रपंच.

ज्ञानेश्वरीवरील हे भाष्य नव्हे. तो माझा अधिकार नाही. नित्य-नूतन असणाऱ्या ज्ञानेश्वरीवर रोज काही ना काही लिहिले जाते आहे. शेकडो ग्रंथ लिहून अनेकांनी यावर पीएच.डी. घेतल्या. अनेक संत-महात्म्यांनी यावर आपले विचार मांडले. वारकरी पंथाचा प्रमाणग्रंथ असणाऱ्या या ग्रंथाची असंख्य पारायणे महाराष्ट्राच्या गावागावांतून होत असतात. पण शहरी माणसालासुद्धा आजकाल ज्ञानेश्वरीने मुग्ध केले आहे. शिकल्यासवरल्या पदवीधर माणसांची मात्र एक तक्रार असते. 'अहो, ती ७०० वर्षांपूर्वीची जुनी मराठी भाषा. प्रयत्न करूनसुद्धा आम्हाला ज्ञानेश्वरी नीट समजत नाही.' या पुस्तकात ज्ञानेश्वरीतील सारभूत असणाऱ्या अशा निवडक ३६५ ओव्यांचा अर्थ, स्पष्टीकरण करण्याचा मानस आहे. ह्या ओव्या नित्यपठणाच्या, चिंतनाच्या व अनुकरणाच्या आहेत.

यासाठी ज्ञानेश्वरीची पूर्वपीठिका आपण समजून घेऊ. श्री ज्ञानेश्वरी हा भगवद्गीतेच्या ७०० श्लोकांचा भावार्थ आहे. गीतेवरील ते भाष्य आहे. ती गीता टीका आहे. पण याहूनही ती अधिक काही आहे. ज्ञानदेव यावर म्हणतात की, मी हे गीतेवर देशीकार लेणे चढविले आहे. 'गीता अलंकार नामे ज्ञानेश्वरी-' असेच संत नामदेवही म्हणतात. गीता ही भगवान श्रीकृष्णांची वाङ्मयीन मूर्ती जशी आहे तशी ज्ञानेश्वरी ही श्री ज्ञानदेवांची मूर्तीच आहे. साहित्य सोनियांचे अलंकार चढवून श्री ज्ञानदेवांनी ती मंडित केली आहे. ज्ञानेश्वरीत तत्त्वज्ञान ओतप्रोत भरले आहे पण ते दृष्टान्तादि अलंकारांनी सुबोध, सोपे केलेले असून शिवाय त्यात काव्यमयता, माधुर्य आणले आहे. ती इतकी रसाळ, सुंदर, अवीट गोडीची झाली आहे की, मूळ गीता व तिच्यावरील ही ज्ञानेश्वरी या दोहोंत कोणी कोणास शोभा आणली, 'येथ अलंकारिले कवण कवणे' असा प्रश्न वाचकांच्या मनात येतो.

ॐ

स्वतः ज्ञानेश्वर अलौकिक साक्षात्कारी संत होते. त्यामुळे त्यांनी गीतेकडे साक्षात्काराच्या दृष्टिकोनातून पाहिले. भगवद्‌गीता हे त्यांच्या मताने, 'संसारजिणते शास्त्र' आहे. म्हणजे संसार जिंकून मोक्षाचा, आत्मप्राप्तीचा मार्ग मोकळा करून देणारे शास्त्र आहे. श्री ज्ञानेश्वर गीतेचा तात्पर्यार्थ त्याच दृष्टीने करतात. याविषयी गुरुदेव रानडे यांचे उद्‌गार उद्धृत करण्यासारखे आहेत. ते म्हणतात,

"ज्ञानेश्वरांनी केलेला गीतेचा तात्पर्यार्थ पूर्णपणे साक्षात्कारपर आहे. तो एका दृष्टीने आचार्यांच्या वेदान्तपर अर्थाच्या पलीकडचा, वरचा आहे. ज्ञानेश्वर हे महाराष्ट्रातील केवळ संतश्रेष्ठच होते असे नव्हे, तर ते गीतेवरील एक श्रेष्ठ भाष्यकारही होते. त्यांच्या ठिकाणी तत्त्वज्ञान, काव्य व आत्मानुभूती यांचा एक अद्‌भुत त्रिवेणी संगम झाला होता व हेच त्यांच्या भाष्याचे महनीय वैशिष्ट्य होय. त्यांचे तत्त्वज्ञान निःसंशय उच्च दर्जाचे आहे. पण त्यांची काव्यप्रतिभा यापेक्षाही श्रेष्ठ आहे. तत्त्वज्ञानाचे मर्म सांगणारी त्यांची सखोल बुद्धी व काव्याची प्रतिभा यांना आत्मानुभूतीच्या वैभवाची जोड मिळाली, असा अद्‌भुत त्रिवेणी संगम झाल्यामुळे त्यांच्या गीतेवरील भाष्याला परमश्रेष्ठ स्थान मिळाले." (भगवद्‌गीता; साक्षात्कारदर्शन, मराठी अनुवाद पृष्ठ ४९)

ज्ञानेश्वरांनी आपल्या अलौकिक प्रतिभेने सारे गीताविश्व व्यापून टाकले आहे. तशी त्यांची प्रतिज्ञाच होती.

**तैसा वाग्विलास विस्तारूं । गीतार्थेसीं विश्व भरूं ।**
**आनंदाचें आवारू । मांडूं जगा ।।' (अध्याय १३, ओवी ११५९)**

**अर्थ** - वाणीच्या विलासाचा विस्तार करू व गीतार्थाने विश्व भरून टाकू व सगळ्या जगाला आनंदाचा कोट करू.

तत्त्वज्ञानाच्या आनंदाचे कण पेरून सुखाचे अमाप पीक निर्माण करण्याची त्यांची प्रतिज्ञा होती.

**दिसो परतत्त्व डोळां । पाहो सुखाचा सोहळा ।**
**रिघो महाबोधसुकाळा । माजीं विश्व ।। (अध्याय १३, ओवी ११६१)**

**अर्थ** - परब्रह्म सर्वांच्या डोळ्यांना दिसो. सुखाचा उत्सव उदयास येवो व सर्व जग ब्रह्मज्ञानाच्या विपुलतेत प्रवेश करो.

ही त्यांची वैश्विक इच्छा, धारणा होती. हा आत्मविश्वास त्यांनी पुनःपुन्हा व्यक्त केला आहे.

**येणे कारणे मी बोलेन । बोली अरुपाचे रूप दावीन ।**
**अतींद्रिय परि भोगवीन । इंद्रियाकरवीं ।।**

**अर्थ** - याच कारणासाठी मी बोलेन, अरूप, निर्गुण, निराकार, अतींद्रिय परमात्म्याचा साक्षात्कार जड इंद्रियांमार्फत मी करून देईन.

केवढी ही तळमळ व किती प्रचंड आत्मविश्वास त्यांनी इथे व्यक्त केला आहे व हे करण्यासाठी मी माझ्या मराठी भाषेचाच वापर करेन असा दिलासा या भाषाप्रभूने व्यक्त केला.

**माझा मऱ्हाटाची बोलु कौतुके । परि अमृतातेंहि पैजा जिंके ।**
**ऐसी अक्षरें रसिकें । मेळवीन ।।**

ज्ञानेश्वरांनी वाक्‌सृष्टी निर्माण केली व अंगी वाक्‌चातुर्य असल्यामुळे ती सृष्टी काव्यमयही झाली. म्हणून ज्ञानेश्वरीला वागीश्वरीही म्हटले गेले.

संपूर्ण ज्ञानेश्वरी हे ज्ञानेश्वरमाऊलींनी केलेले धर्मकीर्तन आहे. उपसंहारात हा भाव व्यक्त करताना ते म्हणतात,

**किंबहुना तुमचें केलें । धर्मकीर्तन हें सिद्धी गेलें ।**
**येथ माझें जी उरलें । पाईकपण ।। (अध्याय १८, ओवी १७९२)**



ॐ

**अर्थ** - महाराज फार काय सांगावे! तुमच्या कृपेने केलेले हे धर्माचे व्याख्यान तडीस गेले. या ठिकाणी माझा काय तो सेवकपणाच उरला.

एवढे सांगून मगच त्यांनी 'पसायदान' या विश्वप्रार्थनेची मागणी केली. संतांच्या कृपेने हे धर्मकीर्तन सिद्धीस गेले, असे धन्यतेचे व कृतार्थतेचे उद्‌गार त्यांनी काढले आहेत. विश्वात्मक देवापाशी पसायदान मागताना 'विश्व स्वधर्मसूर्ये पाहो ।' अशी त्यांनी प्रार्थना केली आहे. भोवतालच्या सामाजिक जीवनात त्यांना खऱ्या धर्माचे विश्वव्यापी स्वरूप कुठेच दिसले नाही. म्हणून त्यांनी विश्वबंधुत्वावर आधारलेल्या मानवधर्माची मांडणी ज्ञानेश्वरीत केली आहे.

**मार्गी अंधासरिसा । पुढा देखणाही चाले जैसा ।**
**अज्ञाना प्रगटावा धर्मु तैसा । आचरोनी ।। (अध्याय ३, ओवी १५६)**

**अर्थ** - रस्त्याने आंधळ्याच्या बरोबर पुढे चालणारा डोळस मनुष्य आंधळ्यास सांभाळून घेऊन, त्याच्या बरोबर चालतो, त्याप्रमाणे अज्ञानी पुरुषाला ज्ञानी पुरुषाने आपण आचरण करून धर्म स्पष्ट करून दाखवावा.

अशा धार्मिक प्रबोधनाची आज नितांत आवश्यकता आहे. धर्माच्या विकृत स्वरूपाने, अनिष्ट परंपरेच्या विळख्यात आजचा समाज पुरता अडकला आहे. शुद्ध, सर्वांचे सर्वपरीने कल्याण साधणाऱ्या व दैवीगुण संपन्न अशा विश्वधर्माची या २१व्या शतकाला खरी गरज आहे. 'यतोऽभ्युदयनिःश्रेयससिद्धिः सः धर्मः ।' ज्यामुळे मोक्ष व सार्थक जीवन यांची प्राप्ती होईल तो धर्म होय. बाह्यकर्मापेक्षा अंतःशुद्धी हा प्रमुख भाग त्यात आहे. त्यासाठी अंतर्निष्ठ होऊन 'पाहावे आपणासी आपण' या साधनेने चित्तशुद्धी साधावी. अशा चित्तशुद्धीने आत्मज्ञानाचा मार्ग सुलभ होतो. अशा व्यापक, सर्वंकष, उत्कट, कल्याणप्रद धर्मभावनेचे विवरण ज्ञानेश्वरांनी केले आहे.

परमार्थसिद्धी ही काही मोजक्या लोकांची मिरास नाही. परमार्थ म्हणजे गूढ, अनाकलनीय हा भ्रम त्यांनी दूर केला. भक्त, भगवंत, भक्ती, यज्ञ, योग यांच्या सुटसुटीत व्याख्या करून सामान्य लोकांना परतत्त्वाचा स्पर्श होऊ शकतो, असा आत्मविश्वास ज्ञानेश्वरांनी निर्माण केला. विठ्ठलाच्या रूपाने वारकऱ्यांना त्यांचे सर्वस्व दिले. परमार्थमार्ग सरळ, सोपा, सुखावह, श्रेयस्कर आहे, अशी ज्ञानेश्वरांनी पुनःपुन्हा ग्वाही दिली आहे. परमार्थप्राप्तीसाठी नियत कर्तव्य, घरदार, व्यवसाय सोडण्याचे काहीही कारण नाही. नाना साधनांच्या व्रतनियमांच्या, पारंपरिक यज्ञकर्मांच्या उपाधीत गुंतून पडण्याची काहीही आवश्यकता नाही, याचा निर्वाळा त्यांनी ठायी ठायी दिला आहे. भगवंताच्या ठायी निष्ठेने, भावाने आत्मसमर्पण करावे व कर्तव्यबुद्धी सतत जागृत असावी यासाठी ज्ञानेश्वरांनी ज्ञान, कर्म, भक्ती, योग ह्या मार्गांचा समन्वय साधला. ज्ञानेश्वर स्वतः योगी, कवी, संत होते.

आत्मज्ञान हीच धर्माचरणाची अंतिम कसोटी आहे अशी माऊलींची पक्की धारणा होती. म्हणून संपूर्ण ज्ञानेश्वरीत ह्या अंतर्साधनेचे सोपान विशद केले आहेत.

**तया स्वांतःकरणजिता । सकळकामोपशांता ।**
**परमात्मा परौता । दुरी नाहीं ।। (अध्याय ६, ओवी ८१)**

**अर्थ** - अशा त्या पुरुषाने आपले अंतःकरण जिंकल्यामुळे व त्याच्या इच्छा निवृत्त झाल्यामुळे, त्याला परमात्मा कोठे लांब नाही.' (परमात्मा त्यापेक्षा वेगळा नाही.)

अहंकाराचा नाश झाला की जीवाला ब्रह्मत्व ठेवलेलेच आहे. परमात्मा सर्वत्र भरलेला आहे. त्यांची धर्मकल्पनासुद्धा अध्यात्मनिष्ठ होती. 'अमृतानुभव' व 'चांगदेव पासष्ठी' या त्यांच्या ग्रंथात आत्मानुभवाचा साक्षात्कार जसा आहे तसाच 'ज्ञानेश्वरीत'ही आरंभापासून त्यांनी केला आहे. पहिल्याच ओवीत आत्मस्वरूपाचा जयजयकार केला आहे. अंतःकरणात ज्ञानाची ज्योत तेवली तरच सात्त्विकतेकडे, सत्कर्माकडे प्रवृत्ती होईल हा त्यांच्या एकंदर विवेचनाचा गाभा आहे. बुद्धी शुद्ध व स्थिर राहिली तरच समत्व योग साधता येतो. अशी बुद्धीच कार्याकार्याचा, धर्माधर्माचा, सत्यासत्यतेचा, न्यायअन्यायाचा विवेक करू शकते. म्हणून बुद्धी, मन, इंद्रिये यांच्या व्यापारात एकसूत्रीपणा,

शुद्धत्व आल्याखेरीज परमार्थसाधना यशस्वी होत नाही. शुद्ध अंतःकरण हा परमार्थाचा पाया आहे हे प्रधान सूत्र ज्ञानेश्वरीत गोवले आहे.

अंतःकरण स्फटिकासारखे स्वच्छ, निर्मळ व प्रसन्न असेल तरच आपला एकूण व्यवहार, कृती पवित्र होतील. आचार-विचार यातील एकरूपता हे चित्तशुद्धीचे गमक आहे. म्हणून ज्ञानेश्वरीचे यथार्थपणे आकलन झाले तर त्याचे दैनंदिन व्यवहारातसुद्धा पडसाद उमटलेच पाहिजेत. म्हणून ज्ञानेश्वरांनी अध्यात्म व भक्ती यांना नीतीच्या कोंदणात बसविण्याची दक्षता घेतली आहे.

अशा शाश्वत विचारांनी भागवतधर्माची उभारणी त्यांनी केली. 'ज्ञानदेवे रचिला पाया । उभारले देवालया ।' असे सार्थ उद्गार संत बहिणाबाईने काढले.

अशी ज्ञानेश्वरी कशी समजून घ्यायची? संत एकनाथ म्हणतात,

**भाव धरोनिया वाची ज्ञानेश्वरी । कृपा करी हरी तयावरी ।**
**एका जनार्दनी संशय सांडोनी । दृढ धरा ज्ञानेश्वरी ।।**

श्रद्धेने, भावयुक्त अंतःकरणाने, निःसंशय होऊन ज्ञानेश्वरी समजून घेतली तरच अंतःकरणात दृढ होईल. मग संत नामदेव म्हणतात त्याप्रमाणे -

**नामा म्हणे श्रेष्ठ ग्रंथ ज्ञानदेवी ।**
**एक तरी ओवी अनुभवावी ।।**

अशी एक जरी ओवी प्रत्यक्ष आचरणात आली तरी आपले जीवन कृतार्थ होईल.

९००० ओव्यांतील प्रत्येक ओवी ही तेवढीच तोलामोलाची आहे. ३६५ ओव्या अभ्यासल्यानंतर संपूर्ण ज्ञानेश्वरीचे पारायण केल्यासारखे वाटण्यातच या लेखनाचे उद्दिष्ट साध्य होणार आहे.

**।। ॐ श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**





# अध्याय १
# अर्जुनविषादयोग

## दिनांक १ जानेवारी

मागील प्रकरणात श्री ज्ञानेश्वरीचे माहात्म्य थोडक्यात स्पष्ट केले. या प्रकरणापासून ज्ञानेश्वरीतील निवडक ओव्यांच्या निरूपणास आपण आरंभ करीत आहोत. स्थळ, काळ यांची मर्यादा असल्याने तसेच सारभूत ज्ञानेश्वरीचे उद्दिष्ट असल्याने ''गागर में सागर'' असेच याचे स्वरूप असेल. जिथे आवश्यक असेल तिथे जरूर विस्तार होईल. महत्त्वाच्या संदर्भांचा उल्लेख अटळ आहे. प्रथम ओवी, नंतर भावार्थ, महत्त्वाचे शब्दार्थ व टीपा असे याचे स्वरूप असेल. यातून वाचकांशी सुसंवाद व्हावा ही नम्र इच्छा आहे. श्री ज्ञानेश्वरीतील प्रत्येक अक्षर तोलामोलाचे आहे. प्रत्येक ओवी शिरोधार्य आहे. त्यामुळे यात तर-तम हा भाव बिलकुल नाही. भगवान श्री आद्यशंकराचार्य यांच्यापासून, २१व्या शतकापर्यंत, श्री भगवद्गीतेवर शेकडो भाष्ये लिहिली गेली. या प्रत्येक भाष्यकाराला गीतेच्या ७०० श्लोकांतून सर्वात प्रिय व सारभूत असा वेगवेगळा श्लोक भावला. श्री ज्ञानेश्वरीच्या ९००० ओव्यांचेही असेच आहे. एक ज्ञानेश्वरी हाती आली तर इतर कोणत्याही ग्रंथाची आवश्यकता वाटणार नाही, अशी या ग्रंथाची सिद्धता आहे. भौतिक व पारमार्थिक अशा सर्व विषयांची चर्चा व सिद्धांत यात सामावले आहेत. असो.

**महाविष्णूचा अवतार । सखा माझा ज्ञानेश्वर ।। (संत जनाबाई)**

सर्व संतांनी श्री ज्ञानेश्वरांना भगवान महाविष्णूंचा १३व्या शतकातील अवतार म्हणून गौरविले. श्री ज्ञानेश्वरी हे त्यांचे अवतार कार्य. जेव्हा ज्ञानेश्वरी लिहिली त्या वेळी ज्ञानेश्वरांचे वय अवघे पंधरा वर्षांचे होते. श्री ज्ञानेश्वरी लिहिताना या कृपाळू, उदार, परमकारुणिक, योगीयांचा योगी असलेल्या मुलाच्या मुखारविंदातून प्रथम शब्द स्फुरण पावले ते परमात्म्याच्या जयजयकाराचे....

**ॐ नमो जी आद्या[1] । वेदप्रतिपाद्या[2] ।**
**जय जय स्वसंवेद्या[3] । आत्मरूपा ।।१।।**

*१) पहिल्या, मूळच्या २) वेदांनी प्रतिपादन केलेल्या ३) स्वतःच स्वतःला जाणण्यास योग्य अशा*

- ग्रंथारंभाच्या रूढ परंपरेस अनुसरून श्री ज्ञानेश्वरांनी या पहिल्याच ओवीत ॐकाररूपी परमात्म्याचा जयजयकार केला आहे. परब्रह्माच्या आद्यस्वरूपास 'जी जी' म्हणून अत्यंत विनम्रतेने मंगल केले आहे. हे सर्वांचे मूळ असणाऱ्या व वेदांच्या प्रतिपादनाचा विषय असणाऱ्या श्री ओंकारा, तुला नमस्कार असो व स्वतःला स्वतः जाणण्यास योग्य असणाऱ्या आणि सर्वव्यापी अशा आत्मरूपी ओंकारा, तुझा जयजयकार असो.

वेदांनी या परब्रह्माचे असेच वर्णन केले आहे. हे तत्त्व सर्व जगात पसरलेल्या आत्मरूपात सामावले आहे. ज्ञानेश्वरीची सुरुवात अशा आत्मरूपाने तर शेवट विश्वात्मकतेने झाला आहे. अशा या आद्य, वेदप्रतिपाद्य, स्वयंवेद्य आत्मरूप असलेल्या तत्त्वाचा जयजयकार असो, असे श्री ज्ञानेश्वर म्हणतात.

## दिनांक २ जानेवारी

**देवा तूंचि गणेशु । सकलार्थमतिप्रकाशु[1] ।**
**म्हणे निवृत्तिदासु । अवधारिजो जी[2] ।।**

*१) शंकर २) जाणत नाही ३) पाहावे*

पहिल्या ओवीत वर्णन केलेल्या ॐकाररूपी परब्रह्माचे स्वरूप ज्ञानेश्वरांनी श्री गणेशामध्ये पाहिले. माऊलींचा हा गणेश ॐकाररूप आहे. ते म्हणतात, 'देवा, सर्वांच्या बुद्धीचा प्रकाश जो गणेश, तो तूच आहेस. निवृत्तिनाथांचे शिष्य श्री ज्ञानेश्वर म्हणतात, महाराज ऐका.'

पुढे विसाव्या ओवीपर्यंत ज्ञानेश्वरांनी या ॐकाररूप गणेशाचेच वर्णन केले आहे. या गजाननास सहा हात असून त्यात सहा दर्शने आहेत. शब्दब्रह्म वेद हेच या गणेशाचे रेखीव शरीर आहे. नाना प्रकारच्या स्मृती म्हणजे त्याचे अवयव आहेत. अठरा पुराणे म्हणजे त्याच्या अंगावरील जडावाची विविध लेणी आहेत. या अलंकारातील रत्ने म्हणजे प्रमेये आहेत.

भगवान श्रीकृष्णाची वाङ्मयीन मूर्ती म्हणजे गीता! अशा गीतेचे चिंतन प्रत्यक्ष शिवशंकरही करतात. ज्यांचे चिंतन सर्वांनी करावे असे शंकर कोणाचे चिंतन करतात? या शंकेने पार्वतीने एकदा विचारले, तेव्हा गीतार्थाची थोरवी वर्णन करताना आश्चर्यचकित झालेल्या पार्वतीला शिवजी म्हणतात, "तुझ्या नित्य-नूतन रूपाप्रमाणेच गीता नित्य नवा नवा अर्थ प्रकट करून प्रकाश देणारी आहे. म्हणून या गीतातत्त्वाचे मीही चिंतन करीत असतो."

## दिनांक ३ जानेवारी

केवळ निवृत्तिनाथांच्या कृपेने व त्यांच्या आधाराने आपण हा गीतेचा अर्थ सांगावयास धजलो आहे, असे ज्ञानेश्वर महाराज नम्रतेने यानंतर सांगतात.

गीतेचा भावार्थ सांगण्यास आपण कां प्रवृत्त झालो हे सांगून झाल्यानंतर अतिशय विनम्र होऊन श्री ज्ञानेश्वर श्रोत्यांना विनवीत आहेत...

**तरी न्यून[1] तें पुरतें[2] । अधिक तें सरतें[3] ।**
**करूनि घेयावें हें तुमतें । विनवितु असें ।।८०।।**

*१) कमतरता २) पूर्ण करून ३) निवडून*

**अर्थ -** तरी उणे असेल ते पुरे करून घ्यावे आणि जास्त असेल ते सोडून द्यावे, अशी माझी आपणास विनंती आहे.

संपूर्ण ज्ञानेश्वरी ही संवादमय आहे. ज्ञानेश्वर हे वक्ते व वाचक हे श्रोते आहेत. ज्ञानेश्वरांनी श्रोत्यांशी केलेली जवळीकता, आत्मीयता, सहृदयता हे तर विलोभनीय आहेच पण त्यांची विनम्रता ही ठायी ठायी प्रकट झाली आहे. ज्ञानी पुरुषाची अशी नम्रता इतरत्र कोठेही दिसणार नाही. आपल्या स्वतंत्र बुद्धीने गीतातत्त्व समजणे कठीण असले तरी हे साहस मी करीत आहे. माझ्यासारख्या मतिमंदाला ही परमगंभीर गीता कशी कळणार? मी, अल्पप्रकाशाने कोणाला प्रकाशित करावे? एखाद्या क्षुद्र चिलटाने आपल्या मुठीत आकाश सामावून कसे घ्यावे?

माझ्यासारखा अज्ञानी हे धैर्य करीत आहे याचे कारण केवळ माझ्या सद्‌गुरुनाथांची पूर्ण कृपा! सद्‌गुरुनाथांप्रमाणे माझ्यापुढे संतकृपेचा लखलखीत दिवा आहे. या दिव्याच्या प्रकाशात मला सर्व काही स्पष्टपणे दिसत आहे. लोखंडाचे सोने करण्याचे सामर्थ्य परिसातच आहे. मृत मनुष्याला चैतन्य देण्याचे सामर्थ्य अमृतातच आहे. त्याप्रमाणे तुमच्या अवधानामुळे व गुरूंच्या कृपेमुळे मी मुका असलो तरी सरस्वती माझ्या मुखातून बोलेल. एकदा कामधेनु ही माता म्हणून प्राप्त झाल्यानंतर मनुष्याला असाध्य असे काय आहे?

असे जरी असले तरी ज्ञानेश्वर श्रोत्यांना विनवितात, "माझ्या निरूपणात काही उणिवा, कमतरता वाटली तर





आपण कृपा करून ती पूर्ण करून घ्यावी. उणाअधिक शब्द मुखातून निघाल्यास आपण तो गोड करून घ्यावा, अशी माझी तुम्हा श्रोत्यांना प्रार्थना आहे."

ज्ञानीयांचा राजा, योगीयांचा योगी, संतांचा शिरोमणी, करुणाकर, निधान, कृपाळू, उदार असे ज्ञानेश्वर किती विनम्र होतात...

## दिनांक ४ व ५ जानेवारी

ज्ञानेश्वरीत जसा हा संवाद तसाच तो अर्जुन व भगवान श्रीकृष्ण यांच्यातीलही आहे. दोन्ही सैन्यांच्या मध्ये सारथी श्रीकृष्णाने रथ आणला आहे. भीष्म, द्रोण व इतर सर्व राजे यांच्यासमवेत जमलेली वडील माणसे, आजे, गुरू, मामा, बंधू, पुत्र, नातू, जिवलग मित्र, सासरे, सगेसोयरे या सर्वांना पाहून अर्जुन करुणेने व्याकुळ झाला. मोहाने व्यापला. धैर्य खचले. अवसान पार गळाले. गात्रे शिथिल झाली. तोंड कोरडे पडले. शरीराला कंप सुटला व हातातून गांडीव धनुष्य गळून पडले.

... अशा या दयनीय अवस्थेचे वर्णन माऊली करीत आहेत -

**जैसा भ्रमर[1] भेदी कोडें । भलतैसें काष्ठ[2] कोरडें ।**
**परि कळिकेमाजीं सांपडे । कोंवळिये ।।२०१।।**
**तेथ उत्तीर्ण होईल प्राणें । परी तें कमळदळ चिरूं नेणे ।**
**तैसें कठीण कोवळेपणें । स्नेह देखा ।।२०२।।**

*१) भुंगा २) लाकूड*

**अर्थ -** भुंगा हा ज्याप्रमाणे वाटेल त्या प्रकारचे कोरडे लाकूड सहज लीलेने पोखरून टाकतो, परंतु कोवळ्या कळीमध्येच अडकून पडतो. ।।२०१।।

तेथे तो प्राणासही मुकेल, पण त्या कमळाच्या पाकळ्या चिरण्याचा विचार त्याच्या मनास शिवतही नाही. पाहा, हा स्नेह जात्या कोवळा खरा, पण महाकठीण! ।।२०२।।

ज्या अर्जुनाने युद्धात शंकरास हार खाण्यास लाविले व निवातकवच नावाच्या राक्षसाचा ठावठिकाणा नाहीसा केला, त्या धनुर्धारी अर्जुनाची मोहग्रस्त अवस्था श्री ज्ञानेशांनी नेमक्या दृष्टान्ताने वर्णन केली आहे. युद्धभूमीवर आपलेच बांधव पाहून अर्जुनाच्या मनात करुणा उत्पन्न झाली. चंद्राच्या प्रकाशाने जसा सोमकांत मणी पाझरतो, त्याप्रमाणे अर्जुनाचे चित्त द्रवू लागले. अर्जुनाची ही मोहग्रस्तता कशी झाली? भुंगा कोणतेही कठीण लाकूड फोडतो पण कमळाच्या कळीत मात्र अडकून पडतो, तशी अर्जुनाची अवस्था झाली.

ज्ञानेश्वरीतील दृष्टान्त, उपमा एकाहून एक सरस आहेत. ठायी ठायी अशा अलंकारांची पेरणी आहे. म्हणून गहन विषय सुलभ करण्याची विलक्षण हातोटी ज्ञानेशांना लाभली आहे.

पहिल्या अध्यायातील निवडक ओव्यांना इथे पूर्णविराम!

**।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**

ॐ

# अध्याय २
# सांख्ययोग

## दिनांक ६ जानेवारी

श्री ज्ञानेश्वरीच्या पहिल्या अध्यायातील सारभूत सात ओव्यांचे विवेचन आपण पाहिले. अर्जुनासारखी ऋजुता व सत्यनिष्ठा असेल तर विवादाचाही योग बनू शकतो. अर्जुनाची किंकर्तव्यमूढता, त्याचे कारुण्य, मोहग्रस्तता याचे नेमके वर्णन श्री ज्ञानेश्वरांनी भुंग्याच्या दृष्टान्ताने केले आहे. खरे म्हणजे अर्जुनाला भगवंतांनी केवळ निमित्तच बनविले आहे. कोणत्याही युगातील मानवी जीवनात उद्भवणारे प्रश्न अर्जुनाने विचारले असल्याने भगवंतांनी त्यांची उत्तरे देताना शाश्वत जीवनसिद्धान्तांनी अखिल मानवजातीला उपदेश केला आहे. पहिल्या अध्यायाच्या या पार्श्वभूमीवर दुसऱ्या अध्यायापासून गीतेच्या शिकवणीस प्रारंभ होत आहे. संपूर्ण गीतेमध्ये विविध विषयांवर जे तत्त्वज्ञान विस्ताराने मांडले गेले आहे ते सर्व सिद्धान्त सूत्ररूपाने दुसऱ्या अध्यायात भगवंतांनी कथन केले आहेत. दुसरा अध्याय म्हणजे संक्षिप्त गीताच! या अध्यायात तीन प्रमुख विषय आहेत-

१) देहाची नश्वरता व आत्म्याचे नित्यत्व

२) स्वधर्मपालनाची अपरिहार्यता आणि निष्काम कर्माचा सिद्धान्त

३) स्थितप्रज्ञ स्थितीची विवेचना

'सांख्ययोग' या दुसऱ्या अध्यायातील एकूण ७२ श्लोकांवर माऊलींनी अवघ्या ३७५ ओव्यांत सारे निरूपण केले आहे. तुलनेने या ओव्या संख्यात्मक जरी कमी असल्या तरी गुणात्मकतेने महान, मंगल आहेत. त्यातील निवडक ओव्या अशा –

**हें उपजें[1] आणि नाशे । तें मायावशें दिसे ।**
**येऱ्हवीं तत्त्वता वस्तु[2] जे असे । ते अविनाशचि ।।१०५।।**

*१) उत्पन्न होते २) आत्मा, मूळ ब्रह्मतत्त्व*

श्री ज्ञानेश्वरांनी एक महान सिद्धान्त या ओवीतून मांडला आहे. गीतेच्या १२व्या श्लोकावरील हे निरूपण आहे. अर्जुन संभ्रमीत झाला होता. आपल्या हातून आप्त, गुरुजन मारले जाणार व महत्पाप घडणार अशी भीती अर्जुनाच्या मनात निर्माण झाली होती. म्हणून भगवान श्रीकृष्णांनी त्याला समजावले की, या जगात मारणारा कोण आहे? मरणारे कोण आहेत? जो जन्मास येतो त्याला मृत्यू अटळ आहे. ज्याची ज्याची उत्पत्ती होते त्याचा नाश हा अपरिहार्य आहे. हे शाश्वत सत्य जो स्वीकारतो तो दुःखी होत नाही. अज्ञान व मूर्खपणा यामुळे जे हे जाणत नाहीत, असे अविवेकी पुरुष शोकाकुल होतात. म्हणून अर्जुना, तू हे निश्चित जाण की, "या जगाची उत्पत्ती व या जगाचा नाश या दोन्ही गोष्टी भ्रांतीमुळे असतात. वस्तुतः पाहिले तर असे आहे की, जी मूळ वस्तू आहे, जो आत्मा आहे तो अविनाशीच आहे. पाण्यावर वाऱ्याने तरंग येतात पण येथे कोण कोणाला जन्म देते. वारा बंद झाला की तरंग थांबून पाणी पूर्ववत होते. येथे नाश कशाचा झाला याचा विचार तू का करत नाहीस?"



ॐ

## दिनांक ७ जानेवारी

चैतन्याच्या ठिकाणी असे अनेक देह येतात व जातात असे जो जाणतो त्याला भ्रांतिजन्य दुःख कधीही होत नाही. या देहादी प्रपंचामध्ये सर्वत्र चैतन्य भरून आहे. अशा अविनाशी, नित्य आत्म्याबद्दल माऊलींनी एका सुंदर ओवीत म्हटले आहे -

**या उपाधिमाजी[1] गुप्त । चैतन्य असे सर्वगत[2] ।**
**तें तत्त्वज्ञ संत । स्वीकारिती ।।१२६।।**

*१) नामरूपात्मक जगामध्ये (देहादि प्रपंचामध्ये) २) सर्वत्र*

या देहादि प्रपंचामध्ये सर्वत्र चैतन्य गुप्त रूपाने आहे. तत्त्व जाणणारे संत ते ओळखून त्याचेच ग्रहण करतात. "ईशावास्यमिदम् सर्वं यत्किंच्य जगत्यां जगत्..." या नामरूपात्मक जगामध्ये एक चैतन्यतत्त्वच व्यापून आहे. नामरूपाने ते झाकलेले असल्याने आपणास दिसत नाही, पण तत्त्वज्ञ, संत यांच्या दृष्टीला ते जाणवते. "विठ्ठल जळी स्थळी भरला । रीता ठाव नाही उरला । आजी म्यां दृष्टीने देखिला विठ्ठलचि विठ्ठलचि ।।" असे जगद्गुरू तुकाराम महाराज ठामपणाने सांगतात. हा तत्त्वविचार समजावून सांगण्यासाठी ज्ञानेश्वरांनी अत्यंत समर्पक दृष्टान्त त्यापुढे दिले आहेत. दूध पाण्याशी एकरूप होऊन त्यात पूर्ण मिळून गेलेले असते, पण राजहंस मात्र ते वेगळे करून दाखवितो. सोने तापवून त्यातील हिणकस भाग काढून टाकून शुद्ध सोने वेगळे करता येते. त्याप्रमाणे ज्ञानी पुरुष नित्य-अनित्य, शाश्वत-अशाश्वत यातील भेद ओळखून केवळ एक चैतन्यतत्त्वच स्वीकारतो.

## दिनांक ८ जानेवारी

जन्मरहित, नित्य, अनादी, अक्षय असा आत्मा, शरीर नष्ट झाले तरी नाश पावत नाही. शरीरे येतात-जातात पण आत्म्याचे अस्तित्व अखंड असते. हा विचार व्यक्त करणारी माऊलींची ओवी अशी...

**जैसें जीर्ण[1] वस्त्र सांडिजे[2] । मग नूतन वेढिजे[3] ।**
**तैसें देहांतरातें[4] स्वीकारिजे । चैतन्यनाथें ।।१४४।।**

*१) जुनी-पुराणी २) टाकून देणे ३) धारण करतो ४) देह सोडून*

"वासांसि जीर्णानि..." या २२व्या श्लोकावरील माऊलींचे हे निरूपण आहे. देहाची नश्वरता व आत्म्याचे अमरत्व सांगण्यासाठी गीतेत भगवंतांनी ३०व्या श्लोकापर्यंत वर्णन केले आहे. गीतेतील हा महत्त्वाचा सिद्धान्त आहे. अर्जुनाचा मोह-निरास करण्यासाठी भगवंतांनी हा उपदेश केला आहे. आत्म्याचे अमरत्व जाणल्यास देहाचा अभिमान नाहीसा होतो व 'मी मारणारा' ही बुद्धी उरत नाही. चैतन्यरूप आत्मा हा कधी उत्पन्न होत नाही म्हणून तो कधीही मरत नाही. तो नित्य, जन्मरहित, शाश्वत आहे. अशा आत्म्याला जाणणारा, कोण पुरुष कोणाला मारणार? 'ज्याप्रमाणे जुने वस्त्र टाकावे आणि मग नवे नेसावे, त्याप्रमाणे हा आत्मा एक देह टाकून दुसरा स्वीकारतो.' अशा नित्यसिद्ध, अचिंत्य, अविकारी, उपाधिरहित आत्म्याला जाणल्यानंतर शोक करणे व्यर्थ आहे. ज्याप्रमाणे जे स्वप्नात पाहावे, ते स्वप्न आहे तोपर्यंतच खरे वाटते. जागे झाल्यावर यातले काहीही उरत नाही. म्हणून जागेपणी खरा वाटणारा हा जगाचा पसारा असत्य, माया आहे असे तू समज. तुला भ्रम झाल्यामुळे तू त्याला सत्य मानीत आहेस. ज्याप्रमाणे सावलीला शस्त्राने मारल्यास त्याच्या अंगाला घाव लागत नाही, माठ फुटल्यानंतर माठातील आकाश जसे मूळ आकाशाशी एकरूप होते त्याप्रमाणे शरीराचा नाश झाला तरी त्याचे मूळ स्वरूप, चैतन्यतत्त्व नाहीसे होत नाही. म्हणून अर्जुना, उत्पत्ती व नाश, जन्म व मृत्यू यांची भ्रांत कल्पना तू चैतन्यतत्त्वाच्या ठिकाणी खरी मानू नकोस.

ॐ

## दिनांक ९ जानेवारी

देह व आत्मा यांचे स्वरूप कथन केल्यानंतर श्रीकृष्ण अर्जुनाला त्याच्या स्वधर्माचा उपदेश करीत आहेत. श्री ज्ञानेश्वरमाऊलींनी या स्वधर्मालाच नित्ययज्ञ म्हटले आहे. या अध्यायात तसेच तिसऱ्या व अठराव्या अध्यायात हा विषय सविस्तर मांडला आहे. स्वधर्म म्हणजे विहित कर्म! ज्याच्या ज्याच्या वाट्याला जे जे विहित कर्म आले आहे ते ईश्वराचे मनोगत आहे. स्वधर्म म्हणजे जे नीतिनियमांना अनुकूल आहे व त्याचबरोबर आपल्या आंतरिक प्रकृतीला, स्वभावाला जे अनुसरून आहे तो स्वधर्म! माऊलींची पुढील ओवी मोठी अर्थपूर्ण आहे -

**तरी स्वधर्मु एक आहे । तो सर्वथा[1] त्याज्य नोहे ।**
**मग तारिजेल[2] काय पाहें । कृपाळूपणें ।।१८२।।**

*१) सर्वस्वी २) तरून जाईल*

गीतेतील ३१व्या श्लोकावरील हे निरूपण आहे. कर्तव्यप्राप्त युद्धापेक्षा क्षत्रियाला दुसरे हितकर काही नाही. हा विचार करून अर्जुनाने व्याकुळ होणे योग्य नाही. "तरी स्वधर्म म्हणून जो एक आहे, तो मुळीच टाकता येत नाही. असे असता विचार कर, कृपाळूपणा धरून तुला तरून जाता येईल काय?" युद्ध करणे हा क्षत्रियांचा धर्मच आहे. शत्रूवर दया दाखवून त्याच्यावर उपकार केला तर तो धर्म होणार नाही. सृष्टीचा प्रलय झाला तरी, जो स्वधर्म आहे तो केव्हाही व कसल्याही प्रसंगी सोडता येणार नाही. म्हणून ज्याचे आचरण केले असता केव्हाही दोष लागावयाचा नाही, त्या आपल्या स्वधर्माकडे लक्ष दे. या युद्धात स्वजनांचा नाश पाहून तुझ्या चित्ताला दयेचा पाझर फुटला तरी, धर्मयुद्ध करीत असताना हे तुझे वागणे उचित होणार नाही. दूध गाईचे झाले तरी ते नवज्वरात पथ्यकर नसते. त्याप्रमाणे स्वधर्म सोडून परधर्माचे अनुकरण कल्याणकारक होत नाही. उलट तू पापाला पात्र होशील आणि अपकीर्तीचा डाग तर कल्पांतापर्यंतही जाणार नाही.

## दिनांक १० जानेवारी

अशा स्वधर्माचे आचरण करीत असताना जशी परिस्थिती येईल ती स्थिर, शांत मनाने स्वीकारावी. माऊलींनी हा जीवनमंत्र पुढील ओवीतून प्रकट केला आहे -

**सुखीं संतोषा न यावें । दुःखीं विषादा[1] न भजावें[2] ।**
**आणि लाभालाभ न धरावे । मनामाजीं ।।२२६।।**

*१) दुःखाने २) मानावे*

सुखदुःख, लाभहानी, यशापयश ही सारखी मानून युद्ध कर. हे जसे अर्जुनाला सांगितले, तसे ते आपणा सर्वांनाही लागू आहे. माणसे सुखाने हुरळून जातात व दुःखाने होरपळून जातात. सुखात माणसाला सोनार आठवतो व दुःखाच्या वेळी मात्र भगवंताचा धावा करतो. सुखदुःखाच्या वेळी ज्याची बुद्धी स्थिर राहते तो कोणत्याही परिस्थितीत तरून जातो. म्हणून आपल्याला योग्य असे जे स्वधर्माचे आचरण, तेच करीत असताना, जो प्रसंग येईल तो मुकाट्याने सहन करावा.



ॐ

## दिनांक ११ जानेवारी

स्वधर्माप्रमाणे आचरण करूनच ईश्वराची खरी पूजा करावी. स्वधर्माचे महत्त्व विशद केल्यानंतर भगवान श्रीकृष्णांनी कर्मबंधनातून मुक्त होण्याचा मार्ग म्हणजे निष्काम कर्मयोगाचे रहस्य कथन करण्यास सुरुवात केली आहे. 'निष्काम कर्म' हा गीतेचा गाभा आहे. ४७ ते ४९ ह्या श्लोकांतून हे सार मांडले आहे. "कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन..." ह्या प्रसिद्ध श्लोकावर माऊलींनी फक्त तीन ओव्यांत निरूपण केले आहे. त्यातील एक ओवीसुद्धा हा सिद्धान्त विशद करण्यास पुरेशी आहे. ओवी अशी -

**परी[1] कर्मफळीं आस[2] न करावी । आणि कुकर्मीं[3] संगति न व्हावी ।**
**हे सत्क्रियाचि आचरावी । हेतुविण[4] ।।२६६।।**

*१) परंतु २) अभिलाषा, इच्छा ३) निषिद्ध कर्म ४) फलाशा न ठेवता*

**अर्थ -** कर्मफलाच्या ठिकाणी आशा ठेवू नको आणि निषिद्ध कर्म करण्याविषयीही प्रवृत्ती होऊ देऊ नकोस. हा सदाचारच निष्काम बुद्धीने आचरावा.

## दिनांक १२ व १३ जानेवारी

अनासक्त कर्म करण्याची म्हणजेच निष्काम कर्मयोगातील बुद्धी ज्याला साधली त्याला कर्मबंध मुळीच बाधत नाही. कर्म करण्यापुरताच आपला अधिकार आहे. फलावर आपला अधिकार नाही. म्हणजे कर्म करण्याचा आपला हेतू कर्मफलाचा लोभ नव्हे तर कर्तव्याची भावना असावी. कार्य सिद्धीस जावो अथवा न जावो, स्थिर व शांत बुद्धीने अनासक्त होऊन कर्म ईश्वरार्पण करावे. अशी चित्ताची समता हाच योग आणि हा योगच कर्मातील कौशल्य होय! "समत्वं योग उच्यते" व "योगः कर्मसु कौशलम्"... या ४८ व ५० व्या श्लोकावर ज्ञानेश्वरांचे निरूपण खूप प्रभावी झाले आहे. त्या सारभूत ओव्या अशा -

**अर्जुना समत्व[1] चित्ताचें । तेचि सार जाण योगाचें ।**
**जेथ मन आणि बुद्धीचें । ऐक्य आथी[2] ।।२७३।।**
**जे बुद्धियोगा योजिले[3] । तेचि पारंगत जाहले ।**
**इही उभयसंबंधी सांडिले । पापपुण्यीं ।।२७७।।**

*१) समता, समतोलपणा २) असते ३) आश्रय करतात*

**अर्थ -** अर्जुना, (यशापयशी) चित्ताची समता हेच योगाचे वर्म आहे असे समज. या योगात मन व बुद्धी यांचे ऐक्य असते. जे बुद्धियोगाचा आश्रय करतात, तेच संसारसागराच्या पलीकडे जातात. त्यांचीच पाप व पुण्य दोहोंच्याही बंधातून सुटका होते.

मना-बुद्धीचे ऐक्य म्हणजे मनाचा संकल्प व बुद्धीचा निश्चय यात विरोध नसतो. ज्याने मनाचा समतोलपणा साधला तोच खरा योगी. असा हा बुद्धियोग-म्हणजेच कर्मयोग भगवान श्रीकृष्णांनी अर्जुनाला समजावून सांगितला. असे कर्म केले तर ते बंधनकारक होत नाही. अशा सद्बुद्धीच्या ठिकाणी पापाचा व पुण्याचा प्रवेश होत नाही. अशी सद्बुद्धी एकदा का निर्माण झाली तरी ती विषयासक्त न होता भगवंताकडेच ओढ घेते. मग तिला जन्म-मृत्यूची भीती राहत नाही. या बुद्धीच्या प्रकाशामुळेच सर्व अडचणी दूर होतात व मार्ग स्वच्छ दिसतो, असे माऊली म्हणते.

## दिनांक १४ जानेवारी

- ज्याची बुद्धी स्थिर झाली तो स्थितप्रज्ञ! असा स्थिरबुद्धीचा पुरुष निरंतर आत्मसुखात - स्वरूपात - समाधीसुखात मग्न असतो. अशा पुरुषाची लक्षणे, अर्जुनाच्या विचारण्यावरून भगवंतानी १७व्या श्लोकात वर्णन केली आहेत. यातील ६४ व ६५व्या श्लोकावरील निरूपणात माऊलींनी या सर्व लक्षणांचे सार आणले आहे.

**म्हणोनि विषय हे आघवे । सर्वथा मनौनि[1] सांडावे[2] ।**
**मन रागद्वेष स्वभावें । नाशतील ।।३३१।।**

*१) मनापासून २) सोडून द्यावेत*

**अर्थ -** म्हणून हे सर्व विषय पूर्णपणे मनातूनच काढून टाकावे, मग रागद्वेष आपोआप नष्ट होतील.

इंद्रिये व त्यांचे विषय यांचा फार मोठा प्रभाव चित्तावर असतो. म्हणून त्याने विषयात सुख आहे ही भ्रामक बुद्धी सोडून द्यावी. विषयसुखाने जे मोहित होत नाहीत तेच योगयुक्त होय व त्यांनाच आत्मबोध-आत्मसुख प्राप्त होते. चित्तातील विषयसुख भोगण्याची इच्छा आपल्या आत्मसुखाच्या आड येते. वास्तविक जीव नित्य सुखस्वरूपच आहे. तो नित्यतृप्त आहे. पण विषय-विकारामुळे हृदयातील परमात्म्यापासून तो दूर राहतो. एकदा विषयाचा लोभ झाला की, तो भोगण्याची इच्छा निर्माण होते. मग इच्छेविरुद्ध काही घडले की क्रोध येतो, क्रोधामुळे बुद्धी अविवेकी होते, ज्ञान नाहीसे होते, बुद्धी व्याकुळ होते व बुद्धीला भ्रंश झाला की विवेक नष्ट होतो. आत्मनाशाची ही शृंखला आहे. विषय संपले की रागद्वेषही निघून जातो. म्हणून आत्मज्ञानास विषय विषासारखे असणारे असतात.

## दिनांक १५, १६, १७ व १८ जानेवारी

जो आत्मसुखाशी एकरूप असतो त्याची बुद्धी भगवंताच्या ठिकाणी स्थिर होते. एकदा बुद्धी स्थिर झाली की, त्याला चित्ताचा समतोलपणा साधतो. अशा चित्ताला प्रसन्नता लाभते. अशी प्रसन्नता हृदयात शांती निर्माण करते व दुःखांचा नाश करते. कारण अशांत मनुष्याचे चित्त कधीही सुखी होत नाही. हा सर्व विचार माऊलींच्या खालील अर्थपूर्ण ओव्यात सामावला आहे. ६५व्या श्लोकावर माऊलींचे हे निरूपण आहे.

**देखें अखंडित प्रसन्नता । आथी[1] जेथ चित्ता ।**
**तेथ रिगणें[2] नाहीं समस्तां । संसारदुःखां ।।३३८।।**
**जैसा अमृताचा निर्झरु । प्रसवे जयाचा जठरु ।**
**तया क्षुधेतृषेचा अडदरु[3] । कहींचि[4] नाहीं ।।३३९।।**
**तैसे हृदय प्रसन्न होये । तरी दुःख कैचें[5] कें[6] आहे ।**
**तेथ आपैसी[7] बुद्धि राहे । परमात्मरूपीं ।।३४०।।**
**जैसा निर्वातीचा दीपु । सर्वथा नेणे कंपु ।**
**तैसा स्थिरबुद्धि स्वस्वरूपु । योगयुक्तु ।।३४१।।**

*१) असते २) प्रवेश करणे ३) धाक, भीती ४) कधीच ५) कसले ६) कोठे ७) आपोआप*

**अर्थ -** पाहा, जेथे चित्ताला निरंतर प्रसन्नता असते, तेथे कोणत्याही संसारदुःखाचा प्रवेश होत नाही. ।।३३८।।
ज्याप्रमाणे अमृताचा झरा ज्याच्या पोटातच उत्पन्न होतो, त्याला तहानभुकेची भीती कधी नसते. ।।३३९।।
त्याप्रमाणे अंतःकरण प्रसन्न झाले तर मग दुःख कसले, आणि कोठले? त्या वेळी परमात्मस्वरूपाच्या ठिकाणी





बुद्धी सहजच स्थिर होते. ।।३४०।।
ज्याप्रमाणे निवाऱ्याच्या ठिकाणी असलेली दिव्याची ज्योत मुळीच हलत नाही, त्याप्रमाणे योगयुक्त पुरुष स्वस्वरूपी स्थिर बुद्धीने राहतो. ।।३४१।।

अशांत मनुष्याचे चित्त कधीही परमेश्वराच्या ठिकाणी स्थिर होत नाही. अस्थिर मनास कधीही शांतता लाभत नाही. अशांत मनास कधीही सुखशांती लाभत नाही. चित्त आत्म्याच्या ठिकाणी स्थिर न होता, विषयाधीन झाले की, ते सर्व दुःखाचे कारण होते. मनाची चंचलता हेच दुःखाचे सार आहे. म्हणून इंद्रियांचा निग्रह करावा. सुखाचा झरा बाहेर कोठे पाझरत नाही. आनंद आपल्या अंतर्यामीच आहे. बाहेरील वस्तूतून अखंड आनंदाची प्राप्ती होते, हा केवळ आपला भ्रम आहे.

## दिनांक १९ व २० जानेवारी

ज्याची बुद्धी स्थिर वा आत्मस्थित झाली तो आत्मज्ञानी पुरुष परमात्म्याच्या महासुखात रंगून गेलेला असतो. अशा स्थिरबुद्धीच्या पुरुषाचे वर्णन श्री ज्ञानेश्वर करतात -

**ऐसा आत्मबोधें तोषला । जो परमानंदें पोखला ।**
**तोचि स्थितप्रज्ञु भला । वोळख तूं ।।३६६।।**
**तो अहंकारातें दंडुनी । सकळ कामु सांडुनी ।**
**विचरे विश्व होऊनि । विश्वामाजीं ।।३६७।।**

**अर्थ -** असा जो आत्मज्ञानाने तुष्ट झालेला व परमानंदाने पुष्ट झालेला आहे, तोच खरा स्थिरबुद्धी आहे, असे तू जाण. ।।३६६।।
तो अहंकाराला घालवून, सर्व कामना सोडून व जगद्रूप बनून जगात वावरतो. ।।३६७।।

अशी ही ब्रह्मस्थिती आहे. असे निरहंकारी, निष्काम पुरुष या विश्वामध्ये आत्मौपम्य बुद्धीने सर्व व्यवहार करतात. हेच पुरुष परब्रह्माला पोचतात. अंतकाळीसुद्धा असे पुरुष विचलित होत नाहीत.

संपूर्ण ज्ञानेश्वरीतील तत्त्वज्ञानाचे सार दुसऱ्या अध्यायातील या ओव्यांतून श्री माऊलींनी प्रकट केले आहे. निवडलेल्या या १५ ओव्या मुखोद्‌गत करून त्यांचे सतत चिंतन, मनन करावे.

**।।श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**

ॐ

# अध्याय ३
# कर्मयोग

### दिनांक २१ जानेवारी

तिसऱ्या अध्यायात श्री ज्ञानेश्वरमाऊलींनी कर्मयोगाचे विवेचन केले आहे. या अध्यायाच्या सुरुवातीलाच अर्जुनाने भगवंताला प्रश्न विचारला, ''कर्मापेक्षा जर ज्ञान श्रेष्ठ असेल तर मी युद्धासारखे घोर कर्म का करावे?'' भगवान श्रीकृष्णांनी या प्रश्नाचे उत्तर देण्यासाठी कर्म, प्रकृती, यज्ञ, स्वधर्म, पापयुक्त कर्म, इंद्रियनिग्रह, लोकसंग्रहासाठी कर्माची आवश्यकता, ज्ञानी माणसाचे कर्म, यज्ञकर्मातून अर्पण करावयाचा वाटा... असे कर्मासंबंधीचे विषय अर्जुनाला कथन केले. माऊलींनी या अध्यायाच्या ४३ श्लोकांवर २७६ ओव्यांतून निरूपण केले आहे. त्यातील महत्त्वाच्या ओव्या अशा -

**म्हणोनि जें जें उचित[1] । आणि अवसरेंकरूनि[2] प्राप्त ।**
**तें कर्म हेतुरहित । आचरें तूं ।।७८।।**

*१) योग्य २) प्रसंगानुसार*

ज्ञानेश्वरीत श्रीकृष्ण व अर्जुन यांच्यातील अलौकिक प्रेमाचे वर्णन वारंवार आले आहे. श्रीकृष्ण अर्जुनास पुनःपुन्हा समजावून सांगत आहेत, युद्धास प्रवृत्त करीत आहेत; पण अर्जुन आपला हेका सोडत नाही. अनेक शंका विचारून त्यांनाच ज्ञान सांगत राहिला आहे. याचा श्रीकृष्णांना राग येत नाही उलट अर्जुनावरील अतीव प्रेमाने ते मोहित झाले असल्यामुळे हळुवारपणे त्याच्या प्रश्नांना उत्तरे देत आहेत. कोणत्याही परिस्थितीत कर्म टाळता येत नाही. आपले कर्तव्य आपण करावे. फळाची मात्र अपेक्षा धरू नये. अनासक्त होऊन निष्काम भावनेने केलेल्या कर्माचे बंधन मनुष्यास पडत नाही. हा निष्काम कर्माचा सिद्धान्त भगवंत अर्जुनाला विविध प्रकारांनी पटवून देत आहेत.

### दिनांक २२ व २३ जानेवारी

'नियतं कुरु कर्म त्वं' या आठव्या श्लोकावरील निरूपणात विहित कर्माचा उपदेश ज्ञानेश्वरांनी केला आहे. ''जे प्राप्त कर्म आहे व प्रसंगानुरूप वाट्यास आले आहे ते तू फलाशा सोडून करीत जा.'' नित्य व नैमित्तिक कर्मेही त्याच भावनेने आचरावीत. अशी कर्मे करीत असताना आपण ती भगवंताप्रीत्यर्थ करीत आहोत, अशी कर्तव्यभावना मनात असावी म्हणजे कर्माचा कोणताही दोष आपणास लागत नाही.

**स्वधर्मु जो बापा । तोचि नित्ययज्ञु जाण पां ।**
**म्हणोनि वर्ततां तेथ पापा । संचारु[1] नाहीं ।।८१।।**
**हा निजधर्मु जैं सांडे । कुकर्मीं रति[2] घडे ।**
**तैंचि बंधु पडे । संसारिकु ।।८२।।**

*१) प्रवेश २) आवड*

मोहग्रस्त अर्जुनाला भगवंतांनी ९व्या श्लोकात 'स्वधर्माचे' स्मरण करून दिले आहे. ज्ञानेश्वरीत माऊलींनी स्वधर्मालाच यज्ञ असे म्हटले आहे. वैदिक काळातील भारतीय संस्कृती ही यज्ञप्रधान होती. ज्ञानेश्वरांच्या काळातही यज्ञयाग, कर्मकांड, व्रतवैकल्ये यातून खऱ्या धर्माची मूल्ये हरवून गेली होती. सामान्य माणूस संभ्रमित होऊन दिशाहीन झाला होता. अशा काळात साधा, सरळ, सोपा धर्म सांगून माऊलींनी मोठी क्रांती केली. सामान्य जनांना



ॐ

यज्ञाची नवी संकल्पना दिली. भक्तीचा सहज अनुसरण करता येणारा मार्ग सांगितला. असा भागवत धर्माचा पाया ज्ञानेश्वरांनी रचला.

आपले कर्तव्य चोखपणे पार पाडणे आणि आपल्यासाठी नेमून दिलेला धर्म पाळणे याचेच नाव यज्ञ. असे स्वधर्माचे आचरण करीत असताना त्यात कुठल्याही पातकाचा शिरकाव होत नाही. हा यज्ञ टाकून माणूस जर वेगळीच कर्मे करू लागला तर मात्र तो संसाराच्या बंधनात अडकतो. स्वधर्माचरण सुटले की वाईट कर्माच्या ठिकाणी आसक्ती उत्पन्न होते व संसारबंधात तो अडकतो. स्वधर्माची महती पटवून देताना, माऊलींनी मोठा दिलासा दिला आहे. स्वधर्म सांभाळला म्हणजे मोक्षाप्रत जाता येते. कामधेनुप्रमाणे सर्व इच्छा फलद्रूप होतात. मग व्रतवैकल्ये करण्याची गरज उरत नाही. शरीराला पीडा देण्याचे कारण उरत नाही. तीर्थयात्रेलासुद्धा जाण्याची आवश्यकता नाही. एवढेच नव्हे तर अन्य देवतांस भजण्याचे कारण नाही. त्याप्रमाणे यज्ञयाग, अनुष्ठाने, मंत्रतंत्र इ.ची ईश्वरीय भक्तीत गरज नाही. ८९, ९०, ९१ (अध्याय ३) अशा ओव्यांतून माऊलींनी हे ठामपणाने सांगितले. स्वधर्माचा अर्थ विशद करणाऱ्या याही ओव्या मौलिक आहेत.

### दिनांक २४ व २५ जानेवारी

देहधारी माणसाला कर्म कधीच टाळता येत नाही. निरपेक्ष भावनेने अनासक्त होऊन आपले कर्म करावे हाच स्वधर्म! वरील ओव्यांतून हा क्रांतिकारी मंत्र प्रगट झाला आहे.

**तैसा स्वधर्मु जरी लोपला[1] । तरी सर्व सुखांचा थारा[2] मोडला ।**
**जैसा दीपासवें हरपला[3] । प्रकाशु जाय ।।११०।।**
**म्हणऊनि स्वधर्मु जो सांडील । तयातें कालु[4] दंडील ।**
**चोरु म्हणूनि हरील । सर्वस्व तयाचें ।।११२।।**

*१) नाहीसा झाला २) स्थिरपणा ३) नाहीसा झाला ४) यमधर्म*

गीतेतील १२व्या श्लोकावरील हे निरूपण आहे. भगवंतांनी संतुष्ट होऊन दिलेल्या ऐश्वर्याचा उपभोग जो एकटाच घेतो असा कृतघ्न मनुष्य चोर आहे. भगवान श्रीकृष्णाने अशा मनुष्यास 'स्तेन' म्हणजे चोर असे म्हटले आहे. माऊलींनी याचा विस्तार करताना पुन्हा एकदा स्वधर्माचे माहात्म्य वर्णन केले आहे. जसा दिवा मालविल्यानंतर प्रकाश नाहीसा होतो तसा स्वधर्म जर लुप्त झाला तर सर्व सुखांचे आश्रयस्थान नाहीसे होते. म्हणून आपला स्वधर्म जो टाकील, त्याला यमधर्म शिक्षा करील व तो केवळ चोर आहे असे समजून त्याचे सर्वस्व हिरावून घेईल.

### दिनांक २६ व २७ जानेवारी

कृतज्ञता हा दैवीगुण आहे. ज्याने आपल्याला जन्म दिला, जो आपले शरीर-व्यापार चालवितो, मृण्मय शरीरात जो चिन्मय होऊन राहिला आहे, त्याच्यामुळेच आपल्याला सर्व प्रकारची संपत्ती, वैभव प्राप्त होते; पण अहंकार व मूढतेमुळे त्याचे कर्तृत्व व भोक्तृत्व तो स्वतःकडे घेतो. ज्याने दिले त्याला काहीही न देता जो उपभोगतो तो केवळ चोर आहे. अशा माणसाला देवाची एक दिवस अशी थप्पड बसते की, त्या वेळी त्याला ईश्वर आठवतो. 'मी व माझे' म्हणून जगणाऱ्याला यमधर्म केव्हा तरी शिक्षा करतोच. म्हणून स्वधर्माने जे मिळविले ते आपण स्वधर्मात खर्च करावे आणि उरलेले आनंदाने भोगावे. मिळालेले वैभव यज्ञसामग्री मानून स्वधर्मास स्मरून ती भगवंतास अर्पण करावी. 'मी व माझे' याऐवजी 'तू व तुझे' मानून जी कर्मे भगवंताला अर्पण करतो त्यामुळेच खरी भक्ती होते व अशी

ॐ

भक्ती ईश्वराला आवडते.

**देखें प्राप्तार्थ[1] जाहले । जे निष्कामता[2] पावले ।**
**तयाही कर्तव्य असे उरलें । लोकांलागीं[3] ।।१५५।।**
**मार्गी अंधासरिसा । पुढा देखणाहि[4] चाले जैसा ।**
**अज्ञाना प्रकटावा धर्मु तैसा । आचरोनी[5] ।।१५६।।**

*१) कृतकार्य २) निरिच्छता ३) लोकांसाठी ४) डोळस, ज्ञानी ५) आचरण करून*

आत्मज्ञान प्राप्त झाल्यानंतरसुद्धा ज्ञानी माणसाने कर्मे करावीत. जनकादिक महात्मे कर्मे करीतच मोक्षसुखाला प्राप्त झाले. परमानंद प्राप्त होऊनसुद्धा देहधर्म व कर्मे चुकत नाहीत. माऊलींचा हा आग्रह आहे की, ज्यांनी हे सर्व प्राप्त केले आहे अशा निष्काम, निरिच्छ ज्ञानी पुरुषांनी, लोकांना वळण लावण्याकरिता कर्म करणे प्राप्त आहे. रस्त्याने आंधळ्याच्या बरोबर पुढे चालणारा डोळस मनुष्य आंधळ्यास सांभाळून घेऊन, त्याच्या बरोबर चालतो. त्याप्रमाणे अज्ञानी पुरुषाला ज्ञानी पुरुषाने आपण आचरण करून धर्म स्पष्ट करून दाखवावा. असे जर ज्ञानी पुरुषाने केले नाही तर अज्ञानी जनांना कोण मार्ग दाखविणार? कारण...

### दिनांक २८ व २९ जानेवारी

**एथ वडील[1] जें जें करिती । तया नाम धर्मु ठेविती ।**
**तेंचि येर[2] अनुष्ठिती[3] । सामान्य सकळ ।।१५८।।**
**हें ऐसें असे स्वभावें । म्हणोनि कर्म न संडावें[4] ।**
**विशेषें आचरावें । लागें संतीं[5] ।।१५९।।**

*१) श्रेष्ठ, ज्ञानी पुरुष २) इतर ३) आचरण करितात ४) सोडावे ५) संतांनी*

या जगात थोर लोक जे कर्म आचरतात, त्यालाच सामान्य लोक धर्म असे म्हणतात आणि इतर सर्वसामान्य लोक त्याचेच अनुकरण करतात. अशी स्थिती असल्यामुळे ज्ञानी पुरुषाने कर्म सोडणे बरोबर नाही. संतांनी तर याचे आचरण विशेष काळजीने केले पाहिजे. सर्व संतांनी हेच कार्य केले. जगदोद्धार हे सर्वस्व मानले. साक्षात्कार झाल्यानंतर केवळ परमानंदात ते रमले नाहीत. 'जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती ।' हे त्यांनी आचरण करून दाखविले. ज्ञानसंपन्न होऊनसुद्धा लोकांत मिसळले. "आम्ही वैकुंठवासी ।"... अशी आपली सार्थ ओळख सांगून जगद्गुरू श्री तुकाराम, ज्ञानदेव यांनी आपले अवतारकार्य सामान्य जनांत राहून संपन्न केले. संतांनी स्वतः आचारधर्म पाळला. त्यांनी जे आचरण केले त्यालाच सामान्य लोकांनी धर्म मानला. म्हणून...

### दिनांक ३० जानेवारी

**मार्गाधारें[1] वर्तावें । विश्व हें मोहरें लावावें ।**
**अलौकिक[2] नोहावें[3] । लोकांप्रति ।।१७१।।**

*१) शास्त्रसम्मत २) लोकबाह्य, जगावेगळे ३) वागू नये*

निष्काम, निःस्पृह, निरिच्छ, निरहंकारी ज्ञानी माणसाने जगापासून अलिप्त राहू नये. उलट शास्त्राने सांगितल्याप्रमाणे वागून जगास सरळमार्गाला लावावे. जगात वावरतानासुद्धा आपण जगावेगळे आहोत असेसुद्धा भासवू नये. ज्ञानी पुरुषाने निष्क्रिय राहू नये. गीता-ज्ञानेश्वरीमध्ये कर्मसंन्यासापेक्षा कर्मयोगाला अधिक प्राधान्य दिले आहे. निवृत्तिमार्गापेक्षा



ॐ

प्रवृत्तिमार्ग श्रेयस्कर आहे. कर्म मात्र फळाची अपेक्षा न करता अनासक्त बुद्धीने व्हावे म्हणजे मनुष्य कर्मबंधनात सापडत नाही. श्री ज्ञानेश्वमाऊलींनी संन्यासाची व्याख्या सहज समजण्यासारखी केली आहे. ज्याने आपल्या अंतःकरणात 'मी-माझे' असा अहंभाव सोडला तो निरहंकारी मनुष्य संन्यासी असे समजावे. अशी वृत्ती झाल्यानंतर मग भगवी वस्त्रे, जटा, दाढी, कमंडलू... असले काय आणि नसले काय... अंतःकरणात निवृत्ती व बाहेरून प्रवृत्ती ठेवून, ज्ञानी माणसाने सतत लोकसमूहामध्ये राहून धर्माचा मार्ग दाखवावा.

### दिनांक ३१ जानेवारी व १ फेब्रुवारी

हे कसे व्हावे, तेही माऊलींनी पुढील ओव्यांतून सांगितले -

**तरी उचितें[1] कर्में आघवीं[2] । तुवां आचरोनि मज अर्पावीं ।**
**परी चित्तवृत्ति न्यासावी[3] । आत्मरूपीं ।।१८६।।**
**तुवां शरीरपरा[4] नोहावें । कामनाजात[5] सांडावें ।**
**मग अवसरोचित भोगावे । भोग सकळ ।।१८८।।**

*१) विहित, योग्य २) सर्व ३) ठेवावी ४) देहाच्या ठिकाणी आसक्त ५) सर्व कामना*

गीतेतील ३०व्या श्लोकावरील हे भाष्य आहे. माऊलींनी यात कर्मयोगाचे सार कथन केले आहे. हा श्लोक व त्यावरील ओव्या म्हणजे कर्म कसे करावे हे सांगणारे मंत्र आहेत. अर्जुनाला युद्धाला प्रवृत्त करण्यासाठी भगवंतांनी हे कथन केले. स्वधर्माचा स्वीकार तरी आहेच पण ही सर्व उचित कर्मे भगवंताला अर्पण करावीत. ही करीत असताना मात्र कर्तृत्वभाव मनात न ठेवता व देहासक्त न होता कर्मरूपी फुलांनी ईश्वराची पूजा करावी. निरभिमानी व कामनारहित होऊन केलेले कसलेही कर्म बाधित होणार नाही. ज्याला 'मी करतो' ही भावना नाही व ज्याची बुद्धी अलिप्त असते, त्याने युद्ध करून शत्रूला मारले तरी ते कर्म त्याला बंधनकारक होत नाही. चित्तवृत्ती पूर्णपणे आत्मस्वरूपी ठेवून ही कर्मे ईश्वरार्पण बुद्धीने करण्यासाठी अर्जुनाला यातून प्रवृत्त केले आहे. ज्ञानी पुरुषाने आचरावयाच्या कर्माचे महत्त्व माऊलींनी येथे स्पष्ट केले आहे. सर्व कर्मांचा भोग घेतला तरी भोक्ता कोणी तरी निराळा आहे, अशा अनासक्त बुद्धीने कर्म करणे हाच खरा कर्मयोग आहे. सूर्याच्या प्रकाशाने सर्व जगाचे व्यवहार घडत असतात, पण त्याचे भान सूर्याला नसते. तसे लोकसंग्रहाकरिता कर्म करूनसुद्धा ज्ञानी पुरुष आतून पूर्णपणे निर्लेप असतो.

### दिनांक २ व ३ फेब्रुवारी

**तरी हे कामक्रोधु पाहीं । जयांतें कृपेची साठवण नाहीं ।**
**हें कृतांताच्या[1] ठायीं । मानिजती ।।२४०।।**
**हे ज्ञाननिधीचे भुजंग । विषयदरींचे[2] वाघ ।**
**भजनमार्गीचे मांग[3] । मारक जे ।।२४१।।**

*१) यमधर्म २) विषयरूपी दरीचे ३) फाशीची शिक्षा अमलात आणणारे, मारक लोक*

कोणत्याही काळात सुज्ञ पुरुषास पडणारा एक मूलभूत प्रश्न अर्जुनाने भगवंताला विचारला, 'मनात नसतानासुद्धा एखादा ज्ञानी, सुबुद्ध माणूस पाप करावयास का प्रेरित होतो? कोणत्या प्रेरणेने त्याच्या हातून अनिच्छेने का असेना पण पाप घडते?' ३६व्या श्लोकातील या प्रश्नाचे उत्तर भगवंतांनी दिले. काम व क्रोध हे रजोगुणांपासून उत्पन्न झालेले

विकार अधाशी व महापापी आहेत. तेच खरे वैरी आहेत. माऊलींनी याचा विस्तार २० ओव्यांतून केला आहे. वरील दोन ओव्या त्यातील प्रातिनिधिक स्वरूपाच्या निवडल्या आहेत.

माऊलींनी या काम व क्रोध यांना प्रत्यक्ष यमधर्माची उपमा दिली आहे. यांच्या मनात दयेचा साठा मुळीच नाही. हे ज्ञानरूपी ठेव्यावर असलेले सर्प होत. हे विषयरूपी दऱ्यात राहणारे वाघ आहेत. हे भजनरूपी रस्त्यावरील वाटमारे मांग आहेत. हे काम, क्रोध मनुष्यास पाण्यावाचून बुडवितात, अग्नीवाचून जाळतात, शस्त्रावाचून ठार करतात, दोर नसतानासुद्धा बांधतात आणि ज्ञानी माणसांना तर प्रतिज्ञापूर्वक ठार करतात.

**दिनांक ४ फेब्रुवारी**

**यांचा पहिला कुरुठा[1] इंद्रियें । एथुनि प्रवृत्ति कर्मातें विये[2] ।**
**आधीं निर्दळूनि[3] घालीं तियें[4] । सर्वथैव ।।२६८।।**

*१) घरटे, राहण्याची जागा, आश्रयस्थान २) उत्पन्न होते ३) नाहीशी करून ४) ती इंद्रिये*

काम, क्रोध या असुरी संपत्तीमुळे सर्व अनर्थ घडतो. या विनाशाला सुरुवात कशी होते व त्यावरील उपाय याचे हे वर्णन आहे. यांचे पहिले आश्रयस्थान इंद्रिये आहेत. त्यानंतर मन व बुद्धी! इंद्रियांपासूनच कर्माची प्रवृत्ती होते. म्हणून अर्जुना, आधी या इंद्रियांनाच पूर्णपणे वश करून घे. या इंद्रियांपासून इच्छा निर्माण होते व हातून कर्म घडते. म्हणून या इंद्रियांना प्रथम आवरावे. एकदा इंद्रियनिग्रह झाला की, मनाची विषयाकडील धावही कमी होते. बुद्धीची झेपही नियंत्रित होईल. एवढे झाले म्हणजे काम-क्रोधांचे बळ शिल्लक राहणार नाही. सूर्यकिरणे गेली की, मृगजळ जसे नाहीसे होते, त्याप्रमाणे काम-क्रोध यांच्यावर विजय मिळविला की अविचार, सर्वनाश, पापबुद्धी दूर राहते. सर्व पापांचे मूळ या अनिर्बंध काम-क्रोधात आहे. हे काम-क्रोध अंतःकरणातून पार निघून गेल्यानंतर अमृताचीच प्राप्ती होते.

**दिनांक ५ फेब्रुवारी**

तिसऱ्या अध्यायाच्या शेवटच्या ४३व्या श्लोकावरील निरूपणात या ब्राह्मीस्थितीचे वर्णन नेमक्या शब्दांत माऊलींनी केले आहे.

**तैसे रागद्वेष जरी निमाले[1] । तरी ब्रह्मीचें स्वराज्य आलें ।**
**मग तो भोगी सुख आपुलें । आपणचि ।।२७१।।**

*१) निःशेष गेले, नाहीसे झाले*

मोक्षाची प्राप्ती मृत्यूनंतर होते असे नाही. इंद्रिय-निग्रह करून मनोविजय प्राप्त झाला आणि मन निर्विषयच झाले की, जी स्थिती प्राप्त होते ती मोक्षाचीच अवस्था. हाच परमानंद - हीच ब्राह्मीस्थिती - हेच अमृततत्त्व. काम-क्रोध जर निःशेष गेले, तर ब्रह्मप्राप्तीरूप स्वराज्य मिळाले असे समज. मग तो पुरुष आपणच आपले सुख उपभोगितो.

कर्मयोगाचे रहस्य विशद करणारा हा अध्याय आहे.

**।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**





## अध्याय ४
## ज्ञानकर्मसंन्यासयोग

**दिनांक ६ फेब्रुवारी**

'ज्ञानकर्मसंन्यासयोग' या चौथ्या अध्यायात कर्म व ज्ञान याविषयीचे विवेचन अधिक विस्तृत व दृढ झाले आहे. ३, ४ व ५ या तीन अध्यायांत भगवान श्रीकृष्णांनी अर्जुनास ज्ञान व कर्म याविषयीच्या मूलभूत सिद्धान्तांची उकल समजावून सांगितली आहे. या अध्यायाच्या सुरुवातीस पुनर्जन्म, अवताररहस्य, कर्माचे अनादित्व, कर्म-अकर्म-विकर्म यांची चर्चा व अध्यायाच्या उत्तरार्धात ज्ञानाचे माहात्म्य, श्रद्धा-अश्रद्धा, अज्ञान-संशय यामुळे होणारा आत्मनाश यांचे विवेचन आले आहे.

श्री ज्ञानेश्वरमाऊलींनी या अध्यायाच्या ४२ श्लोकांवर एकूण २२५ ओव्यांमधून निरूपण केले आहे. भगवान श्रीकृष्णाच्या अंतःकरणातील नेमके मनोगत विशद करणाऱ्या या ओव्या आहेत. त्यातील निवडक ओव्या अशा -

**जे धर्मजात[1] आघवें । युगायुगी म्यां रक्षावें ।**
**ऐसा ओघु[2] हा स्वभावें । आद्य[3] असे ।।४९।।**

*१) सर्व धर्मविचार २) रीत, प्रघात ३) आरंभापासून*

''यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत...' या गीतेतील प्रसिद्ध व मांगलिक श्लोकावरील ही ओवी आहे. भगवंत या मनुष्यलोकात अवतार का धारण करतात याची स्पष्ट कारणे भगवंतांनी सातव्या व आठव्या श्लोकात सांगितली आहेत. वास्तविक भगवंताचे स्वरूप निर्गुण, निराकार, अव्यय, जन्मरहित असे आहे. पण जेव्हा जेव्हा धर्माचा ऱ्हास होतो, अधर्माची वाढ होते, तेव्हा तेव्हा दुर्जनांचा नाश करण्यासाठी व सज्जनांचे आणि धर्माचे रक्षण करण्यासाठी मी प्रत्येक युगात अवतार घेतो. असे अनेक दिव्य जन्म माझे झाले आहेत. माऊलींनी वरील ओवीत हा भाव विशद केला आहे. ''जेवढे धर्म म्हणून आहेत तेवढ्या सर्वांचे प्रत्येक युगात मी रक्षण करावे असा क्रम स्वभावतः अगदी मुळापासून चालत आलेला आहे.''

**दिनांक ७ व ८ फेब्रुवारी**

ईश्वरी अवताराचे हे रहस्य जो जाणतो तोच खरा विवेकी पुरुष होय. अर्जुना, खरे पाहता मी अव्यक्त, निर्गुण, जन्मरहित असून जन्माला येतो. निष्क्रिय असून कर्मे करतो. असे माझे स्वरूप ज्याने जाणले तो मलाच येऊन मिळतो.

**एऱ्हवीं तरी पाहीं । जे जैसे माझा ठाईं ।**
**भजती तया मीही । तैसाचि भजें ।।६६।।**
**देखें मनुष्यजात[1] सकळ । हे स्वभावतः[2] भजनशीळ[3] ।**
**जाहलें असे केवळ । माझा ठायीं ।।६७।।**

*१) एकूण सर्व माणसे २) जन्मजात स्वभाव-वृत्ती ३) भजनात-भक्तीत गोडी असणारे*

'ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्...' या ११व्या श्लोकावरील माऊलींचे हे निरूपण आहे. जे जसे मला भजतात त्यांना तसाच मीही भजतो (तसेच फळ देतो). सर्व मनुष्यमात्रांचा स्वाभाविक कल माझी भक्ती करण्याकडेच असतो.''

या ओवीत भक्तीचे रहस्य सामावले आहे. आपली भक्ती जशी व जेवढी उत्कट असेल तेवढीच ती भगवंताच्या चरणी रुजू होते. अध्यात्मात सर्व काही रोखठोक आहे. ईश्वर सर्वांच्या अंतःकरणात अंशरूपाने आहे. तो सर्वज्ञ आहे. भक्ती हे पूर्ण शास्त्र आहे. जसा भाव तसा देव. यात झटपट (Instant) व शॉर्टकट नाही. ईश्वराचे यथार्थ स्वरूप समजून न घेता अज्ञानाने त्याचे पूजन करणे व ईश्वराला आवडणाऱ्या गोष्टी सोडून इतर गोष्टींचा हव्यास करणे यामुळे अपेक्षित फळे आपणास प्राप्त होत नाहीत. हृदय व बुद्धी, भक्ती व ज्ञान या दोन्हींची आवश्यकता अध्यात्ममार्गात आहे. सकळ मनुष्यजात हे स्वभावतः जरी भजनशील असले तरी ''परी ज्ञानेवीण नाशिले'' असे माऊली या पुढील ओवीत (ओवी ६८) म्हणते.

## दिनांक ९ व १० फेब्रुवारी

**तैसें सर्व कर्मीं असणें । ते फुडे मानूनि वायाणें[1] ।**
**मग आपणपें जो जाणे । नैष्कर्म्यु[2] ऐसा ।।१८।।**
**आणि उदोअस्ताचेनि[3] प्रमाणें । जैसें न चलतां सूर्याचें चालणें ।**
**तैसें नैष्कर्म्यत्व जाणे । कर्मीचि असतां ।।१९।।**

*१) खोटे, आभास २) कर्मरहित अवस्था ३) सूर्याचा उदय व अस्त*

चौथ्या अध्यायात माऊलींनी गीतेप्रमाणेच कर्म, अकर्म, विकर्म यांच्या व्याख्या केल्या आहेत. कर्माची गती अतिमहान, गहन आहे. ईश्वराच्या दरबारात तुम्ही कर्म कोणत्या भावाने व कसे केलेत हे पाहिले जाते. कर्मे करूनही कर्मबंधनातून सुटण्याचा मार्ग १८ ते २३ पर्यंतच्या श्लोकांमध्ये दाखविला आहे. वरील दोन ओव्यांत माऊली सूर्याच्या दृष्टान्ताद्वारे हे समजावून सांगतात. चिखल-पाण्यात राहूनदेखील कमलपत्राप्रमाणे अलिप्त राहायचे. नियत कर्मे करायची, पण त्या कर्मांनी लिप्त व्हायचे नाही. बाहेरून प्रवृत्ती व आतून निवृत्ती अशा अवस्थेत निष्काम भावनेने कर्मे केली की, ही अकर्म, कर्मरहित, नैष्कर्म्य अवस्था प्राप्त होते. अशी अनासक्त अवस्था ज्याच्यात असते तो खरा ज्ञानी पुरुष होय. हे समजावण्यासाठी श्री ज्ञानेश्वर विज्ञानाचा एक सार्वकालिक शास्त्रीय सिद्धान्त सांगत आहेत. सूर्य उगवतो-सूर्य मावळतो यामध्ये सत्य हे आहे की, सूर्य स्थिर आहे. सूर्य चालत नाही. पण पृथ्वी त्याच्या भोवती फिरत असते. ती पृथ्वी जेव्हा प्रकाशात येते तेव्हा उदय होतो व जेव्हा सूर्याआड जाते तेव्हा अंधार-अस्त होतो. सूर्य स्थिर असताना सकाळ व संध्याकाळ जशी पृथ्वीच्या भ्रमणातून होते त्यामुळे कर्मे करीत असतानाही ज्ञानी पुरुष कर्मरहित असतो. हे पटविण्यासाठी श्री ज्ञानेश्वर येथे आणखी दृष्टान्त देतात. पाण्याच्या काठी उभा राहून मनुष्य आपले प्रतिबिंब पाहतो पण आपण वेगळे आहोत हे तो जाणतो. अथवा नावेतून चालले असता नदीकाठचे वृक्ष वेगाने जातात हे भासत असले तरी आपण जात आहोत व वृक्ष स्थिर आहेत हे सत्य आहे. ज्ञानी पुरुषाची अवस्था अशी स्थिर असते.

## दिनांक ११, १२ व १३ फेब्रुवारी

अशा श्रेष्ठ ज्ञानी ब्रह्मपुरुषाचे वर्णन १९व्या श्लोकावर निरूपण करीत असताना श्री ज्ञानेश्वरांनी केले आहे. त्या ओव्या अशा...

**जया पुरुषाच्या ठायीं । कर्माचा तरी खेदु नाहीं ।**
**परी फळापेक्षा[1] कहीं[2] । संचरेना[3] ।।१०३।।**





**आणि हें कर्म मी करीन । अथवा आदरिलें[4] सिद्धी नेईन ।**
**येणें संकल्पेंही जयाचें मन । विटाळेना ।।१०४।।**
**ज्ञानाग्नीचेनि मुखें । जेणें जाळिलीं कर्मे अशेखें[5] ।**
**तो परब्रह्मचि मनुष्यवेखें[6] । वोळख तूं ।।१०५।।**

*१) फळाची इच्छा २) कधी ३) उत्पन्न होईना ४) प्रारंभिलेले ५) संपूर्ण ६) मनुष्य रूपाने*

ज्ञानी पुरुष या मनुष्यलोकातच परब्रह्मस्वरूप कसा असतो त्याचे हे वर्णन आहे. नैष्कर्म्य-कर्मे करूनही अकर्ता अशा स्थितीत कर्मे करायची पण त्यांच्या फळांची यत्किंचितही अभिलाषा धरायची नाही. कर्माचा तिरस्कार न करता, अनासक्त वृत्तीने ती करायची. मी अमुक एक कर्म करीन अथवा आरंभिलेले पूर्ण करीन अशा कर्तृत्वाभिमानाने त्याचे मन विटाळत नाही. आत्मज्ञानीरूप अग्नीच्या मुखात ज्याने सर्व कर्मे जाळून टाकली आहेत असा तो मनुष्याच्या रूपात असलेले परब्रह्मच असे तू समज. कर्तृत्व आणि भोक्तृत्व याचा स्पर्शही न झाल्याने असा ज्ञानी पुरुष सदैव प्रसन्नचित्त, आत्मतृप्त, समचित्त व आत्मौपम्य वृत्तीने जगाकडे पाहणारा असतो. सर्व जगाकडे आत्मरूप होऊन पाहणाऱ्या अशा ज्ञानी पुरुषाला बंधनकारक होईल असे कर्म शिल्लक राहत नाही. अद्वेष्टा, निर्मत्सर, निरहंकारी अशा सर्व दैवीगुणांची खाण त्याच्या ठायी वसत असल्याने तो मनुष्यरूपात देह धारण करणारा असला तरी गुणरहित, अकर्ता अशा परब्रह्माच्या रूपाशी तादात्म्य पावलेला असतो.

## दिनांक १४, १५, १६ व १७ फेब्रुवारी

**तें ज्ञान पैं गा बरवें । जरी मनीं आथि[1] आणावें ।**
**तरी संतां यां भजावें । सर्वस्वेंसीं ।।१६५।।**
**ते ज्ञानाचा कुरुठा[2] । तेथ सेवा हा दारवंटा[3] ।**
**तो स्वाधीन करी सुभटा[4] । वोळगोनी[5] ।।१६६।।**
**तरी तनुमनुजीवें । चरणांसीं लागावें ।**
**आणि अगर्वता[6] करावें । दास्यसकळ ।।१६७।।**
**मन अपेक्षित जे आपुलें । तेही सांगती पुसिलें ।**
**जेणें अंतःकरण बोधलें । संकल्पा न ये ।।१६८।।**

*१) आहे २) घर, आश्रयस्थान ३) उंबरठा ४) चांगल्या योद्ध्या! (अर्जुन) ५) सेवा करून ६) अभिमान सोडून*

गुरूकडून ज्ञान आत्मसात कसे करावे याचा उपदेश वरील ओव्यांतून माऊलींनी केला आहे. 'तद् विद्धि प्रणिपातेन...' या ३४व्या श्लोकावरील हे निरूपण आहे. ''अरे, अर्जुना, ते उत्तम ज्ञान जर लाभावे असे मनात असेल तर या संतांस सर्वस्वेकरून तू भजावेस. कारण ते ज्ञानाचे घर आहे. त्यांची सेवा हा त्या घराचा उंबरठा आहे. अर्जुना, तू सेवा करून स्वाधीन करून घे. एवढ्याकरिता शरीराने, मनाने व जीवाने त्यांच्या चरणी लागावे आणि त्यांची सर्व सेवा करावी. मग आपले जे इच्छित असेल, ते त्यांस विचारले असता ते सांगतात. त्या त्यांच्या उपदेशाने अंतःकरण ज्ञानसंपन्न होऊन पुन्हा संकल्पाकडे वळणार नाही.''

## दिनांक १८ व १९ फेब्रुवारी

श्लोक ३३ ते ४२ या सर्व श्लोकांतून ज्ञानाचा महिमा वर्णन केला आहे. श्रीगुरूच्या कृपेने एकदा ज्ञान झाले की, मग मोहरूप अंधकार नष्ट होईल. सर्व यज्ञांत ज्ञानयज्ञ श्रेष्ठ आहे. हे ज्ञान म्हणजे सर्व कर्मांचा शेवट होय. अशा ज्ञानाचे सामर्थ्य किती व कसे आहे याचे वर्णन पुढील ओव्यांतून माऊलींनी केले आहे.

**जरी कल्मषांचा[1] आगरु[2] । तूं भ्रांतीचा सागरु ।**
**व्यामोहाचा[3] डोंगरु । होऊनी असंसी ।।१७२।।**
**तऱ्ही ज्ञानशक्तिचेनि पाडें[4] । हें आघवेंचि गां थोकडें[5] ।**
**ऐसें सामर्थ्य असे चोखडें[6] । ज्ञानीं इये ।।१७३।।**

*१) पापाचा २) मळा, खाण ३) भ्रमाचा ४) विचारशक्तीशी तुलता ५) लहान ६) उत्कृष्ट, सुंदर*

'सर्व पापी माणसांमध्ये अत्यंत पाप करणारा जरी तू असलास, तरी ज्ञानरूपी नौकेने सर्व पातके तरून जाशील' असा अर्थ असणाऱ्या ३६व्या श्लोकावरील हे निरूपण आहे. माऊलींची शब्दरचना, उपमा-उत्प्रेक्षा हे अलंकार याचे वैभव वरील ओव्यांत ठळकपणे जाणवते. 'तू पापाचे आगर, भ्रांतीचे सागर, व्यामोहाचा डोंगर जरी असलास तरी ज्ञानशक्तीच्या पुढे हे सगळे किरकोळ आहे. असे या ज्ञानाच्या अंगी निर्दोष सामर्थ्य आहे.'

## दिनांक २० व २१ फेब्रुवारी

'न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते'... या घोषवाक्याचा दर्जा असणाऱ्या प्रसिद्ध श्लोकावरील (अध्याय ४, श्लोक ३८) विवरणही महत्त्वाचे आहे. श्री ज्ञानेश्वरांनी त्यासाठी अमृताची उपमा योजिली आहे. त्या ओव्या अशा...

**म्हणूनि बहुतीं परीं पाहतां । पुढतपुढती[1] निर्धारितां ।**
**हे ज्ञानाची पवित्रता । ज्ञानींचि आथि[2] ।।१८२।।**
**जैसी अमृताची चवी निवडिजे । तरी अमृतचि सारिखी म्हणिजे ।**
**तैंसे ज्ञान हें उपमिजे । ज्ञानेसींचि ।।१८३।।**

*१) वारंवार २) आहे*

ज्ञानासारखे पवित्र दुसरे काही नाही. ज्याप्रमाणे दुसरे चैतन्य नाही, त्याप्रमाणे ज्ञानासारखे दुसरे काही उत्तम नाही. पृथ्वीच्या तोलाचे जसे दुसरे काही नाही, तसे ज्ञानाचे आहे. एवढे सांगून झाल्यावर वरील ओव्यांतून ज्ञानाचा महिमा माऊलींनी वर्णन केला आहे. 'म्हणून अनेक प्रकारांनी विचार केला असता व पुनःपुन्हा निर्णय करून पाहिले असता असे दिसते की, ज्ञानाची पवित्रता ही फक्त ज्ञानाच्याच ठिकाणी आहे. अमृताची चव कशासारखी आहे हे निवडू जाता ती अमृतासारखीच, असे ज्याप्रमाणे म्हणावे लागते त्याप्रमाणेच ज्ञानाला ज्ञानाचीच उपमा देणे भाग आहे.'

## दिनांक २२ फेब्रुवारी

असे पवित्र ज्ञान कसे प्राप्त करून घ्यावे? असे अर्जुन विचारणार तोच, ते मनोगत ओळखून ज्ञानाच्या प्राप्तीचा उपायही भगवंतांनी सांगितला. श्रद्धावान, तत्पर आणि जितेंद्रिय अशा मनुष्याला ज्ञान प्राप्त होते, व असे ज्ञान प्राप्त झाले की त्याच्या अंतःकरणात शांती स्थित होते.





**तें ज्ञान हृदयीं प्रतिष्ठे[1] । आणि शांतीचा अंकुर फुटे ।**
**मग विस्तार बहु प्रकटे । आत्मबोधाचा ।।१९०।।**

*१) स्थिर, प्रतिष्ठित होणे.*

**अर्थ -** ते ज्ञान अंतःकरणात स्थिर होते आणि मग शांतीचा अंकुर फुटतो. मग आत्मज्ञानाचा विस्तार पुष्कळच प्रकट होतो.' अशा ज्ञानी पुरुषाला सर्वत्र शांतीचा अनुभव येतो.

श्रद्धाहीन, अज्ञानी, संशयी पुरुषाला हे ज्ञान कधीच प्राप्त होत नाही. अंतःकरणातील सर्व संशयांचे निराकरण झाल्याशिवाय ज्ञानप्राप्ती व शांती प्राप्त होणार नाही. म्हणून अर्जुनाने आपल्या हृदयातील संशय दूर करून युद्धास प्रवृत्त व्हावे.

## दिनांक २३ फेब्रुवारी

या अध्यायाच्या शेवटच्या ४२ व्या श्लोकावरील निरूपणात माऊलींनी शांतरसाचा आविष्कार कसा घडेल याचेही वर्णन केले आहे.

**जैसें बिंब[1] तरी बचकेएवढें । परि प्रकाशा त्रैलोक्य थोकडें[2] ।**
**शब्दाची व्याप्ति तेणें पाडें । अनुभवावी ।।२१५।।**

*१) सूर्याचे मंडल २) लहान, अल्प*

तो शांतरसच ज्यात अपूर्वतेने प्रकटेल, जे अर्थपूर्ण व समुद्रापेक्षा गंभीर आहेत, ते मराठी बोल ऐका. 'सूर्यबिंब जरी बचकेएवढे दिसते, तरी त्याच्या प्रकाशाला त्रिभुवन अपुरे पडते. त्याचप्रमाणे या शब्दांची व्याप्ती आहे, असे अनुभवास येईल.'

आत्मज्ञानाचा प्रकाश केवढा असतो हे सांगण्यासाठी ज्ञानेश्वरांनी वरील ओवीत सूर्याचा दृष्टांत दिला आहे. आत्मबोधाची शक्ती या प्रकाशाप्रमाणे विश्वमय होणारी आहे. अशा आत्मज्ञानी पुरुषाचे वर्णन श्री ज्ञानेश्वरांनी अनेक ठिकाणी केले आहे. आत्मज्ञानाने शांतीचा अंकुर फुटतो. जेथे दृष्टी जाईल तेथे आत्म्याचाच प्रकाश जाणवतो. हा शांतरस प्रकट करण्याचे अद्भुत सामर्थ्य माऊलींच्या शब्दांत आहे.

**।।श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**

ॐ

## अध्याय ५
## कर्मसंन्यासयोग

**दिनांक २४, २५, व २६ फेब्रुवारी**

पाचव्या अध्यायात श्री ज्ञानेश्वरमाऊलींनी कर्माचा त्याग व कर्माचे अनुष्ठान याविषयी पुनःपुन्हा विस्तृत चर्चा केली आहे. गीतेतील २९ श्लोकांवर माऊलींनी १८० ओव्यांतून हे निरूपण केले आहे. अध्यायाचा आवाका छोटा असला तरी 'कर्म' व 'संन्यास' या अत्यंत जिव्हाळ्याच्या व मौलिक विषयावर आपला निःसंदिग्ध निर्वाळा दिला आहे.

कर्म हा आपल्या अंतःकरणाचा, मनाचा आरसा आहे. जशी बुद्धी तसे कर्म. मनातील काम, क्रोध, लोभ असे नानाविध विकार या कर्मातून प्रगट होत असतात. प्रपंचात, सार्वजनिक जीवनात, व्यवसायात ही कर्मे करीत असताना ती कधी स्वधर्माचरणाच्या मर्यादेत होतात तर कधी त्याविरुद्ध होतात. कधी साक्षीभावाने अलिप्त राहून विहित कर्मे हातून घडतात, तर कधी कळत अथवा नकळत मोहवश होऊन, भ्रान्तबुद्धीने अधर्माचरण घडते. कर्माची गती गहन, अनाकलनीय, गूढ अशीच आहे. कर्म तर करायचे पण कर्मबंधनातून कसे सुटायचे, याचा मार्ग माऊलींनी या अध्यायात दाखविला आहे.

साधकाच्या जीवनात कर्माला, भक्तीचा, ज्ञानाचा सुगंध आला पाहिजे. संतांचे प्रत्येक कर्म सहज होत असते. शुद्ध अंतःकरण व निष्काम, निर्हेतुक कर्म होत असल्याने संतांचे सहज बोलणे-चालणे हाच हितोपदेश होत असतो. असे कर्म सत्कर्म ठरते व ते सर्वांनाच उपकारक, कल्याणप्रद होत असते.

तसे कर्म घडणे हाच खरा कर्मयोग! व असे कर्म करीत असता अंतःकरणात निर्विकार, अलिप्त आसक्तीविरहित राहणे यालाच संन्यस्त वृत्ती म्हणतात. बाहेरून प्रवृत्ती व आतून निवृत्ती असणाऱ्यांचे कर्म हे दैवी कर्म ठरते. कर्म करूनही करीत नाही असे जे वाटणे तोच संन्यास. निष्काम कर्म हे जेव्हा ज्ञानपूर्वक होते तेव्हा ते असे संन्यासरूप होते. पाचव्या अध्यायाच्या सुरुवातीला माऊलींनी 'संन्यासा'ची व्याख्या किती सोपी केली आहे. श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतात -

**आणि मी माझें ऐसी आठवण । विसरलें जयांचें अंतःकरण ।**
**पार्था तो संन्यासी जाण । निरंतर[1] ।।२०।।**
**जो मनें ऐसा जाहला । संगीं तोचि सांडिला ।**
**म्हणोनि सुखें सुख पावला । अखंडित ।।२१।।**
**आतां गृहादिक[2] आघवें[3] । ते कांहीं नलगे त्यजावें ।**
**जें घेतें जाहलें स्वभावें । निःसंगु[4] म्हणऊनि ।।२२।।**

*१) सर्व काळ २) घर, प्रपंच वगैरे ३) सर्व ४) सर्व संग सोडून*

**अर्थ -** आणि ज्याच्या अंतःकरणामध्ये 'मी' आणि 'माझे' याचे स्मरणच राहिले नाही, अर्जुना, तो सदोदित संन्यासीच आहे, असे तू जाण. ।।२०।।

ज्याच्या मनाची अशी तयारी झाली, त्याला संगच सोडून जातात. म्हणून त्याला शाश्वत सुखाची अनायासे प्राप्ती होते. ।।२१।।



ॐ

अशा स्थितीत घर, प्रपंच वगैरे सर्वांचा त्याग करण्याची काही जरुरी नाही. कारण त्यांची आसक्ती घेणारे जे मन, तेच स्वभावतः निःसंग झाले आहे. ।।२२।।

ज्याच्या बुद्धीत संकल्प-विकल्प नाही, तो उपाधीत असूनसुद्धा कर्मबंधनात सापडत नाही. अहंकर्तृत्व व अहंभोक्तृत्व सुटले की तो संन्यासीच. 'मी हे करीन, हे माझ्यामुळे घडले, हे माझे कर्तृत्व आहे... हा माझा, तो माझा, हा अहंभाव बुद्धीतून निघून गेला की, निष्कामता आलीच. निरहंकारी, निष्काम, निःस्पृह, निर्हेतुक वृत्ती हीच संन्यस्तवृत्ती. संन्यासी होण्यासाठी भगवी वस्त्रे परिधान करून हिमालयातच गेले पाहिजे असे नाही. अरण्यात जाऊनसुद्धा मनात संसार असेल किंवा भगवी वस्त्रे घालूनसुद्धा आसक्ती सुटली नसेल तर तो संन्यासी कसला? एकदा भगवंत अंतःकरणात व्यापून राहिल्यानंतर प्रपंच, बायकामुले, घरसंसार इत्यादींची काहीही आडकाठी येत नाही. प्रपंचाचा परमार्थ व परमार्थाचा प्रपंच होणे हीच भक्तीची कृतार्थ अवस्था. ज्याचे ऐहिक धड नाही त्याचा परमार्थसुद्धा बऱ्याच वेळा रखडतो. सर्व संतांनी एकमुखाने परमार्थासाठी प्रपंच न सोडण्याचा उपदेश केला आहे. संत तुकाराम म्हणतात,

**बैसोनि निवांत शुद्ध करी मन । तया सुखा अंतपार नाही ।।**
**येऊनी अंतरी राहील गोपाळ । सायासाचे फळ बैसलीया ।।**

प्रपंचाचे चटके सहन करूनसुद्धा तुकारामांनी हा उपदेश केला व ज्यांनी स्वतःचा प्रपंच न करता जगाचा संसार केला त्या संत रामदासांनी आधी प्रपंच नेटका करून नंतर परमार्थ करावा असे सुनावले.

म्हणून संन्यास व कर्मयोग हे दोन्हीही सारखेच मोक्षदायक असले तरी कर्ममार्ग हा सर्वांना सरळ व सोपा आहे. ज्याची देहासक्ती सुटली तो संन्यासी, मग तो प्रपंचात असो वा नसो. अशा अनासक्त पुरुषाला शाश्वत सुखाची अखंड प्राप्ती होते. जो मनाने-बुद्धीने असा निःसंग झाला त्याला घरदार सोडावे लागत नाही. संकल्पविरहित निष्काम बुद्धी हाच संन्यास व तोच कर्मयोग होय. वरील तीन ओव्यांत पाचव्या अध्यायाचे वर्म माऊलींनी व्यक्त केले आहे.

**दिनांक २७ व २८ फेब्रुवारी**

कर्मापासून अलिप्त असणाऱ्या व कर्मबंधनातून मुक्त असणाऱ्या योग्याचे वर्णन गीतेतील ८, ९, १० या श्लोकांत आले आहे. यातील १०व्या श्लोकावरील माऊलींनी केलेले भाष्य नेमका भावार्थ सांगणार आहे. शुद्ध कर्मे भगवंताला अर्पण करीत असताना आपली वृत्ती अनासक्त कशी असावी याचे उत्तम वर्णन दिव्याच्या प्रकाशाचा दृष्टान्त देऊन केले आहे.

**दीपाचेनि प्रकाशें । गृहींचे व्यापार जैसे ।**
**देहीं कर्मजात तैसें । योगयुक्ता[1] ।।४९।।**
**तो कर्में करी सकळें । परी कर्मबंधा नाकळे ।**
**जैसें न सिंपे[2] जळीं जळें । पद्मपत्र ।।५०।।**

*१) योगी पुरुषाला २) भिजत नाही*

**अर्थ -** दिव्याच्या उजेडावर ज्याप्रमाणे घरातील सर्व व्यवहार चालतात, त्याप्रमाणे (ज्ञानाच्या प्रकाशात) योगयुक्ताची सर्व कर्मे देहात चालतात. ।।४९।।

ज्याप्रमाणे कमळाचे पान पाण्यात असून पाण्याने लिप्त होत नाही, त्याप्रमाणे तो सर्व कर्मे करतो, परंतु कर्मबंधनाने बद्ध होत नाही. ।।५०।।

सर्व व्यवहार घडत असताना दिव्याला त्याचे काही सोयरसुतक नसते. दिवा जसा निर्लेप, निश्चल, सुखदुःखद्वंद्वरहित असतो तसाच योगयुक्त प्रपंचात असतो. इतरांच्या सारखे जगाचे सर्व व्यवहार तो करतो पण अनासक्तवृत्तीने. 'मी

ॐ

कर्म करतो' अशी अहंकारबुद्धी व कर्तृत्वाभिमान नसल्यामुळे, वासनारहित झालेली अशी कर्मे पूर्ण शुद्ध व सात्त्विक असतात. अशीच कर्मे भगवंताला अर्पण करावयाची असतात.

अनासक्तीचा दिव्य मंत्र या १०व्या श्लोकातून भगवान श्रीकृष्णांनी गीतेत दिला आहे. महात्मा गांधींनी गीतेतून हा अनासक्त योगच स्वीकारला व जीवनात अखेरपर्यंत आचरून दाखविला. ज्ञानेश्वरमाऊलींनी गीतेतून भक्तियोग जसा प्रभावीपणे मांडला तसा प्रत्येक थोर महात्म्यांनी वेगवेगळा संदेश गीतेतून प्राप्त केला आहे. लोकमान्य टिळकांनी निष्काम कर्मयोगाचा पुरस्कार केला तर भगवान श्री आदिशंकराचार्यांनी ज्ञानयोगाचे प्रतिपादन केले.

कर्माच्या ठिकाणचा कर्तृत्वभाव ईश्वराच्या ठिकाणी अर्पण केल्याने कर्माचा दोष आपल्याला चिकटत नाही. अशीच कर्मरूपी फुले भगवंताला अर्पण केल्याने भगवंत संतुष्ट होतो. हीच खरी पूजा. ज्या कर्मात वासना, आसक्ती व फळाची अपेक्षा आहे असे दोषयुक्त कर्म भगवंताला कसे आवडेल?

आसक्ती हेच दुःखांचे मूळ आहे. प्रपंचात जेवढी आसक्ती आपण ठेवतो तेवढे आपण सुखदुःखाच्या भोवऱ्यात अडकतो. 'मी' 'माझे' करीत आयुष्य केव्हा सरते याचे भानही आपल्याला राहत नाही. त्यामुळे वेळीच सावध होऊन हा अनासक्तयोग जीवनात आचरला तर सुखाचा सोपान मिळाल्याशिवाय राहणार नाही.

## दिनांक १ मार्च

श्री ज्ञानेश्वरमाऊलींनी ज्ञानी व योगी पुरुषाची लक्षणे या अध्यायात अनेक ओव्यांतून सांगितली आहेत. गीतेच्या अध्यायास अनुसरून जरी हा भावार्थ कथन केलेला असला, तरी उपमा, दृष्टान्त यांच्या साहाय्याने गहन सिद्धान्त सोपा करून विशद केला आहे. १९व्या श्लोकावरील निरूपणात ते म्हणतात,

**म्हणोनि सर्वत्र सदा सम[1] । ते आपणचि अद्वय[2] ब्रह्म ।**
**हें संपूर्ण जाणें वर्म[3] । समदृष्टीचे ।।९६।।**

*१) भेदरहित, एकसारखे २) एकमेव ३) रहस्य*

**अर्थ -** म्हणून सर्व ठिकाणी ज्ञानी पुरुषाला विश्वात आपणाहून भिन्न असे काही दिसत नाही. आत्मौपम्य दृष्टीने जगाकडे पाहत असल्याने तो सर्व जीवांना स्वतःप्रमाणेच मानतो.

असे योगयुक्त पुरुष सर्व कर्मे भगवंताला अर्पण करून चित्त स्थिर करतात. अहंकारशून्य झाल्यामुळे भेदाभेद पूर्ण गळून पडतो व सर्वत्र समदृष्टीने पाहत असल्याने हा हत्ती, हा चांडाल, हा ब्राह्मण, हा शूद्र, हा माझा, हा परक्याचा असा भेद त्याच्या चित्तातून निघून जातो. अशा अवस्थेत तो स्वतःच अद्वैत ब्रह्मस्वरूप होतो. असा पुरुष आत्मसुखात रत असल्यामुळे बाह्यविषयांपासून सतत अनासक्त राहतो.

## दिनांक २, ३, ४ व ५ मार्च

जी माणसे आत्मलाभापासून वंचित असतात तीच भोगविषयात रममाण होतात. विषय व इंद्रिये यांच्या संयोगाने उत्पन्न होणारे जे भोग ते दुःखालाच कारण होतात. कारण त्यांना आदि आहे व अंत आहे. ज्ञानी पुरुष त्यांच्या ठिकाणी रममाण होत नाहीत. या अर्थाच्या गीतेतील २२व्या श्लोकावर माऊलींनी रोजच्या जीवनातील दृष्टान्त देऊन भोगविषयाचा हा शाश्वत सिद्धान्त खूप सोपा करून समजावला आहे. संपूर्ण ज्ञानेश्वरीत विषयासंबंधीचा हा विषय माऊलींनी पुनःपुन्हा समरसतेने कथन केला आहे. त्यातील काही निवडक ओव्या अशा -



ॐ

**एऱ्हवी विषयीं काही सुख आहे । हे बोलणेंचि सारिखे[1] नोहे ।**
**तरी विद्युत्स्फुरणे[2] कां न पाहे । जगामाजीं ।।११३।।**
**हे असो आघवी बोली । सांग पां सर्पफणीची साउली ।**
**ते शीतल होईल केतुली[3] । मूषकासी ।।११७।।**
**जैसा आमिषकवळु[4] पांडवा । मीनु[5] न सेवी तंवचि बरवा ।**
**तैसा विषयसंगु आघवा । निभ्रांत जाणे ।।११८।।**
**म्हणोनि विषयभोगीं जे सुख । तें साद्यन्तचि[6] जाण दुःख ।**
**परि काय करिती मूर्ख । ते सेवितां न सरे ।।१२०।।**

*१) योग्य २) विजेच्या चमकण्याने ३) किती ४) मांसाचा घास ५) मासा, मत्स्य*
*६) मुळापासून अखेरपर्यंत*

**अर्थ -** एऱ्हवी विषयामध्ये काही सुख आहे, हे म्हणणे बोलण्याच्यासुद्धा योग्यतेचे नाही. नाहीतर विजेच्या चमकण्याने जगामध्ये का उजाडत नाही. ।।११३।।

हे सर्व प्रतिपादन राहू दे. तूच सांग, सर्पाच्या फणीची सावली आहे, ती उंदराला कितपत शांत करणारी होईल बरे? ।।११७।।

अर्जुना, ज्याप्रमाणे गळाला लावलेल्या आमिषाचा पिंड जोपर्यंत मासा गिळत नाही, तेथपर्यंतच ठीक. त्याप्रमाणे विषयांच्या संगाची स्थिती आहे. हे तू निःसंशय समज. ।।११८।।

म्हणून विषयांच्या उपभोगामध्ये जे सुख असते, ते प्रारंभापासून शेवटपर्यंत दुःखच आहे हे समज. परंतु काय करतील मूर्ख? विषयांचे सेवन केल्याशिवाय त्यांचे चालतच नाही. ।।१२०।।

ज्ञानी पुरुषांना विषय हे विषासारखे वाटतात. हे पुरुष निरिच्छ, निःस्पृह असल्याने विषयभोगांनी दाखविलेले दुःखरूपी, अल्पकाळ टिकणारे सुख त्यांना मोहवत नाही. अंतःकरणात ब्रह्मसुख अनुभवत असल्याने, सुखाचा आभास निर्माण करणारे विषयभोग त्यांना खुणवत नाहीत.

पण प्रपंचात सामान्य पुरुष इंद्रियविषयांनाच सत्य मानून सुखदुःखांच्या लाटावर सतत हिंदकळत असतो. वस्तूपासून सुख मिळते हा केवळ भ्रम आहे. सुखाचा तो केवळ आभास आहे. इंद्रिय-भोग विषयांपासून जे सुख मिळते ते अल्पकाळ टिकणारे आहे. विषयी लोकच बाह्यवस्तूत सुख मानतात. त्यामुळे प्रपंचात आज ही वस्तू तर उद्या ती वस्तू अशी वस्तूंची रास करण्यातच सुखाचा शोध घेत असतात. तहानेने व्याकुळ झालेले हरीण खरे पाणी सोडून जसे मृगजळाच्या पाठीमागे धावते, त्याप्रमाणे आत्मसुखाचा स्पर्श न झालेले लोक विषयसुखाच्या मागे अखंड धावत असतात. विषयसुख भोगल्याने जर पूर्ण आनंद झाला असता तर पुनःपुन्हा तोच तोच विषयभोग घेण्यासाठी जीव आसुसला नसता. आत्मस्वरूपी पोचलेला पुरुष इंद्रियवृत्ती जाणत नाही. आत्मसुखाने तो तृप्त असल्याने तो बाह्यविषयांचे सेवन कधी करत नाही. उंदराला जसे सापाच्या फणीच्या सावलीत आनंद वाटणार नाही तसे अल्पकाळ सुखाचा आभास निर्माण करणाऱ्या विषयभोगात सुज्ञ पुरुष रमत नाही. आत्मसुखाचे अमृत मिळाल्यानंतर बाह्यविषयांच्या सुखाकडे कोण वळेल?

वरील ओव्या या विषयसुखासंबंधीचे निश्चित व नेमके स्वरूप सांगणाऱ्या आहेत.

**।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**

ॐ

## अध्याय ६
## आत्मसंयमयोग

**दिनांक ६ मार्च**

भगवद्गीतेतील सहाव्या अध्यायावर श्री ज्ञानेश्वरमाऊलींनी ४९७ ओव्यांचे निरूपण केले आहे. या अध्यायाचा विषय ध्यानयोगाचा आहे. चौथ्या व पाचव्या अध्यायात अर्जुनाने केवळ कर्मयोगासंबंधीच प्रश्न विचारले. कर्मसंन्यास व कर्मयोग या दोहोंत श्रेष्ठ मार्ग कोणता यासंबंधीचे संपूर्ण विश्लेषण करून त्यांची एकवाक्यताही भगवंतांनी या दोन्ही अध्यायात करून दिली. पण ही सिद्धी ज्या साधनांनी प्राप्त होते ते सांगावयाचे राहून गेले. तिसऱ्या अध्यायात बीजरूपाने या इंद्रियनिग्रहाचा विषय येऊन गेला. आता या सहाव्या अध्यायात हा विषय पूर्णपणे फळरूपास आला आहे. आत्मसंयम हे परमार्थातील पायाभूत तत्त्व आहे. इंद्रियसंयम करून विकारांना आवर घातल्याशिवाय परमार्थात प्रगती नाही. अंतःकरणशुद्धीसाठी शम, दम, वैराग्य या साधनांनी जीवन संयमित झाले की, परमार्थ संपन्न व्हायला लागतो. म्हणून या अध्यायाचे महत्त्व अपरंपार आहे.

या अध्यायातील पहिल्या श्लोकावरील माऊलींची पुढील ओवी कर्मयोग्याची व्याख्या करणारी आहे -

**आइकें सकळ संमतें जगीं । अर्जुना गा तोचि योगी ।**
**जो कर्मे करूनि रागी[1] । नोहेचि[2] फळीं ।।४३।।**

*१) इच्छायुक्त, आसक्ती २) होत नाही*

**अर्थ** - अर्जुना, ऐक. जो कर्माचे आचरण करून त्याच्या फलाविषयी आसक्त होत नाही, तोच या जगामध्ये सर्वांना मान्य असलेला योगी होय.

एका ओवीमध्ये माऊलींनी ही योग्याची व्याख्या केली आहे. कर्मफलाची इच्छा न धरता जो शास्त्राप्रमाणे आपले विहित कर्तव्यकर्म करतो तोच संन्यासी व तोच कर्मयोगी म्हणायचा. काम्यबुद्धीचा किंवा फलाशेचा त्याग करणे हेच योग्याचे लक्षण आहे. बुद्धीत निष्कामभाव आला की, असे आचरण होते. निरहंकारी बुद्धीने फळाची आशा न धरता जो कर्मे करतो तोच योगी.

**दिनांक ७ मार्च**

श्री ज्ञानेश्वरांनी आपल्या या भावार्थ दीपिकेचे प्रयोजन पुढील ओवीत स्पष्ट केले आहे -

**तेणें कारणें मी बोलेन । बोलीं अरूपाचे[1] रूप दावीन ।**
**अतींद्रिय[2] परि भोगवीन । इंदियांकरवीं ।।३६।।**

*१) जो निराकार, निर्गुण आहे असा २) इंद्रियातीत, इंद्रियापलीकडचा*

**अर्थ** - त्या सद्‌गुरुकृपेच्या आधारावर, मी व्याख्यान करीन व माझ्या व्याख्यानात निराकार ब्रह्माचे स्पष्ट रूप दाखवीन आणि जरी ते ब्रह्म इंद्रियांना गोचर होण्यापलीकडचे आहे, तरी त्याचाही अनुभव इंद्रियांना येईल, असे मी करीन.

या ओवीत श्री ज्ञानेश्वरांनी आपल्या थोरल्या बंधूंचा गौरवपूर्ण उल्लेख केला आहे. संत निवृत्तिनाथ हे ज्ञानेश्वरांचे गुरू आहेत. त्यांच्या कृपाशीर्वादानेच आपण हा गीतेचा भावार्थ सांगत आहोत, असे ते विनम्र होऊन सांगत आहेत.



ॐ

यातील 'तेणे' म्हणजे निवृत्तिनाथ व त्यांची परंपरा! निवृत्तिनाथ, गहिनीनाथ, गोरक्षनाथ, मत्स्येंद्रनाथ, उमानाथ, आदिनाथ अशी ही थोर परंपरा आहे. या परंपरेच्या पुण्याईने व सद्‌गुरुनाथांच्या कृपेने मला हे बळ प्राप्त झाले आहे. म्हणून ज्या निराकार, निर्गुण भगवंताचे दर्शन या जड इंद्रियांना होत नाही, त्यांना ते सगुण व सरूप करून दाखवीन आणि ज्या इंद्रियांना इंद्रियातीत ईश्वरीय आत्मज्ञानाचा भोग घेता येणार नाही त्यांना, तो मी इंद्रियाकरवीच घेववीन, अशी ज्ञानेशांनी प्रतिज्ञा घेतली व नेवासे येथे सर्वांच्या साक्षीने सच्चिदानंदबाबांकडून ही ज्ञानेश्वरी लिहून घेतली. श्री ज्ञानेशांनी या लेखनामागील प्रेरणा व हेतू यांचा स्पष्ट उल्लेख मधूनमधून ज्ञानेश्वरीत केला आहे. एक वेळ अवधान देऊन जर तुम्ही ज्ञानेश्वरी वाचलीत तर मी तुम्हाला सुखाच्या अनुभवासाठी पात्र करेन असे नवव्या अध्यायाच्या पहिल्या ओवीत प्रतिज्ञापूर्वक म्हटले आहे तर गीतार्थाचा अर्थ सांगून आनंदाचे आवार जगात मांडण्यासाठी हे लेखन केले आहे. सामान्य लोकांना परतत्त्वाचा स्पर्श होण्यासाठी हे धर्मकीर्तन आपण केल्याचा निर्वाळा त्यांनी दिला आहे. ज्ञानेश्वर व त्यांची भावंडे यांच्या वाट्याला सर्वत्र उपहास व छळ आला, पण कोणतीही कटुता मनात न ठेवता त्यांना समजेल अशा मराठी भाषेत गीता आणली.

**दिनांक ८, ९ व १० मार्च**

६व्या श्लोकावरील निरूपणात श्री ज्ञानेशांनी देहाभिमान, अहंकार हाच परमार्थमार्गातील सर्वांत मोठा अडथळा असल्याबद्दल सांगितले आहे.

**हा विचारूनि अहंकार सांडिजे । मग असतीच वस्तु[1] होईजे ।**
**तरी आपली स्वस्ति[2] सहजें । आपण केली ।।७१।।**
**एऱ्हवीं कोशकीटकाचिया परी । आपणपया आपण वैरी ।**
**जो आत्मबुद्धि शरीरीं । चारुस्थळीं[3] ।।७२।।**
**म्हणऊनि आपणपया आपणचि रिपु[4] । जेणें वाढविला हा संकल्पु ।**
**येर[6] स्वयंबुद्धी म्हणे बापु । जो नाथिले[5] नेघे ।।८०।।**

*१) परमात्मा, ब्रह्म २) कल्याण ३) उत्तम ठिकाण ४) शत्रू ५) लटिका ६) दुसरा*

**अर्थ** - विचार करून हा अहंकार टाकावा आणि मग आधीच असलेले आपले स्वरूप ओळखून ब्रह्मरूप व्हावे, म्हणजे आपण आपले कल्याण सहजच केल्यासारखे होईल ।।७१।।

नाही तर, जो शरीर हेच उत्तम ठिकाण समजून तेथे आत्मबुद्धी ठेवतो, तो कोशकिड्याप्रमाणे आपला आपणच शत्रू होतो. ।।७२।।

म्हणून ज्याने आपला संकल्प (देहाभिमान) वाढविला आहे, तो आपला आपणच शत्रू होय. श्रीकृष्ण म्हणतात, दुसरा, जो खोट्याचा (मिथ्या देहाचा) अभिमान घेत नाही, तो आत्मज्ञानी म्हणावा. ।।८०।।

जो जीव भ्रांत आहे, तो खोट्या देहाभिमानाला बळी पडून आपला घात आपणच करतो. त्यास दुसरा कोणीही जबाबदार नाही हे ७०व्या ओवीत सांगून वरील ७१ वी ओवी, माऊलींनी मांडली आहे. 'मी देही' हे न म्हणता, 'मी देह' असे मानून जो जगतो तो, जन्ममृत्यूच्या तडाख्यात सापडतो. देहतादात्म्य झाल्यामुळे, सुखदुःखाच्या हिंदोळ्यावर झुलत राहतो व आत्मसुखापासून वंचित राहतो. म्हणून दुसरे कोणी आपले शत्रू नसून आपणच आपले शत्रू असतो. भ्रांती संपली की आपले कल्याण आपणच केले असे होते, म्हणून आपल्या सुखदुःखास व कल्याणास आपणच जबाबदार असतो. आपल्या भाग्याचे शिल्पकार आपणच असतो. आपण आपल्या देहालाच 'मी' म्हणून व त्याबद्दल

अंतःकरणात जो अहंकार घट्ट धरून बसतो त्यामुळे आपले स्वस्वरूप म्हणजे 'असतीच वस्तु' हरवून बसतो. सच्चिदानंद असलेल्या आत्मस्थितीचे आपल्याला भानही नसते. कोशकिडा जसा स्वतःच बांधलेल्या स्वतःच्या घरात - कोशात अडकून पडतो व आत्मनाश करवून घेतो, तसेच मनुष्याचे आहे. हे समजावण्यासाठी माऊलींनी, पोपटाचा एक सुंदर दृष्टान्त, येथेच सांगितला आहे. पोपटाला धरण्याकरिता बांधलेल्या नळीवर पोपट जेव्हा बसतो तेव्हा त्याच्याच वजनाने ती नळी उलट बाजूला फिरते. तेव्हा त्याने वास्तविक तेथून उडून जावे. पण तसे न करता ती नळी तो अधिकच घट्ट धरतो व काही केल्या नळी सोडत नाही. वास्तविक त्याला कोणीही बांधलेले नसल्याने त्याने उडून जावे. पण असे होत नाही. तो पोपट आत्मनाश करून घेतो. तसे मनुष्याचे आहे. त्याचा तोच बद्ध आहे. आत्मकल्याणही करून घेता येते व आत्मनाशही करून घेता येतो. देहाभिमान, अहंकार सुटला की आत्मकल्याण व मिथ्या देहात्मकतेमुळे आत्मज्ञानाला वंचित होणे हे त्याच्या नशिबी येते.

### दिनांक ११ मार्च

म्हणून ७व्या श्लोकावरील भाष्यात, एका छोट्याशा ओवीत भगवंत, कोणाला प्राप्त होतो तो गूढार्थ सांगितला आहे.

**तया स्वान्तःकरणजिता[१] । सकळकामोपशांता ।**
**परमात्मा परौता[२] । दुरी[३] नाहीं ।।८१।।**

*१) आपले मन जिंकणाऱ्याला २) पलीकडे, वेगळा ३) दूर, लांब*

**अर्थ** - अशा त्या पुरुषाने आपले अंतःकरण जिंकल्यामुळे व त्याच्या इच्छा निवृत्त झाल्यामुळे त्याला परमात्मा कोठे पलीकडे लांब नाही.

ज्याने आपले मन जिंकले आहे व ज्याच्या इच्छा, आशा, आकांक्षा पूर्णपणे निवृत्त झाल्यामुळे जो आत्मतृप्त व शांत आहे, त्याच्यापासून परमात्मा वेगळा नाही व दूरही नाही. ज्याप्रमाणे हिणकस सोन्यातून मिसळलेल्या धातूचा दोष निघाला तर ते सोने शंभर नंबरी होते त्याप्रमाणे अहंकाराचा नाश झाला की, जीवाच्या ठिकाणी ब्रह्मत्व ठेवलेलेच आहे. 'तया' याचा अर्थ ज्याने आपले ध्येय परमात्मप्राप्ती हे ठेवले आहे. बहिःकरण म्हणजे बाह्येंद्रिये व अंतःकरण म्हणजे आतील इंद्रिये. मन, बुद्धी, चित्त व अहंकार हे चतुष्टय म्हणजे अंतःकरण. यातील मल, विक्षेप जाऊन जेव्हा ते पूर्ण शुद्ध होते तेव्हा अशा साधकास परमात्मा परौता म्हणजे दुसरा व लांबही नाही. 'जीवो ब्रह्मैव नापरः ।' जीव हा ब्रह्माहून अलग होऊच शकत नाही.

### दिनांक १२ मार्च

श्री ज्ञानेश्वरांनी १०व्या श्लोकावरील भाष्यात प्रेमातील एक सूक्ष्म तत्त्व पुढील ओवीत सांगितले आहे -

**जय सोहंभाव हा अटकु[१] । मोक्षसुखालागोनि रंकु[२] ।**
**तयाचिये दिठीचा[३] झणे[४] कळंकु[५] । लागेल तुझिया प्रेमा ।।११५।।**

*१) अटकाव, अडथळा २) गरीब, दीन ३) दृष्टीचा ४) न जाणो ५) कलंक*

**अर्थ** - जे 'मी ब्रह्म आहे' अशा बोधात अडकले आहेत व जे मोक्षसुखाकरिता दीन झाले आहेत, अशांच्या दृष्टीचा काळिमा तुझ्या प्रेमाला कदाचित लागेल.





अंतःकरण व देह याचे संयमन करून निरिच्छ बनून अद्वैतानुभवावर आल्यामुळे योगी सतत आत्मानुभवात तल्लीन असतो. अर्जुनाची अवस्था अशी जर झाली तर भगवंतांनी आपल्या प्रिय भक्ताशी सख्य साधून संवाद तरी कसा साधायचा? म्हणून त्यास पूर्णतः एकरूप न करता द्वैतात ठेवला. भगवंत आणि भक्त यांच्या प्रेमात जर अद्वैत आले तर, प्रेमाची अनुभूती दोघांनाही कशी येणार? संपूर्ण ऐक्य झाले तर कोण कोणास पाहणार? कोणी कोणाची उत्कंठतेने वाट पाहायची? मीलनात जेवढा आनंद असतो त्याहीपेक्षा उत्कटतेने वाट पाहण्यातही अधिक आनंद आहे. म्हणून तुकारामांचीसुद्धा हीच मागणी आहे. 'मी भक्त, तू देव ऐसे करी गा.' आपल्याला भगवंतमय न होता भक्त म्हणूनच राहायचे आहे व भक्तीतला दिव्यानंद भोगायचा आहे, अशी तुकारामांची धारणा होती. सर्व संतांनी हाच भाव ठेवला. जीवाला मुक्तीचा अनुभव मिळण्यापेक्षा हा प्रेमाचा अनुभव अधिक श्रेष्ठ आहे असे ज्ञानेशांचेही मत होते. अद्वैतातला अनुभव घेण्यासाठी जीवाला द्वैत दशेला यावे लागते म्हणून जीवाला भौतिक वैभव नको, स्वर्गादि सुखांचीसुद्धा अपेक्षा नसते. एवढेच नव्हे तर मोक्षसुखसुद्धा तो इच्छित नाही. पण भगवंताच्या प्रेमात मात्र संतुष्ट असतो. जशी ही भक्ताची अवस्था तशीच भगवंताची. अर्जुन जर कृष्णरूप झाला, त्याचा अहंभाव नष्ट होऊन तो जर भगवंतात एकरूप झाला तर भगवंताने कोणाला आलिंगन द्यावे? प्रेमभराने कोणास पाहावे? असे भगवंताला वाटू लागले.

### दिनांक १३ मार्च

ज्याचे मन योगयुक्त झाले आहे तो प्राणिमात्रांच्या ठिकाणी आत्म्यास पाहतो व आत्म्याच्या ठिकाणी प्राणिमात्र आहेत असे पाहतो. ही समदृष्टी ज्याला लाभली त्याला श्रेष्ठ पद प्राप्त झाले व त्याच्या अंतःकरणात अद्वैतभाव निर्माण झाला असे सिद्ध होते. सहाव्या अध्यायात २९ ते ३२ या श्लोकांत श्रीकृष्णांनी अशा महात्म्याचे वर्णन केले आहे. श्री ज्ञानेशांनी ३२व्या श्लोकावर खूप सुंदर भाष्य केले आहे.

**म्हणोनि आपणपां[१] विश्व देखिजे । आणि आपण विश्व होईजे ।**
**ऐसें साम्यचि[२] एक उपासिजे[३] । पांडवा गा ।।४०९।।**

*१) आपले ठिकाणी, आत्मरूपाने पाहावे २) समबुद्धीने ३) उपासना करावी*

**अर्थ** - म्हणून आपल्या ठिकाणी जगत् पाहावे आणि आपण जगत् व्हावे, अशा एका साम्याचीच हे अर्जुना, तू उपासना कर.

भगवंत अर्जुनाला सांगतात की, जो ऐक्याच्या भावनेने, मी सर्व भूतात व्यापून राहिलो आहे असे जाणून मला भजतो त्याला आपल्या ठिकाणी जगत् दिसते. अशा आत्मौपम्य दृष्टीने तो जगाकडे पाहतो. 'आपणचि विश्व जाहला' अशी समबुद्धी त्याच्या ठिकाणी निर्माण होते. सर्व भूतात तो समत्वाने पाहतो. त्याच्यातील द्वैत निघून जाते. दिवा आणि प्रकाश जसे एकरूप असतात तसे माझे विश्वाशी एकरूपत्व आहे, म्हणून सर्वत्र आत्मस्वरूप बुद्धीने पाहावे. असा पुरुष शरीरधारी असला तरी तो परमात्मस्वरूप असतो.

### दिनांक १४ व १५ मार्च

हा समदर्शनाचा योग ऐकल्यानंतर अर्जुनाने आपली शंका व्यक्त केली. ३४व्या श्लोकात तो म्हणाला की, मन चंचल असल्यामुळे त्याचा निग्रह करणे हे दुरापास्त आहे. या श्लोकावर माऊलींनी मनाचे सुंदर चित्र शब्दबद्ध केले आहे.

ॐ

हें मन कैसें केवढें । ऐसें पाहों म्हणों तरी न सांपडे ।
एऱ्हवी राहाटावया[1] थोडें । त्रैलोक्य यया ।।४१२।
म्हणोनि ऐसें कैसें घडेल । जे मर्कट[2] समाधी येईल ।
कां राहे म्हणतलिया राहेल । महावातु[3] ।।४१३।।

*१) फिरण्यास, व्यवहार करण्यास २) माकड ३) मोठा वारा*

**अर्थ -** हे मन कसे व केवढे आहे, याचा पत्ता लावू असे म्हटले तर सापडत नाही. एऱ्हवी या मनाला वावरण्याला हे सर्व त्रैलोक्य अपुरे पडते. ।।४१२।।

म्हणून हे असे कसे होईल, की माकडाला समाधी लागेल! किंवा सोसाट्याचा वारा 'थांब' म्हटल्याबरोबर थांबेल काय? ।।४१३।।

सर्व संतांनी 'मनावर' खूप सांगितले आहे. वेद व इतर ग्रंथांतूनही मनाचे माहात्म्य वर्णिले आहे. हे मनच मोक्ष व बंधनाला कारणीभूत आहे. आपली प्रगती व अधोगती ही मनावर अवलंबून आहे. आपली प्रसन्नता, सुख व दुःख या सर्वाला जबाबदार मनच आहे. त्यामुळे अर्जुनाला वाटले की, योग साधण्यासाठीसुद्धा मनाच्या एकाग्रतेची आवश्यकता आहे. पण मन स्वभावतःच चंचल असल्याने या मनाची एकाग्रता कशी साधायची?

**दिनांक १६ व १७ मार्च**

भगवंताने अर्जुनाला यावरील उपाय सांगितला - सततच्या अभ्यासाने व वैराग्याने या मनाचा निग्रह करता येतो. माऊलींनी हा मनाचा स्वभाव नेमक्या शब्दांत प्रकट केला आहे. त्या ओव्या अशा...

परि वैराग्याचेनि आधारें । जरि लाविलें अभ्यासाचिये मोहरे[1] ।
तरि केतुलेनि[2] एकें अवसरें[3] । स्थिरावेल ।।४१९।।
कां जें यया मनाचे एक निके[4] । जे हें देखिले गोडीचिया ठाया[5] सोके[6] ।
म्हणोनि अनुभवसुखचि कवतिके[7] । दावीत जाहजे ।।४२०।।

*१) रस्त्याला २) काही अवकाशाने ३) वेळाने ४) चांगले ५) ठिकाणास ६) गोडी लागून राहते ७) कौतुकाने*

**अर्थ -** परंतु वैराग्याच्या जोरावर मन जर अभ्यासाकडे वळविले, तर काही एका वेळाने ते स्थिर होईल. ।।४१९।।

कारण की, या मनाची एक गोष्ट चांगली आहे ती ही की, ते (त्याला एकदा गोडी लागली की) अनुभवलेल्या गोडीच्या ठिकाणी सोकावते. म्हणून त्याला कौतुकाने आत्मानुभवसुखच वारंवार दाखवीत जावे. ।।४२०।।

सततच्या अभ्यासाने व वैराग्याने हे मन स्थिर होते. मनाचे दमन करण्याचा प्रयत्न केला तर ते अधिक उसळी मारून वर येते. चंचलता हा मनाचा स्वभावच आहे. या मनाचा स्वभाव लक्षात घेऊन त्याला नियंत्रित करायची कला साधली पाहिजे. या मनाची एक खोड आहे की, त्याला ज्याची गोडी लागते त्याचीच चटक लागते. म्हणून या मनाला विश्वासात घेऊन हळूहळू आत्मसुखाची गोडी लावावी. एकदा का आत्मलाभाची गोडी लागली की, मग हे मन भोगविषयात रममाण होत नाही.

सहाव्या अध्यायातील या अर्थपूर्ण ओव्या आहेत.

।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।



ॐ

# अध्याय ७
# ज्ञानविज्ञानयोग

**दिनांक १८ मार्च**

आणि या आठांची जे साम्यावस्था[1] । ते माझी परम[2] प्रकृति पार्था ।
तिये नाम व्यवस्था । जीवु ऐसी ।।१९।।

*१) ऐक्यावस्था, मिश्रस्थिती २) श्रेष्ठ*

**अर्थ -** आणि हे आठ भाग ज्या ठिकाणी लीन होऊन असतात, तीच माझी श्रेष्ठ प्रकृती असून, तिला जीव असे नाव आहे.

सातव्या अध्यायात केवळ भगवंतच बोलत आहेत. या अध्यायाचे नाव आहे ''ज्ञान-विज्ञानयोग''. अर्जुनावरील आत्यंतिक प्रेमाने भगवंत त्याला भरभरून ज्ञान देत आहेत. अर्जुनाने येथे कोणताही प्रश्न विचारला नाही, पण भगवंत त्याला ज्ञान-विज्ञान समजावताहेत. अज्ञान कसे नष्ट होईल, प्रपंच कसा बाधित होतो व ज्ञान कसे प्राप्त होते, याचे गूढ मर्म या अध्यायात भगवंत विशद करीत आहेत.

'ज्ञान-विज्ञान' या दोन शब्दांची व्याख्या माऊलींनी स्पष्ट केली आहे. जेथे बुद्धीचा प्रवेश होत नाही व विचार जेथून मागे फिरतो आणि ज्याच्या संबंधाने तर्काचे चातुर्य चालत नाही, त्याचे नाव ज्ञान होय. याहून दुसरा जो प्रपंच ते विज्ञान होय आणि प्रपंचाच्या ठिकाणी खरेपणाची जी बुद्धी तिला अज्ञान असे म्हणतात.

वरील ओवी गीतेतील पाचव्या श्लोकावरील माऊलींच्या निरूपणात आली आहे. भगवंतांनी आपल्या प्रकृतीची दोन रूपे सांगितली. पहिली अपरा प्रकृती. पाच सूक्ष्म महाभूते (अग्नी, पृथ्वी, प्रकाश, पाणी, वायू), मन, बुद्धी व अहंकार अशी अष्टधा अपरा प्रकृती. ही जड व परिवर्तनशील आहे. हे आठ भाग ज्या ज्या ठिकाणी लीन होऊन असतात तीच माझी श्रेष्ठ प्रकृती म्हणजे परा प्रकृती आहे. तिला जीव असे म्हणतात. ती चेतनात्मक व अपरिवर्तनशील असल्याने तिला तेराव्या अध्यायात 'क्षेत्रज्ञ' व अमर असल्याने पंधराव्या अध्यायात तिला 'अक्षरपुरुष' म्हटले आहे. या पराशक्तीलाच आपण आत्मा, जीव अथवा जीवात्मा म्हणतो. सर्व प्राणिमात्र या दोन प्रकृतींपासून निर्माण झाले आहेत. प्रकृती-पुरुष किंवा क्षेत्र-क्षेत्रज्ञ यांच्या संयोगामुळे सर्व स्थावर-जंगम सृष्टी निर्माण झाली आहे.

**दिनांक १९ मार्च**

असा हा जीव, जड पदार्थांना अस्तित्वात आणतो. चैतन्याकडून क्रिया करवितो. अहंकाराच्या खेळाने सृष्टीला जन्म देतो. जारज, अंडज, स्वेदज व उद्‌भिज अशी चार प्रकारची सृष्टी निर्माण करून विविध वस्तूंना तयार करतो.

सुवर्णाचे मणी केले । ते सोनियाचे सुती[1] वोविले[2] ।
तैसें म्यां[3] जग धरिले । सबाह्याभ्यंतरीं[4] ।। ३२ ।।

*१) धाग्यात २) गुंफले ३) मी ४) आतून-बाहेरून*

**अर्थ -** सोन्याचे मणी करून ते सोन्याच्या सुतात ओवावेत, त्याप्रमाणे आत-बाहेर जग मीच धरले आहे.

ॐ

प्रकृतीने केलेला नामरूपांचा विस्तार म्हणजे हे जग. या ब्रह्मांडाचा आदी, मध्य, अंत एक परमात्माच आहे. तोच प्रभव व तोच प्रलय आहे. तोच या जगाचा पिता, माता... सर्वकोणी तोच आहे. सर्वांचे बीज तोच आहे. एखाद्या सुतात मणी ओवावेत त्याप्रमाणे हे सर्व जग माझ्यात ओवलेले आहे. मणी सोन्याचे तसे सूतही सोन्याचे. सोन्याचेच मणी सोन्याच्याच सुतात ओवल्याप्रमाणे एका चित्तत्त्वात सर्व जगास मी धारण केले आहे. आतून व बाहेरून सर्व जगतात मीच व्यापून राहिलो आहे. या जगात माझ्याहून पलीकडचे म्हणजे माझ्याहून पृथक् असे काहीही नाही. हारातील मणी दिसतात पण धागा दिसत नाही तसेच हे जग दिसते पण तो परमात्मा दिसत नाही.

### दिनांक २० मार्च

**भूतांचां ठायीं कामु[१] । तो मी म्हणे आत्मारामु[२] ।**
**जेणें अर्थास्तव[३] धर्मु । थोरु होय ।।४६।।**

*१) वासना, विकार २) स्वरूपात रममाण होणारा ३) ज्या हेतुस्तव*

**अर्थ** - ज्या कामाच्या योगाने धर्माचा उत्कर्ष होतो असा प्राणिमात्रांच्या ठिकाणी असणारा जो काम, तो मी आहे असे भगवंत म्हणतात.

वरील ओवी अकराव्या श्लोकावरील भाष्य आहे. भगवंतांनी या ठिकाणी आपल्या विभूतींचे वर्णन केले आहे. तपस्वी लोकांच्या ठिकाणी असलेले तप ही माझी विभूती आहे. बलवान लोकांमध्ये जे बळाचे तेज आहे व बुद्धिवानांच्या ठिकाणी जी बुद्धी आहे तीही माझीच विभूती आहे. धर्माच्या विरुद्ध नसणारा व शास्त्रसंमत असा जो कामविकार आहे तीही माझीच विभूती आहे. संत हे मनुष्याच्या कामविकारांपासून मिळणाऱ्या इंद्रियसुखाच्या विरुद्ध नाहीत. पण ती विषयवासनेची पूर्ती शास्त्राला सोडून असू नये असा त्यांचा आग्रह आहे. ज्यांना आपण विकार म्हणून शत्रू मानतो त्यांचे नेमके स्वरूप माऊलींनी येथे स्पष्ट केले आहे.

### दिनांक २१ मार्च

**सांगें अग्नीस्तव धूम[१] होये । तिये धूमीं काय अग्नी आहे ।**
**तैसा विकारु हा मी नोहे[२] । जरी विकारला असें ।।५९।।**

*१) धूर २) नाही*

**अर्थ** - सांग, अग्नीपासून धूर तयार होतो, त्या धुरात अग्नी आहे काय? त्याप्रमाणे जरी विकार माझ्यापासून झाले तरी मी विकारी होत नाही.

आपल्या स्वरूपाचे वर्णन भगवंतांनी येथे केले आहे. सात्त्विक, राजस व तामस हे सर्व भाव माझ्यापासून निर्माण झाले आहेत पण मी त्यांच्यात नाही. या त्रिगुणांनी हे सर्व जग भरले आहे. ही त्रिगुणात्मक माया भगवंतांच्या आदेशानुसार चालते. ती भगवंताची शक्ती आहे, पण भगवंत त्यात नाहीत. जसे आकाशात ढग येतात व जातात पण ढगात आकाश नसते किंवा बीजापासून वृक्ष तयार होतो, त्या काष्ठात बीज नसते. तसेच अग्नीपासून धूर होतो पण धुरात अग्नी नसतो. त्याप्रमाणे भगवंतापासून ही सत्त्व-रज-तम अशी त्रिगुणात्मक सृष्टी निर्माण झाली, पण भगवंत मात्र तिचे कर्ते नाहीत.



ॐ

### दिनांक २२ व २३ मार्च

**तैसें भूतजात सर्व । हे माझेचि कीर[१] अवयव ।**
**परि मायायोगें जीव[२] । दशे आले ।।६६।।**
**म्हणोनि माझेचि मी नव्हती । माझेचि मज नोळखती ।**
**अहंममताभ्रांती[३] । विषयांध झाले ।।६७।।**

*१) खरोखर २) जीवपणाला ३) मी व माझे या भ्रांतीने*

**अर्थ** - त्याचप्रमाणे सर्व प्राणिमात्र हे खरोखर माझेच अवयव आहेत. पण मायेच्या योगाने ते जीवदशेस आले ।।६६।।

म्हणून ते प्राणी माझेच असून मी नाहीत, माझेच असून मला ते ओळखत नाहीत. कारण मी आणि माझेपण या भ्रांतीने ते विषयांध झाले आहेत. ।।६७।।

त्रिगुणात्मक माया ही भगवंताचीच शक्ती आहे. सर्व प्राणी माझेच अंश असले तरी मायेच्या भ्रांतीमुळे किंवा अज्ञानामुळे ते स्वतःला माझ्यापासून वेगळे समजतात. ज्याप्रमाणे मोत्यांचा जन्म पाण्यापासूनच होतो पण ते मोती पाण्यात विरघळत नाहीत. मातीचेच मडके पण भाजले असता मातीत न मिसळता खापररूपाने वेगळे राहते. माऊलींनी या दोन उपमांनी हे वेगळेपण मांडले आहे.

### दिनांक २४, २५, २६, २७, २८ व २९ मार्च

अशी ही माया तरून जाण्यास दुस्तर असली तरी भगवंताला शरणागत होऊन ती पार करता येते. या अर्थाच्या १४व्या श्लोकावर माऊलींनी या महतत्त्वादि मायेला, मायानदीची उपमा देऊन बहारदार वर्णन केले आहे. त्यातील महत्त्वाच्या ओव्या अशा -

**येथे एकचि लीला[१] तरले । जे सर्वभावे मज भजले ।**
**तया ऐलीच[२] थडियें[३] सरले । मायाजळ[४] ।।९७।।**
**जया सद्गुरु तारू[५] पुढे । जे अनुभवाचिये कासे गाढे[६] ।**
**जया आत्मनिवेदन[७] तरांडे[८] । आकळले[९] ।।९८।।**
**जे अहंभावाचे वोझे सांडुनी । विकल्पाचिया झुळका चुकऊनि ।**
**अनुरागाचा[१०] निरु ताऊनी । पाणीढाळु[११] ।।९९।।**
**जया ऐक्याचिया उतारा । बोधाचा जोडला तारा[१२] ।**
**मग निवृत्तीचिया पैल तीरा । झेपावले जे ।।१००।।**
**ते उपरतीचा[१३] आंवी[१४] सेलत[१५] । सोऽहंभावाचेनि[१६] धावे[१७] पेलत[१८] ।**
**मग निघाले अनकळित [१९] । निवृत्ति तटीं[२०] ।।१०१।।**
**येणे उपाये मज भजले । ते हे माझी माया तरले ।**
**परि ऐसे भक्त विपाइले[२१] । बहुवस नाही ।।१०२।।**

*१) सहजपणे २) अलीकडच्या ३) तीरावर ४) मायानदी ५) नावाडी, तारणारा ६) बळकट ७) आत्मस्वरूप जाणणे ८) तराफा, ताफा ९) सापडले १०) प्रेम, आसक्ती ११) पायउतार १२) सांगड १३) पश्चात्तापाच्या १४) हातानी १५) तरंगत १६) मीच ईश्वर अशा भावाच्या १७) बळे १८) पोहत १९) न कष्ट घेता २०) मुक्तीच्या काठावर २१) विरळा, क्वचित*

ॐ

**अर्थ -** या ठिकाणी जे सर्वभावाने मला भजले, तेच एक ही मायानदी सहज तरून गेले. त्यांना मायानदीच्या अलीकडच्या काठावर तिचे पाणी संपले ।।९७।।

जो सद्‌गुरू हा पुढे तारणारा (नावाडी) आहे, ज्या साधकांनी आत्मानुभवरूपी कासोटा घट्ट बांधला आहे व ज्यांना आत्मनिवेदनरूपी ताफा प्राप्त झाला आहे. ।।९८।।

जे अहंभावाचे ओझे टाकून, विकल्परूपी वाऱ्याच्या झुळुका चुकवून संसारावरील प्रेमाच्या ओहोटीचे पाणी तपासून ।।९९।।

व ज्यांना जीव व परमात्मा यांच्या ऐक्यरूपी उतार असलेल्या पाण्यात ज्ञानरूपी सोपी पायवाट सापडून मग जे (पलीकडच्या) निवृत्तिरूपी तीराकडे वळले ।।१००।।

वैराग्यरूपी हातांनी पाणी तोडीत व मीच परमात्मा आहे अशा समजुतीच्या बळाने तोल सांभाळीत कसल्याही अडचणीत न पडता, निवृत्तीरूपी काठावर ते बाहेर आले ।।१०१।।

या उपायाने जे मला भजले, ते ही माझी माया तरून गेले, परंतु असे भक्त थोडे आहेत. फार नाहीत. ।।१०२।।

मायानदीचे सुंदर शब्दचित्र, वरील ओव्यांतून माऊलींनी रेखाटले आहे. मायानदी कोण पार करील याचे उत्तर व उपाय येथे सांगितला आहे. परमार्थ मार्गातील सर्वांत मोठा अडसर म्हणजे ही माया. पण भगवंताला सर्वभावे शरण जाऊन ही नदी तरून जाता येते. केवळ बुद्धीच्या जोरावर ही तरून जाता येत नाही. समर्पित भाव ठेवून, हे सोपान चढून जावे लागतात. स्वतःच्या सामर्थ्यावर मी एकटा पार करू शकेन असे न म्हणता, सद्‌गुरूंच्या आश्रयाने, त्यांच्या कृपाप्रसादाने या मायानदीतून पार होता येईल. अहंभाव सोडून, अनासक्त होऊन, ज्ञानाचे साधन स्वीकारून, वैराग्य अंगी बाणवून, सोऽहंभाव मनी दृढ करून सद्‌गुरूंच्या नावेत बसून ही मायानदी पार करता येते. पण असे करणारे भक्त अत्यंत अल्प आहेत.

## दिनांक ३० मार्च

सातव्या अध्यायातील संपूर्ण भाव साररूपाने वरील ओव्यांतून व्यक्त झाला आहे.

**तो पहिला आर्तु[1] म्हणिजे । दुसरा जिज्ञासु बोलिजे ।**
**तिजा[2] अर्थार्थी[3] जाणिजे । ज्ञानिया चौथा ।।१०९।।**

*१) दुःखी २) तिसरा ३) धनादिकांची इच्छा करणारा*

चार प्रकारच्या भक्तांचे हे वर्णन आहे. जो दुःखीकष्टी आहे तो दुःख निवारण्यासाठी भगवंताचा धावा करतो. जो जिज्ञासू आहे तो जीव, जीवात्मा, आत्मा, परमात्मा, जग यांचे रहस्य व स्वरूप जाणून घेण्यासाठी आराधना करतो. तिसऱ्या प्रकारचा भक्त आपल्या भौतिक इच्छा, नाना प्रकारचे भोग, आशा-आकांक्षा, कामना यांच्या पूर्ततेसाठी भक्ती करतो. चौथा भक्त हा ज्ञानी होय. भगवंताशी एकरूप होऊन आत्मज्ञान प्राप्त करून घेण्यातच जीवनाची कृतार्थता तो अनुभवितो. या चार प्रकारच्या भक्तात ज्ञानी भक्त भगवंताला अतिशय प्रिय आहे. असा ज्ञानी भक्त म्हणजे परमेश्वराचा आत्माच आहे. पण असे ज्ञानी भक्त क्वचितच असतात. १९ व्या श्लोकावरील भाष्यात अशा ज्ञानी भक्ताचे वर्णन आहे.



ॐ

## दिनांक ३१ मार्च

**हे समस्तही श्रीवासुदेवो । ऐसा प्रतीतिरसाचा[1] वोतला भावो ।**
**म्हणोनि भक्तांमाजीं रावो[2] । आणि ज्ञानिया[3] तोचि ।।१३६।।**

*१) स्वानुभवाचा २) श्रेष्ठ, राजा ३) ज्ञानी*

**अर्थ -** हे संपूर्ण विश्व श्रीवासुदेव आहे. अशा अनुभवरूपी रसाचा त्याचा भाव ओतलेला असतो म्हणून सर्व भक्तांमध्ये तो राजा आहे आणि ज्ञानीही तोच आहे.

माऊलींनी ज्ञानी भक्ताचे हे वर्णन केले आहे. या सर्व विश्वात, जळी-स्थळी तो वासुदेवच भरला आहे अशी अनुभूती ज्ञानी भक्तांना येते. ज्ञानी पुरुष आत्मौपम्य भावाने जगाकडे पाहत असतो. 'आपणचि विश्व जाहला' अशी त्याची धारणा असते. अत्यंत निष्काम भावनेने समर्पित होऊन, अनन्यभावाने तो भक्ती करत असतो. अशी अव्यभिचारिणी भक्ती भगवंताला प्रिय असते म्हणून सर्व भक्तांमध्ये अशा ज्ञानी भक्तावर भगवंताची विशेष कृपा असते. अशा ज्ञानी भक्ताला अनेक जन्म झाल्यानंतर, माझी प्राप्ती होते व सर्व जग नामरूपासह मीच आहे अशा वृत्तीने तो सर्व व्यवहार करतो.

**।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**

ॐ

## अध्याय ८
## अक्षरब्रह्मयोग

**दिनांक १ एप्रिल**

आठव्या अध्यायात माऊलींनी २८ श्लोकांवर, २७१ ओव्यांत निरूपण केले आहे. हा अध्याय अर्थसामर्थ्याने महान आहे. भक्ती ही काही मर्यादित काळापुरती करावयाची साधना नसून जीवनभर अखंडपणे त्या समर्पित भावात राहणे म्हणजे भक्ती होय. भक्ती म्हणजे वृत्ती. संपूर्ण जीवनभर अशा वृत्तीने जीवन व्यतीत केले तरच अंत्यसमयी भगवंताचे स्मरण होते. या अध्यायाचा प्रमुख विषय हा त्या अंतिम क्षणासंबंधीचाच आहे. अंत्यसमयी 'जशी मति तशी गति'. ही प्रयाण साधना कशी असावी व त्यामध्ये मनुष्याने जीवनभर कशाचे सातत्य ठेवावे याविषयी भगवंतांनी या अध्यायात मार्गदर्शन केले आहे. अर्जुनाने सुरुवातीस विचारलेल्या सात प्रश्नांची उत्तरे म्हणजे अध्याय आहे.

**आणि मरणीं जया जें आठवे । तो तेचि गतीते[1] पावे ।**
**म्हणोनि सदा स्मरावें । मातेंचि[2] तुवां ।।७५।।**

*१) (मृत्यूसमयी) जशी मति तशी गति. 'अंते मतिः सा गतिः' या सिद्धान्ताप्रमाणे २) माझे*

**अर्थ -** आणि मरणसमयी ज्यास जी वस्तू आठवते त्याच गतीला तो जातो. असे आहे म्हणून, तू नेहमी माझे स्मरण कर.

जीवनभर ज्या ज्या गोष्टींचा ध्यास, हव्यास केलेला असतो त्याच गोष्टी मृत्यूसमयी सारीपाटासारख्या नजरेसमोर येत असतात. धनाची आसक्ती असेल तर धन, प्रपंचाचा ध्यास असेल तर प्रपंच, घराचे ममत्व असेल तर घर, स्त्रीविषयी स्त्रैण भाव असेल तर स्त्री... अशा गोष्टी अखेरच्या श्वासापर्यंत पिच्छा सोडत नाहीत. सांसारिक मोह सुटत नाही पण भगवंताच्या नामस्मरणाने, चिंतनाने त्याची तीव्रता कमी होते. बाहेरून प्रवृत्ती व अंतःकरणातून निवृत्ती साधली तर, ही आसक्ती जीवाला छळत नाही. म्हणून भगवंत म्हणतात की, माझेच सतत स्मरण करावे. असा जीवनक्रम राहिला तर अंतिम क्षणसुद्धा अमृतासारखा मधुर होईल.

**दिनांक २ एप्रिल**

**तूं मन बुद्धि सांचेंसी[1] । जरी माझिया स्वरूपीं अर्पिसी ।**
**तरी मातेंचि गा पावसी । हे माझी भाक[2] ।।७९।।**

*१) खरेपणाने २) शपथ*

**अर्थ -** तू मन-बुद्धी ही खरोखर माझ्या स्वरूपात अर्पण करशील, तर मग तू माझ्याशी एकरूपच होशील; हे माझे प्रतिज्ञापूर्वक सांगणे आहे.

मन-बुद्धी ईश्वरार्पण करणे म्हणजे संपूर्ण जीवनच आध्यात्मिक बनविणे होय. साधना ही क्षणाची न राहता प्रत्येक क्षण हे साधनेचे अंग बनले पाहिजे. सकाळी पूजा आटोपली की, दुसऱ्या दिवशीच्या पूजेच्या वेळेपर्यंत कसेही विकारयुक्त जीवन जगणे हे माऊलींना अपेक्षित नाही. भक्ती ही नित्य म्हणजे 'सर्वेषु कालेषु' असली पाहिजे. मन-बुद्धी अर्पण करणे म्हणजे सर्वस्व अर्पण करणे होय. असे जर झाले तर भक्त व भगवंत असा दुरावाच राहणार नाही. असा भक्त मलाच येऊन मिळतो हे भगवंत शपथेवर सांगत आहेत.



ॐ

**दिनांक ३ व ४ एप्रिल**

असे घडण्यासाठी अभ्यास, प्रयास, साधना पाहिजे म्हणून माऊली म्हणतात -

**येणेंचि अभ्यासेंसी योगु । चित्तासी करीं पां चांगु ।**
**अगा उपायबळें पंगु[1] । पहाड[2] ठाकी[3] ।।८१।।**
**तेविं सदभ्यासे[3] निरंतर । चित्तासि परमपुरुषाची मोहर[4] ।**
**लावीं मग शरीर । असो अथवा जावो ।।८२।।**

*१) लंगडा २) पर्वतावर चढून जातो ३) दैवी विचारांचा अभ्यास ४) वळण, मार्ग*

**अर्थ -** याच अभ्यासाबरोबर चित्ताची सांगड चांगल्या प्रकारे घाल. अरे, प्रयत्नांच्या बळावर पांगळादेखील पर्वत चढून जातो ।।८१।।

त्याप्रमाणे सदभ्यासाने तू निरंतर आपल्या चित्ताला परमपुरुषाचे ध्यान लाव. मग शरीर राहो अथवा जावो. ।।८२।।

संसारात रमलेले मन व भोगविषयात गुंतलेली बुद्धी सहजासहजी परमेश्वर चिंतनात रमत नाही. मन माशीसारखे आहे. माशी सर्व चांगल्या-घाणेरड्या सर्व पदार्थांवर बसते पण अग्नीजवळ येत नाही, तसे मन परमार्थात गुंतत नाही. अमन होण्यासाठी तयार होत नाही. पण अभ्यासाने व दृढनिश्चयाने हे शक्य आहे. असा अभ्यास कधीही व्यर्थ जात नाही. प्रयत्नांनी लंगडासुद्धा पर्वत चढू शकतो तसे भगवंतनामाची गोडी लागली की, चित्त चिद्रूप व्हायला लागते. मनाला एकदा का भगवंतनामाचा छंद लागला की, ते मग भोगविषयात रमत नाही. आत्मलाभासारखी गोडी, संसारविषयात नसल्याने अशी मन-बुद्धी भगवंतचरणी रुजू होते.

**दिनांक ५ एप्रिल**

**म्हणोनि प्रणवैकनाम[1] । हें एकाक्षर[2] ब्रह्म ।**
**जो माझें स्वरूप परम[3] । स्मरतसांता[4] ।।११८।।**

*१) ॐकाराचेच नाम २) एक अक्षरी ३) श्रेष्ठ ४) नित्यस्मरण करणारा*

**अर्थ -** म्हणून प्रणव हे एक ज्याचे नाम आहे व जे एकाक्षर ब्रह्म आहे, ते माझे मुख्य स्वरूप असून, त्या स्वरूपाचे स्मरण करीत असताना.

ॐकाराचे स्मरण करीत जो मृत्यू पावतो तो ऊर्ध्वगतीला पोहोचतो. प्रणव म्हणजे ॐकार असून त्याचे स्वरूप एकाक्षरी ब्रह्मासारखे आहे. चित्त स्थिर करून व इंद्रियांचा निग्रह करून याचे स्मरण करावे. असे केले असता प्राण प्रणवरूप होतो म्हणजे प्राणातील हंस असा जो जपयज्ञ आहे तो करावा. या जपाला आधारचक्राच्या क्रमाने ब्रह्मरंध्रापर्यंत आणावे. नंतर अ, उ, म या प्रणवाच्या मात्रा अर्धबिंबात मिळेपर्यंत प्रणव धरून ठेवावा. प्राण आकाशात स्थिर करावा. मग ऐक्यानंतर तो परब्रह्माच्या स्वरूपी आहे असाच अनुभव येतो. तेव्हा ॐ हे स्मरण्याचे संपून तेथेच प्राणवायू लीन होतो. मग ॐकार स्मरण्याचे राहिले की, जे पूर्ण ब्रह्म तेच काय ते एक राहते. म्हणून प्रणव म्हणजे ॐ हे एक नाव म्हणजे एकाक्षर ब्रह्मच होय. जो त्या स्वरूपाचे स्मरण करीत असता देहाचा त्याग करतो तो माझ्याच स्वरूपाला प्राप्त करतो हे भगवंताचे आश्वासन आहे.

ॐ

दिनांक ६ एप्रिल

**ऐसे निरंतर एकवटले[1] । जे अंतःकरणी मजसि लिगटले[2] ।**
**मीचि होऊनि आटले[3] । उपासिती ।।१२६।।**

*१) एकाग्र झाले २) युक्त झाले ३) व्यापले*

**अर्थ** - अशा प्रकारे जे अखंड माझ्याशी एकरूप होऊन अंतःकरणाने मला चिकटले, ते मद्रूप होऊन माझीच भक्ती करतात.

अनन्यभावाने सदासर्वदा जो भगवंताचे स्मरण करतो त्या नित्ययुक्त योग्यास आपली प्राप्ती सुलभ रीतीने होते हे भगवंताचे आश्वासन आहे. 'अनन्यचेताः' म्हणजे भगवंताशी एकरूप होणे. ईश्वरावरच्या परमप्रेमाने केवळ त्याचेच सदैव चिंतन करणे, तेही निर्हेतुक व निष्काम भावनेने. ही श्रेष्ठ भक्ताची स्थिती आहे. आपल्या सर्व कर्माद्वारे त्याचेच पूजन करणे म्हणजे निरंतर एकवटणे! जेव्हा ईश्वराशिवाय कोणताच भाव चित्तात नसेल तेव्हाच अनन्यता असते. देहत्यागानंतर असे भक्त ईश्वररूपच होतात.

दिनांक ७ एप्रिल

**हे देहक्रिया[1] आघवी[2] । न करवितां होय बरवी[3] ।**
**जैसा न[4] चलविते[4] नि रवी[5] । लोकु चाले ।।१८७।।**

*१) देहाचे चलनवलन २) सर्व ३) चांगली ४) न चालविता ५) सूर्य*

**अर्थ** - ही सर्व देहक्रिया (परमात्म्याने स्वतः) न करविता चांगली होते. ज्याप्रमाणे सूर्य हा स्वतः लोकांस व्यापार करावयास न लावता, लोकांचे व्यापार चांगले चालतात.

श्री ज्ञानेश्वरमाऊली या ओवीत मनुष्याच्या देहाचे वर्णन त्याच्या क्रियांसह करीत आहेत. या देहात परमात्मा अत्यंत उदासीनतेने राहतो. तो कोणताही व्यापार करीत नाही व करवीत नाही, तरी मनुष्याच्या शरीराचे व्यवहार चालतच असतात. दहाही इंद्रियांचे व्यवहार सुरूच असतात. याप्रमाणे शरीरात जो आत्मा स्वस्थ, निष्क्रिय असतो म्हणून त्याला 'पुरुष' असे म्हणतात. सूर्य जसा काहीच करत नाही किंवा घरातील दिव्याच्या प्रकाशात सर्व व्यवहार होत असतात पण दिवा काहीच करत नाही तसे मनुष्याच्या सर्व व्यवहारांचे आहे. पाण्यावर तरंग येतात व जातात पण पाणी तसेच राहते, तशी ही जीवसृष्टी नाहीशी झाली तरी परमतत्त्व अखंड असते. देहाच्या जेवढ्या म्हणून क्रिया असतात त्या सर्व त्याच्या अस्तित्वात सुरूच असतात.

दिनांक ८ एप्रिल

**तरी आतां देह असो अथवा जावो । आम्हीं तो केवळ वस्तूचि[1] आहों ।**
**कां जे दोरीं सर्पत्व वावो । दोराचिकडुनि ।।२४८।।**

*१) ब्रह्मरूप*

जगाचे प्रकाशरूप आणि अंधकाररूप म्हणजे अचिरादि आणि धूम्र असे हे दोन मार्ग नित्य आहेत. पहिल्या मार्गाने मनुष्याला पुन्हा जन्म नाही पण दुसऱ्याने पुन्हा जन्म पावतो. त्यामुळे मरणकाळी कोणता मार्ग वाट्याला येतो याच्या अनिश्चिततेमुळे अर्जुन खिन्न झाला होता. त्या वेळी भगवंतांनी अर्जुनाला समजावले की, प्रारब्धवशात या



ॐ

देहाला मृत्यू केव्हा, कोठे येईल याविषयी काहीच सांगता येत नाही. त्यामुळे देह असो अथवा जावो. आपण केवळ ब्रह्मरूप आहोत अशी अवस्था जिवंतपणीच आणावी. आपण देहधारी असूनही देहरूप नाही आहोत अशी आत्मरूप जाणीव सतत ठेवावी. कारण की जसे दोरीवर भासलेला सर्पपणा दोराच्या दृष्टीने मिथ्या आहे. माऊलींनी हा सिद्धान्त समजावण्यासाठी पाणी व घटाचा दृष्टान्त दिला आहे. पाण्यावर तरंग येतात व जातात. त्या तरंगामुळे पाण्याचे अस्तित्व असते असे नाही. लाटा येवोत अथवा जावोत पण पाणी नाहीसे होत नाही. त्याप्रमाणे घट नाहीसा झाला तरी घटातील आकाश महाआकाशात मिळून जाते. वास्तविक घटातील आकाश महाआकाशाच्या ठिकाणी आहे. केवळ आकारामुळे त्याला घटाचे स्वरूप प्राप्त झाले आहे. तसा हा देहाचा आकार आहे. ही उपाधी असो अथवा जावो. 'मी ब्रह्म आहे', 'माझे मूळ स्वरूप तीच वस्तू, तेच ब्रह्म आहे' असा बोध ज्या योग्यांना होतो, त्यांना देहाचा पाश असो अथवा जावो त्यांची ब्रह्मस्थिती अखंडित राहते. म्हणून भगवंताचा आदेश आहे, ''हे अर्जुना, तू असा योगयुक्त होऊन राहा. म्हणजे तू आपोआपच ब्रह्मरूप होऊन राहशील. मग स्वर्गादि सुखांचेसुद्धा तुला आकर्षण राहणार नाही. आपण सच्चिदानंद परब्रह्माखेरीज दुसरे काहीच नसून, आपले त्याच्याशी ऐक्य आहे. अशा बोधाने होणारे परब्रह्माचे अखंड महासुख लाभल्यानंतर दुसऱ्या कशाची इच्छा राहणार?''

**।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**

ॐ

# अध्याय ९
# राजविद्या राजगुह्ययोग

**दिनांक ९ एप्रिल**

**तरी अवधान[1] एकवेळें दीजे । मग सर्व सुखासि पात्र[2] होईजे ।**
**हें प्रतिज्ञोत्तर[3] माझें । उघड[4] ऐका ।।१।।**

*१) लक्ष २) योग्य ३) प्रतिज्ञेवर सांगणे ४) स्पष्ट*

**अर्थ -** श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतात, ''अहो श्रोतेहो, तर तुम्ही एकवेळ (माझ्या बोलण्याकडे) लक्ष द्या. म्हणजे मग सर्व सुखाला पात्र व्हाल. हे माझे उघड प्रतिज्ञेचे बोलणे ऐका.''

या नवव्या अध्यायात माऊलींनी आपले हृदय ओतले आहे. १८ अध्यायातील हा कंठमणी आहे. संपूर्ण ज्ञानेश्वरीचे सार यात सामावलेले आहे. हा अध्याय ज्ञानेश्वरमाऊलींना एवढा प्रिय होता की, त्यांनी संजीवन समाधीच्या वेळी तो आपल्या मांडीवर ठेवला व समाधी घेतली. भक्तिप्रेमाचे रहस्य (गुह्य) यात विशद केले आहे. गूढ अध्यात्मविद्येचे सोपे, सरळ स्पष्टीकरण यात माऊलींनी केले आहे. या अध्यायाबद्दल माऊली म्हणते की, असंख्य वेदांमध्ये जो गूढार्थ भरलेला आहे, तो महाभारताच्या एक लक्ष श्लोकांमध्ये सामावलेला आहे. त्यातील सर्व भावार्थ गीतेतील ७०० श्लोकांमध्ये ग्रथित झाला आहे व या ७०० श्लोकांचा अभिप्राय एकट्या नवव्या अध्यायात प्रकट झाला आहे. या अध्यायात एकूण ५३५ ओव्या आहेत. सर्व ओव्या म्हणजे रत्नांची खाण आहे. प्रत्येक ओवी म्हणजे अनमोल रत्न आहे.

या अध्यायाची पहिली ओवी म्हणजे माऊलींनी दिलेले प्रतिज्ञापत्रच (Affidavit) आहे. माझ्या सांगण्याकडे जर, संपूर्ण ध्यान दिलेत तर तुम्ही सर्वसुखे प्राप्त कराल. ते सुख भोगण्यासाठी पात्र व्हाल. असे ठाम आश्वासन यात दिले आहे. सावधानता हा भक्तीचा मंत्र आहे. चित्ताची एकाग्रता, स्थिर बुद्धी व अवधान असेल तरच परमार्थात प्रगती होते. प्रपंच व परमार्थ हे दोन्हीही सुखाचे करण्यासाठी भक्तीत अवधान पाहिजे. भक्ती ही सुळावरील पोळी आहे, पण संतवचनांचे नेमके आचरण जर घडले तर, ती भक्ती सुलभ, सोपी होते. मनुष्याची सारी खटाटोप ही केवळ सुख मिळविण्यासाठी असते. प्रपंचात सुखाचा आभास असतो व परमार्थात अक्षय सुख, समाधान, शांती असून देखील ती आपल्याला मिळत नाही. ज्ञानेश्वरीचे नीट आकलन झाले तर हे सुखाचे निधान तुम्हाला प्राप्त होईल असे माऊलींचे प्रतिज्ञेवर सांगणे आहे. प्रपंच परमार्थमय झाला की, सुख प्राप्त होतेच. तो कसा करायचा याचे विज्ञान, माऊलींनी या अध्यायात अधिक स्पष्ट केले आहे. भक्ती कशी करावी याचे सुरेख मार्गदर्शन यात आहे.

म्हणूनच या अध्यायाचे नाव राजविद्या-राजगुह्ययोग आहे. याचा अर्थ राजाची विद्या म्हणजे सर्व विद्यांमध्ये श्रेष्ठ आणि राजगुह्य म्हणजे सर्व गुह्यात श्रेष्ठ. गुह्य म्हणजे गूढ, गोपनीय, अनाकलनीय.

**दिनांक १० एप्रिल**

माऊलींनी पहिल्याच ओवीत याचे महत्त्व सांगितले आहे.

**अहो चंद्रकांतु द्रवता कीर[1] होये । परि ते हातवटी[2] चंद्रीं कीं आहे ।**
**म्हणऊनि वक्ता तो वक्ताचि नोहे[3] । श्रोतेनविण ।।२९।।**



ॐ

*१) पाझरणे २) युक्ती ३) नाही*

**अर्थ -** अहो, चंद्रकांतमणी पाझरणारा आहे खरा, परंतु त्याला पाझरावयास लावण्याची युक्ती चंद्रामध्येच आहे (त्याप्रमाणे वक्ता पुष्कळ बोलेल खरा, पण त्याला बोलावयास लावण्याची हातवटी श्रोत्यांमध्ये आहे.) म्हणून श्रोत्यांशिवाय वक्ता हा वक्ताच नाही.

या ओवीत, ज्ञानेश्वरमाऊलींनी श्रोता व वक्ता यांच्या संवादात जरी दोघांनाही आनंद होत असला तरी श्रोतेच खरे या आनंदाला कारणीभूत आहेत असा श्रोत्यांचा गौरव केला आहे. श्री ज्ञानेश्वरीत संवादाच्या रूपाने एक नाट्य उभे राहिले आहे. माऊलींचा कधी आपल्या गुरूंशी, कधी श्रोत्यांशी तर कधी स्वतःशी हा संवाद आहे. शिष्य व गुरू, भक्त व भगवंत, तक्ता व श्रोता इत्यादी सर्व भावाने एक भगवंत किंवा श्रीगुरूच अखंड लीलानाट्य दाखवीत आहेत अशीच संतांची धारणा असते. आपण निरूपण करतो ही श्रोत्यांचीच मोठी कृपा आहे असे ज्ञानेश्वर म्हणतात. एकाग्र चित्ताने माझ्या गीतार्थाचे श्रवण करून मला उत्तेजित करा असे ते विनवून सांगतात.

**दिनांक ११ एप्रिल**

**मोटके[1] गुरुमुखें उदैजत[2] दिसे । आणि हृदयीं स्वयंभचि असे ।**
**प्रत्यक्ष फावो[3] लागे तैसें । आपैसयाचि ।।४१।।**

*१) थोडे २) उदयास येते ३) प्राप्त होते*

**अर्थ -** गुरुमुखातून ते ज्ञान अमळसे उगवताना दिसते. पण ते हृदयात मूळचे सिद्धच असते, तसे ते आपोआप प्रत्यक्ष अनुभवाला येऊ लागते.

गुरू आपल्याला आत्मस्वरूपाची जाणीव व बोध करून देतात. वास्तविक आपण मूळचेच ज्ञानस्वरूप आहोत. सर्व दुःखरहित केवळ ज्ञानमात्र चैतन्यस्वरूप आहे. आपल्या ठिकाणी असे ज्ञान प्रतिष्ठित असताना अज्ञानाने आपण दुःखे भोगत असतो. गुरूंच्या कृपेने या अविद्येचा नाश झाला की, आपण मूळचेच सुखरूप आहोत याचा बोध आपल्याला होतो.

**दिनांक १२, १३ व १४ एप्रिल**

**पाहे पां दूध पवित्र आणि गोड । पासी त्वचेचिया पदराआड ।**
**परि ते अव्हेरूनि गोचिड[1] । अशुद्ध[2] काय नेघती ।।५७।।**
**कां कमलकंदा आणि दुर्दुरी[3] । नांदणूक एकेचि घरी ।**
**परि परागु सेविजे भ्रमरी । जवळिला चिखलुचि उरे ।।५८।।**
**तैसा हृदयामध्ये मी रामु । असता सर्वसुखाचा आरामु[4] ।**
**की भ्रांतासि कामु । विषयावरी ।।६०।।**

*१) गोचिड नावाचा किडा २) रक्त ३) बेडकांना ४) विश्रांतीस्थान*

**अर्थ -** अर्जुना, (असे) पाहा की, दूध हे पवित्र असून शिवाय गोड आहे व ते जवळच कातडीच्या पदरापलीकडे आहे. परंतु गोचिड ते टाकून देऊन रक्तच पित नाही काय? ।।५७।।

किंवा कमळकंद आणि बेडूक यांची वस्ती एकेच ठिकाणी असते. परंतु कमळातील परागकण दूरचे भुंगे येऊन सेवन करून जातात व जवळच असलेल्या बेडकांना (मात्र) चिखलच शिल्लक राहतो. ।।५८।।

त्याप्रमाणे सर्व सुखाची खाण असा जो राम, तो मी (सर्वांच्या) हृदयात असताना (त्या मला न जाणून) मूर्ख लोक (सुखाकरिता) विषयांचीच इच्छा करतात. ।।६०।।

श्री ज्ञानेश्वरमाऊलींनी एक शाश्वत सिद्धांत या तीन ओव्यांतून सांगितला आहे व हा सिद्धान्त समजावण्यासाठी गोचिड व बेडूक यांचे दृष्टान्त अत्यंत काव्यमय स्वरूपात सांगितले आहेत. सिद्धान्त असा की, जीव हा परमात्म्याचा अंश आहे. चैतन्यरूपाने तो या शरीरातच आहे. पंचमहाभूतांचे शरीर नष्ट होते पण हा आत्मा अज, अमर आहे. म्हणून अंतिम सत्य हा आत्माच आहे व इतर सर्व विषयादि प्रपंच हा खोटा, भ्रामक आहे. पण मनुष्य मोहामुळे या आत्मस्वरूपाचा विचार करीत नाही. म्हणून मनुष्याची रजोगुणी बुद्धी विषयाला सत्य मानते. क्षणिक सुख देणाऱ्या भोगविषयांमध्ये इंद्रिये रमतात व अखंड सुख देणाऱ्या आत्मलाभाला ते पारखे होतात. वस्तूपासून, विषयांपासून अखंड सुख प्राप्त होत नाही हा सार्वकालिक अनुभव आहे. तशा सुखाची आशा करणे ही भ्रांती आहे. सुखाचा झरा अंतःकरणातच आहे. अक्षय्य शांती ही आत्मसुखात आहे. आत्मरूपाने असलेल्या अंतःकरणातल्या रामाला विसरून ही माणसे भोगविषयात रमतात. ती कशी? त्यासाठी माऊलींनी किती सुंदर, समर्पक दृष्टान्त दिले आहेत! गोचिड जवळच असलेल्या अमृततुल्य दुधाकडे न पाहता अशुद्ध रक्त पिते. तसेच कमळाच्या देठाकडेच चिखलात राहणारा बेडूक कमळातील परागकण न खाता त्याच्या वाट्याला चिखलच येतो. अशीच अश्रद्ध माणसे असतात. हृदयातील ईश्वरीअंशावर, रामावर श्रद्धा न ठेवता, प्रपंचात अहंता, ममता व अज्ञान यामुळे दुःखी होत असतात. अशा संसारात आसक्त असलेल्या अश्रद्ध लोकांना परमसुख कधीच प्राप्त होत नाही.

### दिनांक १५, १६ व १७ एप्रिल

**जयांचे वाचेपुढा भोजे[१] । नाम नाचतसे माझे ।**
**जे जन्मसहस्री वोळगिजे[२] । एक वेळ मुखासी यावया ।।२०६।।**
**तो मी वैकुंठी नसे । एक वेळ भानुबिंबीही[३] न दिसे ।**
**वरी योगियांचीही मानसे । उमरडोनी[४] जाय ।।२०७।।**
**परी तयापाशी पांडवा । मी हारपला गिवसावा[५] ।**
**जेथ नामघोषु बरवा । करिती ते माझे ।।२०८।।**

*१) आवडीने २) सेवा करावी ३) सूर्यमंडळात ४) ओलांडून, उल्लंघून ५) शोधून काढावा*

**अर्थ -** जे माझे नाम एक वेळ मुखात यावयास हजारो जन्म सेवा करावी लागते ते माझे नाम ज्यांच्या वाचेपुढे मोठ्या प्रेमाने नाचत असते. ।।२०६।।

तो मी एक वेळ वैकुंठात नसतो. एक वेळ सूर्यबिंबातही असत नाही. याशिवाय मी एक वेळ योग्यांची हृदये देखील उल्लंघन करून जातो. ।।२०७।।

परंतु अशा रीतीने मी जरी हरवलो असलो, तरी पण माझे भक्त जेथे माझा नामघोष करतात, त्याजपाशी, अर्जुना, मला शोधावा. ।।२०८।।

भगवंताचे स्मरण व्हावयास व मुखात नाम यावयास अनेक जन्मांचे पुण्य पदरी असावे लागते. श्रद्धेने, उत्कटतेने व हृदयापासून नाम यावयास पूर्वपुण्याई पदरी असावी लागते. ''अनंत जन्माचे तप एक नाम'' असे माऊलींनी हरिपाठातही म्हटले आहे. ''अनंत जन्माचे सुकृत पदरी । त्याचे मुखी हरि पैठा होय ।'' (ए. गा. ११२७) असे एकनाथ महाराजही म्हणतात. असा जो भगवंत आहे त्याला प्राप्त करण्याचे एकमेव साधन म्हणजे भक्तिप्रेम. परमात्मा परम प्रेमरूप आहे. त्याला आपल्या नामाचेही प्रेम असते. ''तुका म्हणे त्याला गोडी कीर्तनाची । नाही





आणिकांची प्रीती ऐसी ।'' (तुकाराम गाथा २१७१) भगवंत भावाचा भुकेला आहे. जिथे जिथे त्याचे नाम आवडीने व प्रेमाने घेतले जाते, तेथे तेथे तो आपले निर्गुण, निराकार स्वरूप विसरून भक्तांच्या मांदियाळीत सगुण स्वरूपाने प्रकट होतो. अशा श्रेष्ठ भक्तांना भगवंत शोधावा लागत नाही. भगवंतच त्यांचा शोध घेत अवतरत असतो. पुंडलिक परब्रह्माच्या शोधास गेला नव्हता, तर त्याच्या भेटीसच परब्रह्म चंद्रभागेच्या तीरावर आले. पुंडलिकाच्या आज्ञेमुळे कटीवर कर ठेवून अखंडपणे युगानुयुगे उभे राहिले. या ओवीतून नामसंकीर्तनाचा महिमा माऊलींनी गायिला आहे. भगवंत एखाद्या वेळेस वैकुंठात नसतील, सूर्यबिंबाच्या ठिकाणीही दिसणार नाहीत, योगी लोकांच्या हृदयातही सापडणार नाहीत, पण जेथे भगवंताच्या नामाचा जयघोष प्रेमाने चालला आहे तेथे मात्र ते नेमके सापडतील, असे माऊली म्हणते.

### दिनांक १८ एप्रिल

**हे आंतबाहेर मियां कोंदले[१] । जग निखिल[२] माझेचि वोतिले[३] ।**
**कीं कैसे कर्म तया आले । जे मीचि नाही म्हणती ।।३०२।।**

*१) व्यापिले, भरले २) सर्व ३) ओतलेले*

**अर्थ -** हे सर्व जग आतबाहेर माझ्याच रूपाने कोंदून भरले आहे. एवढेच नाही तर संपूर्ण जग माझीच ओतलेली मूर्ती आहे. पण असे असूनसुद्धा प्राण्यांचे दुर्दैव असे की, ते मीच (देवच) नाही असे म्हणतात.

वास्तविक पाहता भगवंतच सर्व नामरूपाने नटला आहे. त्यावाचून दुसरी वस्तूच नाही. जीवाला हे ज्ञान नसल्यामुळे तो प्रत्येक नामरूपाच्या ठिकाणी परमेश्वराहून भिन्न वस्तूची कल्पना करतो. या नुसत्या भ्रांतीमुळे अत्यंत प्राप्त असलेला परमात्मा जीवाला अप्राप्त झाला आहे. भगवंत या सृष्टीशी पूर्ण एकरूप आहेत. सूर्याच्या रूपाने ते जगाला प्रकाश देतात. वरुणाच्या रूपाने जल देतात. अग्नी होऊन जगाचे व्यवहार करतात. सत्-असत्, व्यक्त-अव्यक्त, विनाशी-अविनाशी... असे जे जे काही आहे, ते ते सर्व तोच आहे. भगवंत नाही असे ठिकाणच नाही. पण असे असूनसुद्धा जीव त्याला पाहत नाहीत. सर्व जगाच्या आत-बाहेर तोच व्यापून राहिला असूनसुद्धा जीवाला अज्ञानामुळे त्या भगवंताची जाणीवही होत नाही.

### दिनांक १९ व २० एप्रिल

**तैंसा मीवाचूनि कांहीं । आणीक गोमटेचि[१] नाही ।**
**मजचि नाम पाही । जिणेया[२] ठेविले ।।३३६।।**
**ऐसे अनन्यगतिके[३] चित्ते । चिंतितसांते[४] माते ।**
**जे उपासिती तयांते । मीचि सेवी ।।३३७।।**

*१) चांगले, गोड २) जीविताचे ३) एकनिष्ठ होऊन ४) चिंतन करीत असता*

**अर्थ -** त्याप्रमाणे माझ्याशिवाय दुसरे काही त्यांना चांगलेच वाटत नाही. आणि पाहा, ज्यांनी आपल्या जगण्यास माझेच नाव ठेवले आहे. ।।३३६।।

याप्रमाणे एकनिष्ठ चित्ताने माझे चिंतन करीत असता जे माझी उपासना करतात त्यांची सेवा मीच करतो. ।।३३७।।

सर्वभावाने जो भगवंताला समर्पित होतो अशा भक्ताचे हे वर्णन आहे. गीतेतील या २२व्या श्लोकावरील हे निरूपण आहे. ''तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहं'' यावरील हे भाष्य आहे. मी असा भक्तांची सर्व प्रकारची

ॐ

काळजी घेतो हे भगवंताचे आश्वासन आहे. भक्ताचे जीवन म्हणजे देह, दहा इंद्रिये, पंचप्राण, मन, बुद्धी, अहंकार या सर्वांचे व्यापार एक भगवंताकरिताच होऊन त्यांचे सर्व जीवन भगवन्मय होते व भगवत्प्रेमाकरिताच ते जीवन खर्ची घालतात. अशा अनन्यचित्ताने भक्ती करणाऱ्या भक्तांची सेवा भगवंत करतात. अशा भक्तांसाठी भगवंत सगुणरूप धारण करतो.

**दिनांक २१ व २२ एप्रिल**

**पैं भक्ति एकी मी जाणे । तेथ साने[1] थोर न म्हणे ।**
**आम्ही भावाचे पाहुणे । भलतेया ।।३९५।।**
**येर पत्र पुष्प फळ । तें भजावया मीस[2] केवळ ।**
**वांचूनि[3] आमुचा लाग निष्फळ[4] भक्तितत्व ।।३९६।।**

*१) लहान २) निमित्त ३) एरवी ४) अव्यभिचारी, निष्कलंक*

**अर्थ -** मी एक भक्तीच ओळखतो. मग त्या ठिकाणी लहान-थोर अशी निवड करीत नाही. आम्ही वाटेल त्याच्या भक्तीरूपी मेजवानीचे पाहुणे होतो. ।।३९५।।

बाकी पान, फूल, फळ यांचे अर्पण करणे, ते मला भजण्याचे केवळ निमित्त आहे. तर आम्हाला सर्वांत आवडते ते भक्ताचे शुद्ध भक्तितत्त्वच होय. ।।३९६।।

भगवंत भक्ताचे केवळ निर्हेतुक प्रेम पाहतो. श्रीकृष्णाने सुदाम्याने आणलेली पोह्याची पोटली सोडली. पुंडलिकासाठी विटेवर उभा राहिला. एकनाथांच्या घरी श्रीखंड्या म्हणून राहिला. प्रेमाशिवाय भगवंताला काहीही नको असते. "भावबळे आकळे येऱ्हवी नाकळे ।" असे माऊली हरिपाठात म्हणते. भक्ताचा अनन्यभाव म्हणजे खरी भक्ती. बाकी पान, फूल, फळ ही केवळ प्रेमाचे निमित्त आहेत. भगवंत केवळ भावाचा भुकेला आहे. आम्ही केवळ भावाचे पाहुणे आहोत म्हणून भाव हीच भक्ती. तेच खरे तत्त्व. असा भाव निर्माण झाला की भक्ताचे सर्व कर्म भगवंताला अर्पण होते. त्याचे स्वतःचे असे काही राहत नाही. हीच अनन्यभक्ती.

**दिनांक २३, २४ व २५ एप्रिल**

**जे जे कांही व्यापार करिसी । कां भोग हन भोगिसी ।**
**अथवा यज्ञी यजिसी । नानाविधी ।।३९८।।**
**ते क्रियाजात आघवे । जे जैसें निपजेल स्वभावें ।**
**ते भावना करोनि करावें । माझिया मोहरा[1] ।।४००।।**
**परि सर्वथा आपुलां जीवीं । केलियाचि शंका[2] कांहीचि नुरवी ।**
**ऐसी धुवोनि कर्मे द्यावी । माझिया हाती ।।४०१।।**

*१) मत्प्रीत्यर्थ २) आठवण*

**अर्थ -** जे जे काही व्यवहार करशील, किंवा शब्दादि विषयांचा भोग घेशील, अथवा अनेक प्रकारच्या यज्ञरूप कर्मांनी हवन करशील ।।३९८।।

जे जे कर्म जसे तुझ्याकडून स्वभावतः घडेल ते सर्व कर्म माझ्याप्रीत्यर्थ आहे, अशा समजुतीने कर. ।।४००।।

परंतु अमुक कर्म मी केले अशी कर्तृत्वाची आठवण आपल्या मनामध्ये तू मुळीच ठेवू नकोस; याप्रमाणे सर्व कर्म शुद्ध करून मला अर्पण कर. ।।४०१।।



ॐ

"यत् करोषि यदश्नासि..." या २७व्या श्लोकावरील हे निरूपण आहे. "तू जे जे करतोस, जे भोगतोस, जे हवन करतोस, जे दान करतोस, जे तप करतोस ते सर्व मला अर्पण कर," असे भगवंत अर्जुनाला सांगतात. कर्मबंधनातून सुटण्याचा हा राजमार्ग आहे. स्वभावधर्मांनुसार जी जी कर्मे हातून घडतात ती सर्व कर्मे भगवंताला अर्पण करायची. माझ्या हातून ते कर्म घडले आहे ही कर्तृत्वाची व अहंकाराची भावना मनातून काढून टाकून मोकळे व्हायचे. असे झाले की कर्मे शुद्ध होतात. या शुद्ध कर्मरूपी फुलांनी भगवंताची पूजा करायची. ज्याप्रमाणे अग्नीत टाकलेले बीज अंकुर स्थितीला पोहोचत नाही त्याप्रमाणे भगवंताला अर्पण केलेल्या बऱ्या-वाईट कर्मांपासून कोणतेही फळ निर्माण होत नाही.

**दिनांक २६ एप्रिल**

**यालागी दुष्कृती[1] जऱ्ही जाहला । तरि अनुतापतीर्थी[2] न्हाला ।**
**न्हाऊनि मजआंतु आला । सर्वभावे ।।४२०।।**

*१) पापी २) पश्चात्तापरूप तीर्थात*

**अर्थ -** तो पूर्वीचा जरी पापी, दुराचरण करणारा असला तरी नंतर त्या विषयीच्या पश्चात्तापरूपी तीर्थात त्याने स्नान केले, आणि अशा प्रकारचे स्नान करून सर्व भावांनी (तो) माझ्या ठिकाणी अनन्य झाला.

दुराचरणी व पापी मनुष्यालासुद्धा श्रेयाचा मार्ग मोकळा आहे. आपल्या गतकर्मांबद्दल अंतःकरणातून तो पश्चात्तापदग्ध झाला असेल, आणि भगवंताला सर्वभावे शरण जाऊन तो अनन्यभावाने भगवंताची भक्ती करीत असेल तर असा मनुष्यदेखील साधुपुरुष होऊ शकतो. असा पूर्वाश्रमीचा पापी मनुष्यसुद्धा भवसागरातून तरून जातो. कर्मबंधनातून सुटका होऊन त्याला उत्तम गती प्राप्त होऊ शकते.

**दिनांक २७ व २८ एप्रिल**

**जैसा दीपे दीपु लाविजे । तेथ आदील[1] कोण हे नोळखिजे[2] ।**
**तैसा सर्वस्वे जो मज भजे । तो मी होऊन ठाके ।।४२८।।**
**मग माझी नित्य शांती । तया दशा तेची कांती[3] ।**
**किंबहुना जिती । माझेचि जीवे ।।४२९।।**

*१) पहिला २) ओळखत नाही ३) स्वरूप*

**अर्थ -** ज्याप्रमाणे एका दिव्याने दुसरा दिवा लावला असता त्यातील पहिला कोणता, हे ओळखता येत नाही, त्याप्रमाणे जो सर्व भावांनी माझे भजन करतो तो मद्रूप होऊन राहतो. ।।४२८।।

मग माझी नित्य शांती, तीच त्याची स्थिती व तेज आहे. फार काय सांगावे! माझ्या जीवाने ते जगलेले आहेत. ।।४२९।।

अनन्यभावाने भक्ती करणारा भक्त भगवंताच्या निकट सान्निध्यात जातो. पुढे पुढे असा भक्त भगवंताशी एकरूप होऊन जातो. ज्याप्रमाणे एका दिव्याने दुसरा दिवा लावला असता त्यातील पहिला कोणता हे जसे ओळखता येत नाही, तसे भक्त व भगवंत यांची अवस्था होते. म्हणूनच संत तुकाराम "आम्ही वैकुंठवासी..." असे म्हणतात. अशा भक्तांना भगवंताच्या स्वरूपशांतीची प्राप्ती होते. ते भूलोकीचे ईश्वरच असतात. ज्ञानेश्वरमाऊलींना यासाठीच महाविष्णूचा अवतार म्हटले जाते.

ॐ

## दिनांक २९ एप्रिल

**माझिये भक्तीविण । जळो ते जियालेपण[1] ।**
**अगा पृथ्वीवरी पाषाण[2] । नसती काई ।।४३६।।**

*१) जीवित, जगणे २) दगड*

भगवंताच्या भक्तीशिवाय जे जे प्राप्त झाले आहे ते ते सर्व व्यर्थ आहे. भगवंताच्या भक्तीने सर्वांचा उद्धार होतो. पापी मनुष्यसुद्धा अनन्यभक्त होऊन भवसागरातून तरून जाऊ शकतो. ईश्वराची अनन्यभक्ती करून त्याला सर्वस्व अर्पण करणारा भक्त तद्रूप होऊन उत्तम गती प्राप्त करून घेतो. माझ्या भक्तीने जीवाचा उद्धार होतो, हे भगवंताचे आश्वासन आहे. पण त्याच्या भक्तीशिवाय जगणे म्हणजे जीवन व्यर्थ घालविणे होय. माऊली म्हणते की, त्या जगण्याला आग लागो. पृथ्वीवर दगड जसे आहेत तसे त्यांचे जगणे आहे.

## दिनांक ३० एप्रिल

**यापरी पापयोनीही[1] अर्जुना । कां वैश्य शूद्र अंगना[2] ।**
**माते[3] भजता सदना[4] । माझिया येती ।।४७४।।**

*१) हलक्या कुळातील २) स्त्रिया ३) मला ४) घरी*

**अर्थ** - याप्रमाणे अर्जुना, दुष्ट जातीत जन्म झालेले किंवा वैश्य, शूद्र अथवा स्त्रिया यांनी माझे भजन केले असता, ती सर्व माझ्या स्वरूपाला येऊन मिळतात.

भगवंताच्या ठायी स्पृश्यास्पृश्य, लहान-थोर, उच्च-नीच असा भेदाभेद नाही. सर्वच जण त्याची लेकरे आहेत. भगवंताचा अंश प्रत्येकाच्याच हृदयात विराजमान आहे. म्हणून कोण कोणत्या जातीचा हे भगवंताच्या ठायी नसते. भगवंत फक्त भावाचा, भक्तीचा भुकेला आहे. म्हणून पापयोनी, वैश्य, शूद्र, अंत्यजादी कोणीही असोत तो जर अनन्यचित्त होऊन भक्ती करत असेल तर त्याला भगवत्प्राप्ती होऊ शकते. भेदाभेद हे माणसानेच निर्माण केले आहेत. भारतातील सर्व जाती-धर्मांमध्ये श्रेष्ठ भक्त निर्माण झाले आहेत. संत रोहिदास, कबीर, सजन कसाई, सावता माळी अशी संतांची मांदियाळी ही ईश्वरमय होऊन आपले जीवन धन्य करून गेली.

## दिनांक १ मे

**म्हणोनि मृत्युलोकी सुखाची कहाणी[1] । ऐकिजेल कवणाचा श्रवणी[2] ।**
**कैंची सुखनिद्रा आंथरुणी । इंगळांचा ।।५०१।।**

*१) गोष्ट २) कानांनी*

**अर्थ** - एवढ्याकरिता या मृत्युलोकात सुखाची नुसती गोष्ट कोणाला आपल्या कानाने ऐकता येईल काय? इंगळ्यांनी (निखाऱ्यांनी) भरलेल्या अंथरुणावर आनंदाने झोप कोठून येणार?

अनित्य, असुखमय मृत्युलोकात भगवंताच्या भजनाशिवाय दुसरे कोणते सुख आहे? देहात्मकतेने घेतलेली इंद्रियसुखे ही क्षणिक आहेत. विषयांपासून सुख प्राप्त होते ही केवळ भ्रांती आहे. विषाचे कांदे वाटून जो रस निघेल, त्या रसाला जर कोणी अमृत म्हटले तर त्यापासून अमरत्व प्राप्त होईल का? असे माऊली म्हणते. विषयाचे जे सुख ते केवळ परमदुःख आहे. पण असे असतानासुद्धा मूर्ख माणसे त्याचे सेवन करावयाचे राहतात का? जसे निखारे



ॐ

असणाऱ्या अंथरुणावर झोप लागत नाही तसे दुःखाने भरलेल्या या जगात कोणत्याही वस्तुविषयापासून सुख मिळत नाही. भगवंतच केवळ सुखस्वरूप आहे. त्याचे चिंतन, स्मरण, भक्ती हेच केवळ सुखाचे निधान आहे.

## दिनांक २, ३ व ४ मे

**दुर्दर[1] सापे गिळिजतु आहे उभा । की तो मासिया[2] वेटाळी जीभा ।**
**तैसे प्राणिये कवणा लोभा । वाढविती तृष्णा ।।५१४।।**
**अहा कटा[3] हे वोखटे । मृत्यूलोकीचे उफराटे[4] ।**
**एथ अर्जुना जरी अवचटे[5] । जन्मलासी तू ।।५१५।।**
**तरि झडझडोनि वहिला[6] निव । इये भक्तीचिये वाटे लाग ।**
**जिया[7] पावसी अव्यंग[8] । निजधाम माझे ।।५१६।।**

*१) बेडूक २) माशीला ३) हायहाय ४) उलटेच ५) दैववशात् ६) वेगळा ७) ज्या भक्तीने ८) दोषरहित*

**अर्थ** - बेडूक सापाकडून उभा गिळला जात असताना देखील, तो बेडूक, उडत असलेल्या माश्यांना पकडण्याकरिता जीभ बाहेर काढून वेटाळीत असतो. तशाच तऱ्हेने प्राणी कोणत्या लोभाने तृष्णा वाढवितात कोण जाणे! ।।५१४।।

अरेरे! हे वाईट आहे!! मृत्युलोकातील सर्वच न्याय उफराटा आहे. अर्जुना, तू जरी येथे दैववशात् जन्मला आहेस. ।।५१५।।

तरी या मृत्युलोकाच्या राहाटीतून झटकन् मोकळा हो. आणि या भक्तीच्या मार्गाला लाग. कारण त्या भक्तीच्या योगाने तू माझे निर्दोष स्वरूप पावशील. ।।५१६।।

मनुष्य विषयांच्या मागे लागला की, कुठे थांबावे याचे भान त्याला राहत नाही. माणसाच्या इच्छांना अंत नाही. एक इच्छा पूर्ण झाली की, दुसरी इच्छा त्यातूनच निर्माण होते. तृष्णा कधीही पूर्ण होत नाही. पण मनुष्य मात्र सेकंदा-सेकंदाला मृत्यूच्या दाढेजवळ जात असतो. काहीही मिळविले व कितीही मिळविले तरी मृत्यू अटळ असतो. भगवंताचे स्मरण जर नसेल, तर अखेरच्या श्वासापर्यंत मनुष्य तृष्णांच्याच अधीन असतो. शेवटच्या क्षणीही ही संसाराविषयीची आसक्ती सुटत नाही. श्री ज्ञानेश्वर या अवस्थेचे वर्णन किती समर्पक उपमा-दृष्टान्त देऊन करीत आहेत! बेडकाला सापाने शेपटीकडून गिळलेले असते. काही क्षणांतच तो मृत्यूच्या अधीन होणार असतो, पण जीवन संपत असतानासुद्धा माश्या दिसताक्षणीच, त्यांना पकडण्याकरिता तो जीभ बाहेर काढून वेटाळीत असतो. या मृत्युलोकाचेही असेच आहे. समोर मृत्यू उभा असतानासुद्धा असेच मोहवश होऊन, वासनेच्या अधीन तो होत असतो. श्री माऊली या ओव्यांतून मनुष्य जीवनाचे विदारक सत्य आपल्यासमोर मांडत आहेत. या क्षणिक जीवनात अमृतसुखाचा अनुभव घ्यायचा असेल तर विषयांच्या मागे न लागता भक्तीच्या वाटेने जायला पाहिजे. वासनेच्या जागी वासुदेवाला प्रतिष्ठित केले पाहिजे. अर्जुनाला उपदेश करताना, या मृत्युलोकाची उफराटी कहाणी भगवंत सांगत आहेत. येथे सुख म्हणून जे कवटाळले जाते ते सुखाचा बुरखा घेतलेले दुःखच असते. मूल वर्ष सरले की, एक एक वर्षाने मृत्यूकडे वाटचाल करीत असते, तरी त्याचा वाढदिवस आनंदाने साजरा केला जातो. केवळ वय वाढलेले असते म्हणून वृद्धांच्या पाया पडले जाते. अशा या संसारचक्रातून अर्जुना, तू अंग काढून बाहेर नीघ आणि भक्तिमार्गाला लाग. तू माझा सखा आहेस म्हणून मी हे तुला सांगत आहे.

दिनांक ५, ६ व ७ मे

तू मन हे मीचि करी । माझा भजनी प्रेम धरी ।
सर्वत्र नमस्कारी । मज एकाते ।।५१७।।
माझेनी अनुसंधाने[1] देख । संकल्पु जाळणे निःशेख ।
मद्याजी[2] चोख[3] । याचि नाव ।।५१८।।
ऐसा मियां आथिला[4] होसी । तेथ माझिया स्वरूपा पावसी ।
हे अंतःकरणीचे तुजपासी । बोलिजत असे ।।५१९।।

*१) एकाग्र चित्त होऊन २) माझे यजन करणारा ३) निर्मळ ४) माझ्या योगाने संपन्न*

**अर्थ** - तू आपले मन मद्रूप कर (माझ्या ठिकाणीच ठेव). माझ्या भजनाच्या ठिकाणी प्रेम धर. आणि सर्व ठिकाणी माझेच स्वरूप आहे असे समजून, मला एकाला नमस्कार कर. ।।५१७।।

पाहा, जो माझ्या वेधाने संकल्प पूर्णपणे जाळतो, त्यालाच माझे चांगले भजन करणारा म्हणावे. ।।५१८।।

याप्रमाणे, तू माझ्या योगाने संपन्न होशील तेव्हा मद्रूपास पावशील. ही माझ्या अंतःकरणातील (गुह्य गोष्ट) तुझ्याजवळ मी सांगत आहे. ।।५१९।।

आपल्या मनातील गुह्य गोष्ट, भगवंत अर्जुनाला सांगत आहेत. हे राजगुह्य आहे. शेवटच्या ३४व्या श्लोकात ही राजविद्या सांगितली आहे. केवळ एका श्लोकात हे प्रकट केले आहे. हेच नवव्या अध्यायाचे सार आहे. भक्तीचे संपूर्ण रहस्य यात दडले आहे. हा श्लोक म्हणजे सर्व रत्नांतील कंठमणी आहे. म्हणून असाच श्लोक थोडा बदल करून भगवंतांनी अठराव्या अध्यायात (श्लोक ६५) पुन्हा सांगितला आहे. माऊलींनी सोप्या शब्दांत यावर निरूपण केले आहे. ''मन्मनाभव'' - 'तू मला मन दे,' हा जीवनमंत्र येथे सांगितला आहे. या भवसागरातून तरून जाण्यासाठी सर्वभावे तू मला भज. माझे केवळ प्रेमाने भजन कर. केवळ माझेच चिंतन कर. तुझा प्रेमभाव मलाच दे. तुझे संपूर्ण जीवनच माझ्या हाती दे. अनन्यचित्त होऊन तू मलाच चिकट. केवळ माझ्या वेधानेच तुझे संकल्प निघून जातील. माझ्या योगाने असा जेव्हा संपन्न होशील, त्या वेळीच तू मद्रूपास पावशील. ही माझ्या अंतःकरणातील गुह्यतम गोष्ट मी तुझ्याजवळ सांगत आहे, असे भगवंत आपल्या लाडक्या शिष्याला सांगत आहेत.

।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।





# अध्याय १०
# विभूतियोग

दिनांक ८ मे

या अध्यायात भगवंत स्वतःहून आपले स्वरूप, आपला पत्ता व ठावठिकाणा सांगत आहेत. हा अध्याय सर्वांना भगवंताचे सहजसाध्य दर्शन घडविणारा आहे. भगवंत केवळ मूर्तीत नाही. त्याची असंख्य रूपे आहेत. अखिल ब्रह्मांडात तो भरून उरला आहे. विश्वात्मक देवाची संकल्पना या अध्यायात प्रगट झाली आहे. ''विविधतेत एकता'' ही आजची संकल्पना नसून गीतेने ती पाच हजार वर्षांपूर्वी उद्घोषित केली आहे. हा विभूतियोग आहे. विभूती म्हणजे ऐश्वर्य, शोभा! योग म्हणजे कौशल्य! ऐश्वर्य किंवा शोभा प्रकट करण्याचे कौशल्य म्हणजे विभूतियोग. श्री ज्ञानेश्वरमाऊलींनी यावर भाष्य करताना, भक्तिशास्त्रातील काही मौलिक सिद्धान्त सोप्या शैलीत मांडले आहेत.

तो चालतें ज्ञानाचे बिंब । तयाचे अवयव हे सुखाचे कोंभ ।
परी माणुसपणाची भांब[1] । लोकाचि भागु[2] ।।७७।।

*१) भ्रम २) भाग*

**अर्थ** - तो ज्ञानाची चालती मूर्ती आहे, त्याचे अवयव हे सुखाला फुटलेले अंकुर आहेत. परंतु (त्याच्या ठिकाणी दिसणारा) मनुष्यपणा हा लोकांच्या दृष्टीला होणारा भ्रम आहे.

अर्जुनावरील प्रेमामुळे भगवंत आपल्या स्वरूपाचे वर्णन करीत आहेत. आपण म्हणजेच हे सर्व विश्व आहे. माझे हे रूप वेदांनाही जाणता आले नाही. देवानासुद्धा यथार्थ ज्ञान झाले असे नाही. मोठमोठ्या ऋषिमुनींनासुद्धा माझ्या उत्पत्तीचे व स्वरूपाचे ज्ञान झाले नाही.

पण जो अंतर्मुख होऊन आत्मज्ञान प्राप्त करतो तो शुद्ध आत्मज्ञानाच्या योगाने माझ्या स्वरूपाचे रहस्य जाणतो. तो मला जन्मरहित, अनादि व लोकमहेश्वर असे जाणतो. असा जो ज्ञानी पुरुष आहे, तो जरी मनुष्यरूपात वावरत असला तरी तो माझाच अंश आहे. तो म्हणजे ज्ञानाची मूर्ती आहे. त्याच्या ठिकाणी दिसणारा मनुष्यपणा हा लोकांच्या दृष्टीला होणारा भ्रम आहे. शरीरधारी असूनही त्याने ईश्वरत्व प्राप्त करून घेतलेले असते.

दिनांक ९ मे

ऐसेनि हे विश्व येथें । मीचि प्रसवलाना निरुतें[1] ।
परि भावाचेनि[2] हातें[2] । माने[3] जया ।।१०३।।

*१) खरोखर २) भावाच्या साह्याने ३) जे मानील त्याला*

**अर्थ** - याप्रमाणे हे दिसत असलेले विश्व खरोखर माझ्यापासूनच (निर्माण) झाले नाही काय? परंतु हा सर्व माझाच विस्तार आहे, अशा भावाने जो पाहील त्याला हे निश्चित पटेल.

परब्रह्म सच्चिदानंद स्वरूप आहे. जगत् जड व विनाशी भासते पण सच्चिदानंद परब्रह्मापासून जडसृष्टी उत्पन्न झाली आहे. म्हणून हे जगदेखील परब्रह्मस्वरूप आहे. हे सर्व अस्तित्वात आलेले कार्यपदार्थ माझ्या विभूती आहेत व त्यांच्या योगानेच हे जग व्यापले आहे. मुंगीपासून ब्रह्मदेवापर्यंत माझ्यावाचून दुसऱ्या वस्तूचे अस्तित्वच नाही.

ॐ

कश्यपादी सात ऋषी, चार मनू, स्वर्गादी लोक इत्यादी सर्व माझ्यामुळेच निर्माण झाले आहेत. बीजापासून जसे फांद्या, फुले, पाने, फळे निर्माण होतात तसा माझा हा विस्तार आहे. प्रथम मी एकटाच होतो. पण नंतर हा सारा ब्रह्मांडाचा विस्तार माझ्यापासून झाला, म्हणून प्रत्यक्ष दिसणारे हे विश्व माझ्यापासूनच निर्माण झाले नाही काय? जो अशा दृष्टीने मला पाहतो त्याच्या मनात याविषयी काहीही शंका राहत नाही.

**दिनांक १० व ११ मे**

**ऐसिनि[1] जे निजज्ञानी[2] । खेळत सुखे त्रिभुवनी ।**
**जगद्रूपा मनीं । सांठवूनि माते ।।११७।।**
**जे जे भेटे भूत[3] । ते तें मानिजे[4] भगवंत ।**
**हा भक्तियोगु निश्चित । जाण माझा ।।११८।।**

*१) अशा प्रकारे २) आत्मज्ञानी ३) प्राणी ४) मानावे*

**अर्थ** – अशा माझ्या ज्ञानाने युक्त असलेले जे आत्मज्ञानी आहेत, ते मी जो जगद्रूप, त्या मला अंतःकरणात साठवून त्रैलोक्यात सुखाने क्रीडा, व्यवहार करीत असतात. ।।११७।।

जो जो प्राणी दिसेल, तो तो प्रत्यक्ष परमात्मा आहे असे समजावे. हाच माझा भक्तियोग आहे असे निश्चित समज. ।।११८।।

जशा समुद्रावर लाटा असतात त्या वेगळ्या जरी दिसल्या तरी पाणी व लाटा एकच असतात. लाटा येतात व जातात पण पाणी स्थिर असते. तसे या विश्वात भगवंताशिवाय वेगळे काही नाही. हे जाणून जे भक्त आत्यंतिक प्रेमभावाने भगवंताचे भजन करतात ते सर्व भगवंताशी एकरूप होतात. असे लोक सुखाने माझे भजन, कीर्तन, ध्यान करून माझ्याच गुणाचे वर्णन करीत असतात.

११८ व्या ओवीत माऊलींनी भक्तीचा परमोच्च सिद्धान्त सांगितला आहे. जे लोक ऐक्यभावाने, अभेददृष्टीने जगाकडे पाहतात त्यांनाच हा भक्तियोग प्राप्त होतो. "विष्णुमय जग" हाच खरा वैष्णवांचा धर्म आहे. प्रत्येक भूतमात्रात तो ईश्वर विराजमान आहे. म्हणून जो जो प्राणी दिसेल तो तो परमात्मा आहे अशी ज्याची ऐक्यदृष्टी झालेली असते तिलाच भक्तियोग असे म्हणतात. सर्व प्राणिमात्रात एकच परमात्मतत्त्व पाहणे हा खरा भक्तियोग आहे. म्हणूनच श्री ज्ञानेश्वरांनी विश्वात्मक देवाची संकल्पना मांडली. सर्व संतांना या ऐक्यदृष्टीचे अनुभूती आली. श्री एकनाथ महाराजांनी काशीहून आणलेली गंगा तहानेने व्याकुळ झालेल्या गाढवाच्या मुखात ओतली. संत तुकारामांनी उसाचे तुकडे घरी येता येता, सर्व मुलांना वाटून टाकले. अशी भक्तीची दृष्टी आली की भेदाभेद संपतो. आत्मज्ञानानंतर होणाऱ्या भक्तीचे हे स्वरूप आहे.

**दिनांक १२ मे**

**ते जो जो खेळ दावी । तो तो पुढे सोनयाचा[1] करूनी ठेवी ।**
**तैसी उपास्तीचा[2] पदवी[2] । पोषित[3] मी जाये[3] ।।१३५।।**

*१) सोनुल्याचा २) उपासनेचा अधिकार ३) पोसली जाते*

**अर्थ** – ते बालक जो जो खेळ दाखवील तो तो खेळ ती आई त्यांच्यापुढे सोन्याचा करून ठेवते त्याप्रमाणे माझ्या भक्तांच्या उपासनेचा अधिकार मी वाढवीत जातो.



ॐ

भक्तांच्या अनन्यप्रेमाला, भगवंत तात्काळ दाद देतो. आई जशी आपल्या तान्हुल्याच्या पाठीशी असते व आपल्या प्रेमाचे पांघरूण घालून त्याचे सदैव रक्षण करीत असते, तसे भगवंत या अनन्यभक्तांना शक्ती, बुद्धी, ज्ञान देऊन त्यांचा उपासनेचा अधिकार वाढवीत असतो. "न मे भक्तः प्रणश्यति"- 'माझ्या भक्ताचा कधीच नाश होत नाही या आश्वासनाप्रमाणेच हे आश्वासन आहे. भगवंताचे आपल्या भक्तांवर देखील तसेच उत्कट प्रेम असते. भक्तांचे प्रेमसुख वाढावे व त्याला काळाची दृष्ट लागू नये अशी काळजी भगवंत घेतात.

**दिनांक १३ मे**

**आजि आयुष्या उजवण[1] जाहली । माझिया दैवा दशा[2] उदयली[3] ।**
**जे वाक्यकृपा[4] लाधली[5] । दैविकेनि[6] मुखे ।।१४७।।**

*१) साफल्य, सार्थक २) स्थिती ३) प्रकाशली ४) प्रसादवाणी ५) प्राप्त झाली ६) सुदैवाने*

**अर्थ** – देवाच्या मुखाने माझ्यावर बोधामृतरूपी वचनाची कृपा झाली. म्हणून ते वचन ऐकून आज माझ्या आयुष्याची सफलता झाली व माझ्या दैवाच्या भाग्यदशेस प्रारंभ झाला.

भगवंताच्या उपदेशाने अर्जुनाला जणू आत्मज्ञान प्राप्त झाले. हृदयातील अज्ञानाचा, अविद्येचा अंधार दूर झाला. दिव्य प्रकाशाने दृष्टी बदलली व नवा जन्मच झाला आहे असे अर्जुनाला वाटले. भगवंताच्या स्वरूपाचे ज्ञान झाल्याने हे विश्वदेखील खरोखर ब्रह्मस्वरूप आहे याची अर्जुनाला अनुभूती आली. भगवंताच्या उपदेशाने व बोधाने आपले जीवन कृतार्थ, धन्य झाले व दैवयोगाने आपल्याला उत्तम दिवस आलेत याबद्दल अर्जुन कृतज्ञता व्यक्त करीत आहे.

**दिनांक १४ मे**

या वाक्यरूपी प्रकाशामुळे माझ्या आत-बाहेरील जन्ममरणरूप अज्ञान नाहीसे झाले आहे असे अर्जुनाने सांगितले.

**इंद्रियाआतु अकरावें[1] । मन[1] ते मी हे जाणावें ।**
**भूतांमाजी[2] स्वभावे । चेतना[3] ते मी ।।२२४।।**

*१) इंद्रियांमध्ये अकरावे ते मन २) प्राणिमात्रात ३) चैतन्य*

**अर्थ** – इंद्रियांमध्ये अकरावे असणारे जे मन, ती माझी विभूती आहे असे समज व सर्व प्राण्यांमध्ये स्वाभाविक असलेली जी चेतना ती माझी विभूती आहे.

अर्जुनाच्या प्रेमळ विनंतीमुळे भगवंतांनी प्रसन्न होऊन आपल्या दिव्य विभूतींचे वर्णन केले. आपणच सर्व भूतमात्रांच्या अंतःकरणातील आत्मा आहोत, विष्णू नावाची देवता मीच आहे, तेजस्वी पदार्थांमध्ये सूर्य मी आहे... अशा विभूती सांगत असताना, मनुष्याला लाभलेले अद्भुत मन ही भगवंताची विभूती आहे, असे भगवंतांनी सांगितले. पाच ज्ञानेंद्रिये व पाच कर्मेंद्रिये याचबरोबर अकरावे मन ही भगवंताची विभूती आहे, तसेच सर्व प्राणिमात्रांत असणारे चैतन्य ही सुद्धा भगवंताचीच विभूती आहे.

**दिनांक १५ मे**

**हे काय कितीएक सांगावे । तुवांही देखिले ऐकिले असे आघवे[1] ।**
**तरि यादवांमाजी जाणावे । हेचि स्वरूप[2] माझे ।।२९२।।**

*१) सर्व २) प्रधान विभूती*

निरनिराळ्या जीववर्गात, त्या वर्गातील श्रेष्ठ जीवांना, भगवंतांनी आपली श्रेष्ठ विभूती म्हटले आहे. आता भगवंत स्वतःच्या दिव्य जन्माबद्दल सांगत आहेत. यादव कुळातील ऐश्वर्यवान असा जो कृष्ण तो मीच आहे. त्याचा जन्म वसुदेव व देवकी यांच्या पोटी झाला. आणि त्याचे संगोपन यशोदामातेकडे गोकुळात झाले. त्याच कृष्णाने गोकुळात आपल्या असंख्य बाललीलांनी गोकुळवासीयांचे रक्षण केले. पूतना नावाच्या राक्षसिणीचा वध केला. कालिया नावाच्या नागाचा नाश केला. कंसासारख्या दुष्ट, अत्याचारी राजाचा वध केला. असा जो वृष्णिकुळात जन्मलेला कृष्ण हे परब्रह्मच आहे.

**दिनांक १६ मे**

**आतां पै माझेनि एके अंशे । हे जग व्यापिले असे ।**
**यालागी भेद सांडूनि सरिसे[1] । साम्यें भज ।।३१७।।**

*१) सारखे, बरोबर*

**अर्थ -** माझ्या एकाच अंशाने हे सर्व जग व्यापलेले आहे. याकरिता आता भेदभावना टाकून ऐक्यदृष्टीने मला सर्व ठिकाणी सारखे भज.

भगवंतांनी आपल्या ७५ विभूती सांगितल्या. जी जी वस्तू वैभवाने, संपत्तीने अथवा उदारतेने युक्त असेल, ती ती माझ्या तेजाच्या अंशापासून उत्पन्न झाली आहे असे भगवंतांनी साररूपाने सांगितले. पावसाच्या धारांची जशी गणती करता येत नाही किंवा महासागराच्या लाटा जशा मोजता येत नाहीत तशा या विभूतींना मोजमाप नाही. निवडक पंचाहत्तर विभूती मात्र कथन केल्या. या विभूतिविस्ताराला मर्यादाच नाही. म्हणून यातील वर्म भगवंतांनी सांगितले. जेवढ्या म्हणून वस्तू आहेत, त्या मीच एक आहे असे समज. हे संपूर्ण विश्वच मी आहे. आता यातील प्रधान व गौण असा भेद तरी कसा करायचा? म्हणून एवढेच जाण की, माझ्या एकाच अंशाने हे सर्व जग व्यापलेले आहे. म्हणून तू कसलाच भेदाभेद बाळगू नकोस. सर्वत्र मीच व्यापून राहिलो आहे. अशा ऐक्यदृष्टीने समग्र विश्वाकडे पाहा, असे शेवटी भगवंताने अर्जुनाला सांगितले.

**।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**





## अध्याय ११ वा
## विश्वरूपदर्शनयोग

**दिनांक १७ मे**

भगवंतांनी दहाव्या अध्यायात आपल्या दिव्य विभूतींचे समग्र वर्णन केले. ते ऐकून अर्जुनाला परमेश्वराचे विश्वरूप पाहण्याची इच्छा झाली. अर्जुनाच्या प्रश्नावरून भगवंतांनी आपले दिव्य, भव्य रूप त्याला दाखविले. त्या विश्वरूपाचे वर्णन अकराव्या अध्यायात आले आहे. आजवर कोणाही भक्ताला न दाखविलेले अद्भुत विश्वरूप अर्जुन पाहणार आहे. भगवंताच्या अर्जुनावरील प्रेमाला इथे भरती आली आहे. अर्जुनाने केवळ विचारण्याचाच अवकाश की, भगवंतांना किती आणि कसे देऊ याचेच कोडे पडले आहे. मागील अध्यायात याची पूर्वसूत्रे आली आहेत. केवळ एका अंशानेच हे जग जर व्यापून राहिले आहे, तर संपूर्ण ब्रह्मांडाचा विस्तार किती अमर्याद असला पाहिजे. हा अध्याय म्हणजे अर्जुनावरच्या प्रेमाचा प्रसाद आहे.

**हे सारस्वतांचे[1] गोड । तुम्हींचि लाविलें जी झाड ।**
**तरी आतां अवधानामृते[2] वाढ[3] । सिंपोनि[4] कीजे ।।१९।।**

*१) विद्येचे, वाङ्मयाचे २) एकाग्र लक्षरूपी अमृताने ३) मोठे ४) शिंपून*

**अर्थ -** महाराज, हे सारस्वताचे सुंदर झाड आपणच लावले आहे. तर आता याकडे आपण लक्ष देणे हेच कोणी एक अमृत ते शिंपून मोठे करावे.

या एका ओवीत श्री ज्ञानेश्वरमाऊलींनी श्रोत्यांना व आपल्या सद्गुरूंना कळकळीची विनंती केली आहे. ते म्हणतात, "महाराज, हे ब्रह्मविद्येचे सुंदर झाड आपणच लावले आहे. म्हणून आपणच एकाग्र चित्त करून, अवधानरूपी अमृताचे शिंपण करून याला मोठे करावे. मग हे झाड नाना प्रकारच्या अर्थरूपी पाना-फळांनी बहरून येईल व सर्व जगाला श्रवणसुखाचा लाभ होईल. ज्याप्रमाणे प्रयागक्षेत्रात गंगा व यमुना या दोन नद्यांच्या ओघांचा संगम झाला आहे त्याप्रमाणे या अध्यायात शांत व अद्भुत या दोन रसांचा मिलाफ होऊन हा अध्याय प्रयाग क्षेत्रच बनला आहे. म्हणून सर्व जग येथे स्नान करून पवित्र होते. धर्माचा ठेवा जे माझे गुरू निवृत्तिनाथ, त्यांनी मला निमित्त केले व संस्कृतचे कठीण किनारे भेदून मराठी भाषेमध्ये सुलभ शब्दरूपी घाट बांधावयास प्रवृत्त केले. म्हणून या अध्यायात, भगवंताचे विश्वरूपदर्शन घेऊन पावन व्हावे अशी विनंती माऊली करते आहे. म्हणून आपल्या निरूपणाकडे अत्यंत एकाग्र चित्ताने लक्ष द्यावे, असे ते सांगतात.

**दिनांक १८ मे**

**एवं नानाविधाकृती[1] । इयां पाहतां पारु[2] नाहीं सुभद्रापती[3] ।**
**जयाचा एकेकीं अंगप्राप्ती[4] । देख पां जग ।। १४० ।।**

*१) वेगवेगळ्या आकृती २) अंत, शेवट ३) अर्जुना ४) शरीरप्रदेशावर*

**अर्थ -** ह्याप्रमाणे अनेक प्रकारच्या आकृत्या आहेत. अर्जुना, ह्या आकृत्या पाहावयास लागले तर त्यांना अंत नाही आणि त्यांच्या एकएका शरीरभागावर तू जग पाहा.

ॐ

अर्जुनाने इच्छा व्यक्त केली व भगवान श्रीकृष्ण आपले विश्वरूप त्याला दाखविण्यास तयार झाले. नाना आकारांची व प्रकारांची प्राणिसृष्टी त्यांनी अर्जुनाला दाखविली. जीव अंतःकरणवृत्तीनेच जगाचा अनुभव घेतो. म्हणून या वृत्तीमुळे त्याला परमेश्वराच्या स्वरूप, गुण व आकृती इत्यादिकांचा साकार किंवा मर्यादित अनुभव येतो, पण परमात्मा मुळात अद्वैत, निरवयव, अमर्याद असून त्याचे हे धर्म बदलणारे किंवा नाहीसे होणारे नसल्यामुळे त्याच्या साकार, सगुणपणांतही हे धर्म राहतातच. म्हणजे साकार, सगुण भगवंताचा आकार, गुण इत्यादी हे अमर्याद असतात. अर्जुना, माझे रंग जसे वेगवेगळे आहेत, तशा आकृत्याही निरनिराळ्या आहेत. त्यांची रूपे दिव्य तेजाने झळाळणारी आहेत. ब्रह्मांड जर रत्नांनी जडविले तर ते जसे चमकेल तशी चमक काहींच्या रूपात आहे. काहींचे वर्ण केशरी रंगाचे होते. काही स्फुट स्फटिकाप्रमाणे होती. काही इंद्रनील मण्याप्रमाणे निळसर होती. काही काजळाच्या पर्वताप्रमाणे काळी होती. काही तांबड्या रंगाची होती. अशी ही विविध रूपे तू पाहा. या सर्व व्यक्ती तू पाहू गेल्यास तुला त्याचा अंत लागणार नाही. परंतु ध्यानात ठेव की, या एकेका अवयवावर तू सर्व जग पाहशील.

### दिनांक १९ मे

**तैसे ते दिव्यसूर्य सहस्त्रवरी[1] । जरी उदयजती[2] कां एकेचि अवसरी[3] ।**
**तऱ्ही तया[4] तेजाची थोरी[5] । उपमू[6] नये[6] ।। २३८ ।।**

*१) हजारो २) उदय पावले ३) (एकाच) वेळी ४) ईश्वररूपाच्या ५) महिमा ६) तुलना होणार नाही*

**अर्थ -** तसे ते हजारो दिव्य सूर्य जर एकाच वेळेला उगवले, तरी त्या विश्वरूपाच्या तेजाच्या प्रभावाच्या उपमेला ते (सूर्य) येणार नाहीत.

अर्जुनाने भगवंताचे विराट रूप पाहिले. विस्मयचकित होऊन त्याने डोळे मिटून घेतले तरी आतही त्याला तसेच विश्वरूप दिसले. अर्जुन आपल्यासमोर अगणित रूपे पाहत होता. त्यांच्या भयाने जेव्हा तो त्यांच्याकडे पाठ फिरवून उभा राहिला तेव्हा तिकडेही विश्वरूपाची मुखे, हात, पाय हे तसेच त्याला दिसत होते. अर्जुनाने नाना प्रकारच्या अलंकारांनी भरलेले व ज्याला सर्व बाजूंनी मुखे आहेत ते विश्वरूप पाहिले. आकाशामध्ये सहस्रावधी सूर्यांची प्रभा जर एकदम उत्पन्न झाली तरी त्या परमात्म्याएवढी तेजस्वी होणार नाही. हजारो दिव्य सूर्य एकाच वेळी उदयास आले तरी त्या तेजाशी तुलना होणार नाही. सर्व विजांचा समुदाय एकत्र केला व प्रलयकाळच्या अग्नीची सर्व साहित्ये गोळा केली. तसेच दहाही महातेजे एकत्र मिळविली तरी त्या विश्वरूपाच्या अंगकांतीशी बरोबरी करता येणार नाही. श्रीकृष्णाच्या या दिव्य तेजाचे माहात्म्य संजय धृतराष्ट्राला समजावून सांगत आहे.

### दिनांक २० व २१ मे

**आणि कोरडें यशचि नोहे । समग्र राज्यही आले आहे ।**
**तूं निमित्तमात्रचि होये । सव्यसाची[1] ।। ४७१ ।।**

*१) अर्जुन*

**अर्थ -** आणि यात केवळ रिकामे यशच मिळणार आहे असे नाही, तर संपूर्ण राज्यदेखील त्यात आलेले आहे. अर्जुना, तू केवळ नावाला मात्र कारण हो.

"निमित्तमात्रं भव सव्यसाचिन्" हे सांगणाऱ्या गीतेतील ३३ व्या श्लोकावरील हे भाष्य आहे. भगवंत म्हणतात की, तू फक्त या युद्धात निमित्तमात्र हो. द्रोण, भीष्म, जयद्रथ, कर्ण अशा मोठमोठ्या योद्ध्यांना मी पूर्वीच मारले



ॐ

आहे. आता बाकीच्यांना जिंकून समृद्धीयुक्त अशा राज्याचा उपभोग घे. लोकांचा संहार करणारा व त्यासाठी वृद्धी पावलेला प्रत्यक्ष काळ मीच आहे असे मान तुम्हा पांडवांचे संरक्षण करण्यास मी कटिबद्ध आहे, पण बाकी सर्वांचा ग्रास मी घेणार आहे. विजेच्या प्रचंड अग्नीमध्ये ज्याप्रमाणे लोण्याचा गोळा घालावा, त्याप्रमाणे हे जग तू माझ्या तोंडामध्ये जे पाहिलेस त्यामध्ये हे सर्व नाहीसे होणार आहेतच. म्हणून तू केवळ निमित्तमात्रच व्हायचे आहेस. आता तू युद्धास तयार हो आणि यश मिळव.

**आम्हां भोगमोक्षाचिया ठायीं[1] । श्रीमूर्तीवांचूनि नाहीं ।**
**म्हणोनि तैसाचि साकारु[2] होईं[2] । हें सांवरीं[3] आतां।।६०८।।**

*१) ठिकाणी २) सगुण रूप धारण कर ३) आवरून घे*

**अर्थ -** आम्हाला (ऐहिक व पारलौकिक) भोगांच्या ठिकाणी (फार काय सांगावे) मोक्षाच्या (देखील) ठिकाणी श्यामसुंदर मूर्तीवाचून दुसरे काही नाही म्हणून देवा, आता तू तसाच (चतुर्भुज) हो व हे विश्वरूप आटोपते घे.

अर्जुनाच्या आग्रहामुळे भगवंतांनी त्याला दिव्यदृष्टी दिली व आपले विराट विश्वरूप दाखविले. हे पाहून अर्जुन अत्यंत भयभीत झाला. त्याने भगवंतांची प्रार्थना केली, "आम्हाला आता कोणत्याही भोगांचे आकर्षण राहिले नाही. केवळ तुझ्या प्रेमावाचून आम्हाला दुसरे काही नको. तुझ्या श्यामसुंदर चतुर्भुज मूर्तीवाचून दुसरे काहीही आम्हास नको. तुझे हे विश्वरूप पाहून माझ्या मनात भय निर्माण झाले आहे, म्हणून हे प्रकट झालेले विश्वरूप आता पुरे करावे. ते आवरून घेऊन तुझे पूर्वीचे चतुर्भुज रूप मला दाखव." सगुण साकार भगवंताच्या प्रेमभक्तीने संपूर्ण देह व जगद्भास नाहीसा होतो म्हणून अर्जुनाने ही मागणी केली. सगुण श्रीकृष्णस्वरूपाच्या आश्रयानेच दृष्ट परमानंदरूप जीवन्मुक्ती व अखंड परमानंदरूप विदेहमुक्ती प्राप्त होते म्हणून त्या गोजिरवाण्या, सुखद चतुर्भुज मूर्तीचा आग्रह आहे.

अर्जुनाने येथे भगवंताला विनंती केली की, विश्वरूपाचे सोहळे भोगून माझे डोळे शांत झाले आहेत. आता मात्र सगुणमूर्तीसाठी ते उत्सुक आहेत.

### दिनांक २२, २३, २४ व २५ मे

**जो मजचि एकालागीं । कर्मे वाहातसे आंगीं ।**
**जया मीवांचोनि जगीं । गोमटे[1] नाही।।६९६।।**
**दृष्टादृष्ट[2] सकळ । जयाचें मीचि केवळ ।**
**जेणें जिणयाचे[3] फळ । मजचि नाम[3] ठेविलें ।।६९७।।**
**भूतें हे भाष विसरला । जे दिठी मीचि आहे बांधला ।**
**म्हणोनि निर्वैर जाहला । सर्वत्र भजे ।।६९८।।**
**ऐसा जो भक्तु होये । तयाचे त्रिधातुक[4] हें जैं जाये ।**
**तैं मीचि होऊनि ठाये[5] । पांडवा गा ।।६९९।।**

*१) गोड २) लौकिक व पारलौकिक ३) ज्याने जीविताचे साफल्य, माझीच प्राप्ती असे ठरविले आहे ४) कफ, पित्त, वात या तीन धातूंचे शरीर ५) ठिकाणी*

**अर्थ -** जो (भक्त) माझ्या एकट्याकरिताच शरीराने कर्मे आचरितो आणि ज्याला जगामध्ये माझ्यावाचून दुसरे काही चांगले नाही. ।।६९६।।

ज्याचा ऐहिक व पारलौकिक हे सर्व केवळ मीच होऊन राहिलो आहे. व ज्याने आपले जगण्याचे प्रयोजन माझीच प्राप्ती होणे हेच ठरविले आहे. ।।६९७।।

तो भूतमात्र ही भाषा विसरला. कारण त्याच्या दृष्टीला माझ्याशिवाय दुसरा विषय नाही. म्हणून तो निर्वैर झाला असता तो सर्व ठिकाणी मला ओळखून माझी भक्ती करतो. ।।६९८।।

अरे अर्जुना, असा जो भक्त आहे, त्याचे हे (त्रिधातुक) शरीर ज्या वेळी पडते, त्या वेळी तो मीच होऊन राहतो. ।।६९९।।

"मत्कर्मकृन् मत्परमो मद्भक्तः......." या ११ व्या अध्यायातील शेवटच्या ५५ व्या श्लोकावरील माऊलींचे हे निरूपण आहे. श्रीमद् आदिशंकराचार्यांना भगवद्गीतेतील सर्व ७०० श्लोकांमध्ये साररूपाने असलेला हा श्लोक सर्वात प्रिय होता. भक्तीचे सार यात आले आहे.

अर्जुनाने जे विश्वरूप पाहिले ते देवांना सुद्धा अप्राप्य असे आहे, तेथे मनुष्याची गत काय? अर्जुनाने जे विश्वरूप पाहिले, ते वेदपठनाने, तपाने, दानाने अथवा यज्ञानेसुद्धा कोणाला दिसणे शक्य नाही. पण अनन्यभक्तीच्या बळावर मात्र हे पाहता येईल असे भगवंताचे आश्वासन आहे. भगवंत व्यापक आहे. सर्व स्थावरजंगमात्मक जगामध्ये त्याच्याशिवाय दुसरे काहीही नाही हे जाणून जो भक्ती करतो त्याला परमात्म्यावाचून दुसऱ्या कशाचाही ध्यास नसतो. केवळ भगवंतासाठी असा अनन्यभक्त कर्मे करतो. जे जे कर्म त्याच्या हातून होते, ते ते सर्व तो भगवंताप्रीत्यर्थ व भगवंताला अर्पण करून राहतो. इहलोकांत व परलोकांत भगवंतावाचून त्याला दुसरे काहीही नको असते. जीवनाची कृतार्थता भगवंताच्या प्राप्तीतच आहे अशी त्याची जीवनश्रद्धा असते. म्हणून तो निरहंकारी होऊन सर्वत्र त्याचेच रूप पाहत असतो. निर्मम होऊन जिकडे तिकडे त्याला भगवंताचेच दर्शन होते. म्हणून भूतमात्रात ऐक्यभावाने त्याला भगवंतच दिसतो. त्यामुळे द्वेष, वैर, मत्सर तरी कोणाचा करणार? असा जो श्रेष्ठ भक्त आहे, त्याचे शरीर ज्या वेळेला पडते त्या वेळी तो मीच होऊन राहतो. भगवंताच्या निःसीम प्रेमामुळे भक्तांना, देहाचासुद्धा विसर पडतो व ते भगवंताशी पूर्ण ऐक्य पावतात. पंचमहाभौतिक देह हा खरे म्हणजे भ्रांतिजन्यच आहे. जोपर्यंत त्याचे ज्ञान असते तोपर्यंतच त्याचे अस्तित्व असते व देहाचा विसर पडला की त्याचे अस्तित्वही नाहीसे होते. भगवंताच्या भक्तीत "देह असो अथवा जावो" अशी अनन्य भक्तांची अवस्था असते. असे भक्त वैकुंठवासीच असतात, पण जगाच्या कल्याणासाठी अवतारकार्य करीत असतात.

**।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**





# अध्याय १२ वा
# भक्तियोग

**दिनांक २६ मे**

गीतेतील २० श्लोकांच्या या अध्यायावर माऊलींनी २४७ ओव्यांमध्ये निरूपण केले आहे. भगवान श्रीकृष्ण या अध्यायाला स्वतःच अमृतधारा असे म्हणतात. आकाराने लहान पण अर्थाच्या दृष्टीने महान असा हा अध्याय आहे. भक्तिशास्त्राच्या मौलिक सिद्धान्तांनी भरलेला हा अध्याय, माऊलींना विशेष प्रिय झाला. संपूर्ण ज्ञानेश्वरीत समर्पण, अनन्यशरणता, निर्हेतुक प्रेम, निरहंकारी वृत्ती या भक्तीच्या मुख्य गुणवैशिष्ट्यांची विस्तृत चर्चा आहे. १२ व्या अध्यायात हा भक्तिरस परिपूर्ण झाला आहे. ज्ञान व उपासना यांचे मधुर मिलन या अध्यायात घडले आहे. या अध्यायाच्या शेवटी भगवंत म्हणतात की, भक्ती हे 'धारामृत धर्म' जे घेतात तेच मला आवडतात. भक्तीचे अमृत जो पितो तो निस्तेज, दरिद्री, निर्दय, निष्प्रभ राहत नाही. भक्तीशिवाय परमार्थ म्हणजे अरण्यरुदनच । ज्ञान, कर्म व योग हे काही कमी दर्जाचे नाहीत पण ते भक्तीशिवाय परिपूर्ण नाहीत. भक्त हा एकाच वेळी योगी, ज्ञानी, कर्मवादी, वैराग्यशील व उत्तम तपस्वी असू शकतो. भक्तीची ही जीवननिष्ठा ध्यानी घेऊन, माऊलींनी या अध्यायात तत्त्व व जीवन यांचे सामरस्य घडविले आहे. श्री ज्ञानेश्वरांनी तिन्ही योगांत भक्तीला प्राधान्य दिले आहे. भक्तियोगावर भर देऊन, सामान्य मनुष्याला सुद्धा सहज पेलवेल असा संदेश अर्जुनाच्या रूपाने सर्वांना दिला आहे - "तरी झडझडोनि वहिला निघ । इथे भक्तीचियें मार्गा लाग"। १२ व्या अध्यायातील निवडक ओव्या अशा.....

**जय जय शुद्धे । उदारे प्रसिद्धे ।**
**अनवरत[1] आनंदे । वर्षतिये[2] ।।१।।**

*१) अखंड, सतत २) वर्षाव करणारी*

**अर्थ** - हे सद्‌गुरू आई । तू शुद्ध म्हणजे अखंड अज्ञानादि दोषरहित आहेस, तू एक अत्यंत उदार म्हणून प्रसिद्ध आहेस. व तू अखंड आनंदस्वरूप किंवा प्रेमरूप असून, शिष्याच्या ठिकाणी अखंड परमानंदाचा वर्षाव करणारी माता आहेस.

श्री माऊलींनी ज्ञानेश्वरीत प्रत्येक अध्यायाच्या सुरुवातीस नमनाच्या काही ओव्या लिहिल्या आहेत. या ओव्यांतून त्यांनी कधी भगवंताची, कधी सद्‌गुरूंची तर कधी श्रोत्यांची प्रशंसा केली आहे. १२ अध्यायाच्या या पहिल्या ओवीत श्री ज्ञानेश्वरांनी सद्‌गुरुनाथांचे स्तवन केले आहे. श्री गुरूचा जयजयकार करून व आपल्याकडे बालपण घेऊन माऊली लडिवाळपणे श्रीगुरूंचे स्तवन करीत आहेत. येथे "शुद्ध" हे विशेषण जीवाच्या ठिकाणी असलेल्या अशुद्धीच्या अपेक्षेने आहे. जीवाच्या ठिकाणी अज्ञान व अज्ञानजन्य अनेकत्व, कर्तृत्व, भोक्तृत्व, राग-द्वेष, अभिनिवेश, पाप इत्यादी नाना प्रकारची अशुद्धी आहे. तसेच त्याची ज्ञानदृष्टीही विपरीत - ज्ञानरूप अशी अशुद्ध असून त्याचे देहादिक पाच भौतिकही अशुद्ध आहेत. पण श्रीगुरूंची दृष्टी शुद्ध चिन्मय असून ज्ञानभक्तीने त्यांची सगुण साकार मूर्तीही चिन्मयच झालेली असते. म्हणून ते सर्वतोपरी उपाधिरहित म्हणजे शुद्ध आहेत. असे गुरू आपल्या शिष्यांनासुद्धा आपल्यासारखेच शुद्ध करून सोडतात. "आपणासारिखे करिती तात्काळ" असे संत तुकारामांनी म्हटल्याप्रमाणे अत्यंत उदारतेने श्रीगुरू शिष्याला सर्वस्व देतात. श्रीगुरू स्वतः ज्ञानभक्तीने अखंड आनंदात राहत असतात. असाच आनंद ते आपल्या शिष्यांनाही देतात. म्हणून ते ब्रह्मानंदाचा वर्षाव करणारे आहेत. "साधकांना तू आईच आहेस. तुझ्या चरणी सर्व विद्या आहेत. तू आपल्या भक्तांचा कल्पतरू आहेस. तुझ्याच कृपेने मी या ग्रंथाचे निरूपण करीत आहे." असे माऊली प्रार्थना करतात व ग्रंथलेखनाची आज्ञा मागतात.

**दिनांक २७, २८, २९ व ३० मे**

**तरि अस्तुगिरीचा उपकंठी[१] । रिगलिया रविबिंबापाठी ।**
**रश्मी जैसे किरीटी । संचरती ।।३५।।**
**वर्षाकाळी सरिता । जैसी चढों लागे पांडुसुता ।**
**तैसी नीच[२] नवी भजतां । श्रद्धा दिसे ।।३६।।**
**तैसें सर्वेंद्रियासहित । मजमाजी सूनि[३] चित्त ।**
**जे रातिदिवो[४] न म्हणत । उपासिती ।।३८।।**
**यापरी जे भक्त । आपणपें मज देत ।**
**तेचि मी योगयुक्त । परम मानी ।।३९।।**

*१) समीप, जवळ २) नित्य ३) घालून ४) रात्रंदिवस*

**अर्थ -** तर अर्जुना, अस्ताचलाच्या समीप सूर्य गेल्यानंतर सूर्यबिंबामागून जशी किरणे जातात. ।।३५।।

किंवा अर्जुना ! पावसाळ्यात जसा नदीला पूर येतो त्याप्रमाणे माझे भजन करीत असताना ज्याचे ठिकाणी नित्य नवी श्रद्धा किंवा वाढते प्रेम दिसून येते. ।।३६।।

त्याप्रमाणे सर्व इंद्रियांसह माझ्या ठिकाणी चित्त ठेवून म्हणजे एका मलाच आपल्या सर्व इंद्रियांसह मनाचा विषय करून जे अहोरात्र न पाहता माझी उपासना करतात. ।।३८।।

याप्रमाणे ज्या भक्तांनी आपल्याला माझ्या ठिकाणी संपूर्ण समर्पण केले, तेच माझ्याशी ऐक्य पावले, असे मी समजतो. ।।३९।।

(अशाच भक्तांना श्रेष्ठ प्रतीचे योगयुक्त भक्त मी मानतो.)

१२ व्या अध्यायातील दुसऱ्या श्लोकावरचे हे निरूपण आहे. भगवंतांनी येथे भक्तीचे सार सांगितले आहे. मूर्तिपूजेचे रहस्य यात मांडले आहे. भक्तियोगात "मय्यावेश्य मनो ये मां" हा भक्तीचा कणा आहे. भगवंताशी सतत जोडले जाणे म्हणजे नित्ययुक्त होणे. प्रथम मनाचे समर्पण व नंतर संपूर्ण जीवनाचे समर्पण या सगुण भक्तीत सांगितले आहे. श्री ज्ञानेश्वर माऊलींनी हाच अर्थ दोन सुंदर उपमांनी सजवून सांगितला आहे. माऊलींची काव्यप्रतिभा हे सांगताना बहरली आहे. समर्पणाचा सिद्धान्त या दोन दृष्टान्तांनी सहज समजावला आहे. डोळ्यांपुढे निसर्गाचे नयन मनोहर दृश्य उभे केले आहे. उदयगिरीचा सूर्य अस्तंगिरीकडे निघाला आहे व त्याची अंगभूत किरणे स्वभावानेच त्या सूर्याच्या मागोमाग निघाली आहेत. किरण जसे एकनिष्ठतेने सूर्यामागून जातात तसे भक्ताने अव्यभिचारी निष्ठेने व समर्पित वृत्तीने भगवंतामागून जावे. ३६ व्या ओवीमध्येसुद्धा ज्ञानेशांनी श्रद्धेचे स्वरूप सांगितले आहे. पावसाळ्यात दुथडी भरून वाहणाऱ्या नदीचे पाणी सतत वाढत असते. वर्षाकाळाची ही कृपा असते. त्याप्रमाणे भक्त जेव्हा सगुण भक्तीत आत्यंतिक श्रद्धेने समरस होऊन भक्ती करतो, तेव्हा भगवंत आपल्या कृपेचे मेघ पालथे करून भक्ताच्या श्रद्धेने, भक्तिसुखाची गोडी वाढवीत असतो. भक्त जसजसा भगवंतावर प्रेम करू लागतो, तसतसा भगवंतही प्रेमरूपच असल्यामुळे प्रेमाने पाझरू लागतो. जेवढी श्रद्धा अधिक तेवढी चित्तशुद्धी अधिक. श्रद्धेच्या निर्मळ प्रवाहाने परमात्मा अधिकच प्रेमळ होऊन कृपा बरसत राहतो. म्हणून श्रद्धा ही जीवन घडविणारी महान शक्ती आहे. श्रद्धा म्हणजे समर्पण, प्रेम! म्हणून भगवंत येथे म्हणतात की, श्रेष्ठ भक्त तोच की, जो प्रभूशी सतत जोडलेला आहे, ज्याची श्रद्धा अगाध आहे व ज्याचे मन प्रभूचरणी अर्पित झाले आहे, असा भक्त आपल्या सर्व इंद्रियांसह मनाने एका परमात्म्याचीच भक्ती करत असतो. त्यांचे विषयसुद्धा ईश्वररूप होऊन जातात. "विषयचि त्यांचा झाला नारायण ।





नावडे धन जन माता पिता ।" असा संत तुकारामांच्या उक्तीप्रमाणे त्यांचा सर्व व्यवहार होऊन जातो. असा जो भक्त आहे, तोच माझ्या मते सर्वोत्तम योगी आहे, असे भगवंत म्हणतात.

**दिनांक ३१ मे**

**म्हणोनि योगाचिया वाटा । जे निगाले[१] गा सुभटा[२] ।**
**तया दुःखाचाचि वाटा । भागा[३] आला[३] ।।६९।।**

*१) निघाले, लागले २) वीर अर्जुना ३) वाट्यास आला*

**अर्थ -** हे वीर योद्ध्या अर्जुना ! जे योगमार्गाचा अभ्यास करण्याला निघाले, त्यांच्या वाटेला नुसते दुःखच आले.

सगुणमार्ग व निर्गुणमार्ग यापैकी उत्तम मार्ग कोणता हा अर्जुनाचा प्रश्न होता. याला भगवंतांनी नेमके उत्तर दिले आहे. मागील सहाव्या अध्यायात ज्ञानेश्वरांनी योगमार्गाचे सविस्तर वर्णन केले आहे. इंद्रिये, त्यांचे स्वभाव, आसनमुद्रा, आधारचक्र, कुंडलिनी, ब्रह्मरंध्र, सुषुम्ना नाडी, इडा व पिंगळा या नाड्या..... अशा सर्वांचे ज्ञान करून घेऊन, या जटिल मार्गाने जो योगी जातो तो मलाच येऊन मिळतो असे भगवंत सांगतात. पण हा मार्ग आचरावयास अत्यंत अवघड आहे असा निर्वाळाही ते देतात. कारण या मार्गात कठीण वैराग्य आहे. शम-दम यांनी इंद्रियनिग्रह करायचा पण काम, क्रोधाशी सतत लढायचे असे हे अग्निदिव्य आहे. योग म्हणजे निखाऱ्यावरून चालण्यासारखेच आहे. सर्वसामान्य भक्तांना हा मार्ग दुष्कर असा आहे. म्हणून अर्जुना, अशा योगाच्या वाटेने जे कोणी गेले त्यांना दुःखाचाच लाभ झाला असे तू समज.

**दिनांक १, २, ३, ४ व ५ जून**

**अथवा हे चित्त । मनबुद्धीसहित ।**
**माझा हाती अचुंबित[१] । न शकसी देवो ।।१०४ ।।**
**तरि गा ऐसे करी । या आठा पाहारामाझारी[२] ।**
**मोटके[३] निमिषभरी[४] । देतु जाय ।।१०५।।**
**मग जे जे का निमिख[५] । देखेल माझे सुख ।**
**तेतुले अरोचक[६] । विषयी घेईल ।।१०६।।**
**तैसे भोगाआतुनि निगता । चित्त मजमाजी रिगता ।**
**हळूहळू पंडुसुता । मीचि होईल ।।१०९।।**
**अगा अभ्यासयोगु म्हणिजे । तो हा एकु जाणिजे ।**
**येणे काही न निपजे । ऐसे नाही ।।११०।।**

*१) समग्र २) (आठ) प्रहरांमध्ये (२४ तासांत) ३) अल्प ४) क्षणभर ५) क्षण ६) अरुची, नावड*

**अर्थ -** अथवा जर मनबुद्धिसहित हे चित्त माझ्या हाती संपूर्ण तू देऊ शकणार नाहीस. ।।१०४।।

तर अर्जुना, असे कर की, या आठ प्रहरांमध्ये नेमके निमिषभर (अगदी थोडे) चित्त मला देत जा. ।।१०५।।

मग जितके जितके निमिष तुझे चित्त माझे सुख पाहील, तितके तितके तुझे चित्त विषयांच्या भोगांच्या ठिकाणी अरुची घेईल. ।।१०६।।

त्याप्रमाणे भोगांतून तुझे चित्त निघून माझ्यामध्ये प्रवेश करता करता, अर्जुना, ते तुझे चित्त हळूहळू मद्रूप होईल. ।।१०९।।

ॐ

अरे, अभ्यासयोग जो म्हणतात, तो हाच एक आहे असे समज. याच्या योगाने कोणतीही गोष्ट प्राप्त होणार नाही, असे नाही. ।।११०।।

गीतेच्या १० व्या श्लोकावरील हे निरूपण आहे. ८ ते ११ व्या श्लोकात भगवंतांनी भक्तीचे चार सोपान सांगितले. १) मन व बुद्धी अर्पण कर २) ते देता येत नसेल तर अभ्यासयोगाचा स्वीकार कर ३) हेही जमत नसेल तर केवळ माझ्याकरिता कर्मे करणारा हो ४) हे अशक्य असेल तर सर्व कर्मफलांचा त्याग कर. माऊलींनी वरील ओव्यांत अभ्यासयोगाचे मर्म सांगितले आहे. २४ तासांतील एक क्षण जरी खऱ्या अर्थाने भगवंताला दिला तरी त्या क्षणाने भक्तिसुख हळूहळू वाढायला लागेल. जेवढे हे सुख वाढेल तेवढे भोगाविषयींचे आकर्षण कमी कमी होईल. हेच क्षण पुढे पुढे वाढत राहतील व भगवंत प्रीतीमुळे एक दिवस ते मन भगवंतरूप होऊन जाईल. यालाच अभ्यासयोग म्हणतात. अभ्यासयोगाने आपल्या कर्माला जरूर फळ मिळते. हा अभ्यास कधीही वाया जात नाही, हे भगवंतांनी येथे स्पष्ट म्हटले आहे. अभ्यासाच्या सामर्थ्याने कोणतीही गोष्ट साध्य करता येते. विष खाण्याचा जरी अभ्यास केला, तरी ते विषसुद्धा पचनी पडते. याच योगाने चंचल मन आवरता येते व भगवंतचरणी रुजू होते.

**दिनांक ६, ७, ८ व ९ जून**

माळिये[1] जेउते[2] नेले । तेउते[3] निवांतचि[4] गेले ।
तया पाणिया ऐसे केले । होआवे गा ।।१२०।।
म्हणोनि प्रवृत्ति आणि निवृत्ती । इथे वोझी नेघे मती ।
अखंड चित्तवृत्ती । माझ्या ठायी ।।१२१।।
आणि जे जे कर्म निपजे[5] । ते थोडे बहु न म्हणिजे ।
निवांतचि अर्पिजे । माझ्या ठायी ।।१२३।।
ऐसिया मद्भावना । तनुत्यागी[6] अर्जुना ।
तू सायुज्य सदना । माझिया येसी ।।१२४।।

*१) माळी २) जिकडे ३) तिकडे ४) शांतपणे, आपोआप ५) जमेल ६) शरीर सोडल्यानंतर*

अर्थ - अरे अर्जुना, माळ्याने जिकडे नेले, तिकडे काही एक तक्रार न करता जाणाऱ्या पाण्याप्रमाणे तुझे जीवित निरभिमान होऊन कर्म करणारे होऊ दे. ।।१२०।।

म्हणून कोणतेही कर्म करण्याची प्रवृत्ती अथवा न करण्याची निवृत्ती ही ओझी, तू आपल्या बुद्धीवर घेऊ नकोस. तर तू आपल्या चित्तवृत्तीने निरंतर मला स्मर. ।।१२१।।

आणि जे जे कर्म घडेल ते कमी अथवा जास्त म्हणू नकोस. तर ते निमूटपणे माझ्या ठिकाणी अर्पण कर. ।।१२३।।

अर्जुना, अशा माझ्या रूपाच्या अनुसंधानाने शरीरत्यागानंतर तूच सायुज्य मुक्तिरूप माझ्या घरी येशील. ।।१२४।।

वरील ओव्यांत माऊलीने माळी व पाणी यांचा सुंदर दृष्टान्त देऊन, भगवंताला कर्मे कशी अर्पण करावीत हा सिद्धान्त समजावून सांगितला आहे. हा भक्तीचा तिसरा मार्ग आहे. पाणी जसे काही तक्रार न करता निमूटपणे माळी सांगेल त्या दिशेला जाते तसे आपणही प्रारब्धानुसार वाट्याला आलेली कर्मे काहीही तक्रार न करता शांतपणे व सहज करावीत. या जगाच्या माळ्याला ती सर्व कर्मे स्वस्थ चित्ताने अर्पण करावीत. याप्रमाणे भगवंताच्या



ॐ

ठिकाणी समर्पित होऊन केलेल्या कर्मांनी उत्तम गती प्राप्त होते. देहपतनानंतर भगवंताच्या ऐक्यरूपी मंदिरात स्थान प्राप्त होते. या अध्यायात माऊलींनी सामान्य जनांना भक्तीचा सुलभ मार्ग दाखविला आहे. यज्ञयाग, व्रत-वैकल्ये, तीर्थयात्रा, पूजापाठ असे काहीही न करता कर्मे भगवंताला अर्पण करून भगवंतप्राप्ती करून घेण्याचा राजमार्ग येथे दाखविला आहे. मन- बुद्धी अर्पण करता येत नसेल तर एक एक क्षण अर्पण करावयास सांगितले व हेही जमत नसेल तर सर्व कर्मे निमूटपणे अर्पण करावयास सांगितले. प्रवृत्ती व निवृत्ती याचा काहीही विचार न करता, पाण्याप्रमाणे निरहंकारी होऊन जगाच्या माळ्याच्या इच्छेप्रमाणे, जीवन शांतपणे जगावे, हा संदेश येथे माऊलींनी दिला आहे.

**दिनांक १० जून**

अर्जुना तो भक्तु । तोचि योगी मुक्तु ।
तो वल्लभा[1] मी कांतु[2] । ऐसा पढिये[3] ।।१५६।।

*१) प्रेयसी, स्त्री २) प्रियकर, पती ३) आवडता होय*

अर्थ - अर्जुना, तो भक्त तोच योगी आणि तोच मुक्त. तो जशी काही स्त्री व मी पती इतका तो मला आवडतो. भगवंताला आपला भक्त किती प्रिय असतो याचे वर्णन करीत असताना माऊलींनी उत्कृष्ट प्रेमाचा दृष्टान्त दिला आहे. आपला भक्त म्हणजे आपली प्रेयसी आहे, असे येथे म्हटले आहे. ज्याने आपले मन भगवंतचरणी अर्पण केले आहे, तो भक्त केवळ माझ्याच स्वरूपाचे ध्यान करीत असतो. माझ्याशिवाय तो कोठेच रमत नाही. असा भक्त योगीच आहे. तो मुक्तच आहे. आणि तो म्हणजे जशी काही माझी आवडती पत्नी आहे आणि मी तिचा पती आहे. मधुराभक्तीची ही प्रेमावस्था आहे.

**दिनांक ११, १२, १३, १४, १५, १६ व १७ जून**

जो आत्मलाभासारिखें । गोमटे[1] काहीचि न देखे ।
म्हणोनि भोगविशेखे । हरिखेजेना[2] ।।१९०।।
आपणचि विश्व जाहला । तरि भेदभावो सहजचि गेला ।
म्हणोनि द्वेषु ठेला[3] । जया पुरुषा ।।१९१।।
पै आपुले जे साचे । ते कल्पांतीही न[4] वचे[4] ।
हे जाणोनि गताचे । न शोची जो ।।१९२।।
आणि जयापरौते काही नाही । ते आपणपेचि आपुला ठायी ।
जाहला या लागी जो काही । आकांक्षी ना ।।१९३।।
वोखटें[5] का गोमटे । हे काहीचि तया नुमटे[6] ।
रात्रीदिवस न घटे । सूर्यासि जेवी ।।१९४।।
ऐसा बोधुचि केवळु । जो होऊनि निष्कळु[7] ।
त्याहीवरी भजनशीळु । माझा ठायी ।।१९५।।
तरि तया ऐसे दुसरे । आम्हा पढियंते[8] सोयरे[8] ।
नाही गा साचोकारे[9] । तुझी आण ।।१९६।।

*१) चांगले, गोड २) संतुष्ट होईना ३) नाहीसा झाला ४) नाहीसे होत नाही ५) वाईट ६) वाटत नाही ७) शुद्ध, पूर्ण ८) आवडते नातलग ९) खरेपणाने*

अर्थ - जो आत्मप्राप्तीच्या तोडीचे दुसरे काहीच चांगले समजत नाही. म्हणून जो एखाद्या विशेष भोगाने आनंदित होत नाही. ।।१९०।।

आपणच विश्व आहोत अशी समजूत बनलेली असल्यामुळे त्याचा भेदभाव अनायासानेच नाहीसा झालेला असतो, म्हणून त्या पुरुषाच्या ठिकाणी द्वेषबुद्धी राहिलेली नसते. ।।१९१।।

आपण जे खरे (त्रिकालाबाधित आत्मस्वरूप) आहे. ते कल्पाच्या अंताच्या वेळीदेखील नाहीसे होत नाही, हे जाणून जो गतकाळाचा शोक करीत नाही. ।।१९२।।

आणि ज्याच्या पलीकडे काही नाही असे जे ब्रह्म ते तो पुरुष आपण आपल्या ठिकाणी असल्यामुळे कशाचीच इच्छा करीत नाही. ।।१९३।।

सूर्याच्या ठिकाणी रात्र किंवा दिवस, हे दोन्ही जसे घडत नाहीत, त्याप्रमाणे वाईट किंवा बरे हे त्याला काहीच वाटत नाही. ।।१९४।।

असा जो केवळ अखंड बोधरूप असून त्याशिवाय आणखी, जो माझ्या ठिकाणी भजनशील असतो. ।।१९५।।

तरी अरे अर्जुना, त्याच्यासारखे दुसरे आवडते नातलग मनुष्य आम्हाला खरोखर कोणी नाही. हे तुझी शपथ वाहून सांगतो. ।।१९६।।

गीतेच्या १७ व्या श्लोकावरील या मंगल ओव्यांतून भक्ताच्या गुणांचे समग्र वर्णन माऊलींनी केले आहे. भक्ताच्या ३६ गुणांचे वर्णन भगवंतांनी १२ व्या अध्यायात केले आहे. भक्त व भगवंताचे आध्यात्मिक लग्न होण्यासाठी ही ३६ गुणांची कुंडली जमली पाहिजे. या ३६ गुणांचे एकूण सारच वरील ओव्यांतून व्यक्त झाले आहे. ज्याला आत्मसुखाची गोडी लागली त्या भक्ताला प्रपंचातल्या भोगवस्तूत, ऐश्वर्यात आनंद वाटत नाही. संत तुकारामांना छत्रपती शिवाजी महाराजांनी भेट म्हणून तबकभर हिरे-मोती-रत्न व किमती वस्त्रांचा नजराणा पाठवला होता. पण संत तुकारामांनी ती भेट तशीच परत पाठविली. आत्मसुखात डुंबून गेलेले तुकाराम म्हणतात....

**आम्हा घरी धन शब्दांचीच रत्ने ।।१।।**

**शब्दे वाटू धन जनलोका ।।२।।**

अशा भक्तांना परमात्मसुखापुढे सारे काही तुच्छ ! असे भक्त 'विचरे विश्व होऊनी । विश्वामाजी ।' अशा आत्मौपम्य दृष्टीने जगात वावरत असतात. सर्व भूतांच्या ठायी भगवंताचे रूप पाहत असल्याने त्यांच्या मनात द्वेष, मत्सर अशा भावनाच नसतात. आत्मसुख हे अवीट व अक्षय असल्यामुळे त्याला कशाचेच शोक, दुःख होत नाही. सर्वत्र हरीचे दर्शन घेत असल्याने त्याच्या अखंड सुखात कोठेही बाधा येत नाही. म्हणून ज्या सुखासारखे दुसरे सुख कोठेही नाही, ते आपल्याच अंतर्यामी वसत असल्यामुळे पूर्णत्वाची अनुभूती त्यांना येत असते. असे भक्त अंतर्यामी तृप्त असल्यामुळे त्यांना कशाचीही आकांक्षा राहत नाही. सूर्याला जसा अंधार व उजेड हे सारखेच असतात, तसे या भक्ताला कल्याण व अकल्याण असे काही उरतच नाही. हा भक्त म्हणजे ज्ञानाचा उद्बोध व भक्तिप्रेमाचा कल्लोळच असतो. असे भक्त भगवंताला खूप आवडतात. शेवटच्या ओवीत भक्तावरील आपले प्रेम व्यक्त करताना भक्ताचीच आण भगवंत वाहतात. असे भक्त हे जवळच्या प्रिय आप्तजनांसारखे असतात, असे शपथेवर भगवंत सांगतात.





**दिनांक १८ व १९ जून**

**हें विश्वचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर ।**
**किंबहुना चराचर । आपण जाहला ।।२१३।।**
**तया संगाचेनि सुरवाडे[1] । मज विदेहा[2] देह धरणे घडे ।**
**किंबहुना आवडे । निरुपमु[3] ।।२२५।।**

*१) सुखाकरिता २) निर्गुण, देहरहित ३) (खूपच आवडीचा) उपमाच नाही*

अर्थ - हे विश्वच माझे घर आहे, असा ज्याचा दृढनिश्चय झालेला असतो. फार काय सांगावे ! सर्व स्थावरजंगमात्मक जग जो (अद्वैत भावनेने) आपणच बनला आहे. ।।२१३।।

अशा भक्तांच्या संगतीच्या सुखाकरिता मी जो देहरहित, निराकार, त्या मला देह धारण करावा लागतो. फार काय सांगावे? तो मला किती आवडतो याला उपमाच नाही. ।।२२५।।

२१३ वी ओवी म्हणजे माऊलींचे हृदयच आहे. श्री ज्ञानेश्वर संपूर्ण मानवतावादी आध्यात्मिक संत आहेत. म्हणून आपल्या पसायदानामध्ये त्यांनी विश्वात्मक देवाची प्रार्थना केली आहे. "हे विश्वचि माझे घर" हे भाष्य १९ व्या श्लोकातील 'अनिकेत' या शब्दावरील आहे. "जे जे भेटे भूत । ते ते मानिजे भगवंत ।" अशी दृष्टी ज्या भक्ताची असते त्याला या विश्वात कोणताही भेदाभेद दिसत नाही. 'विष्णुमय जग । वैष्णवांचा धर्म ।' अशा आत्मौपम्य दृष्टीने ते व्यवहार करीत असतात. भगवंताच्या दृष्टीत जसे ऐक्य असते, तशीच समदृष्टी अशा भक्तांची असते. त्यामुळे मी-माझे हा भावच त्यांचा राहिलेला नसतो. तो स्वतःच संपूर्ण विश्व होऊन राहिलेला असतो. सर्व जगच हे त्याचे विश्रांतिस्थान असते. अशा भक्ताला मी माझ्या डोक्यावर मुकुटाप्रमाणे धारण करतो. आम्ही डोळेरहित असलो तरी त्या भक्ताला पाहण्यासाठी डोळे धारण करतो. त्याचा सहवास मिळण्यासाठी, निराकार, निर्गुण असूनसुद्धा आकार, सगुणरूप धारण करतो. असा भक्त मला किती आवडतो याला उपमाच नाही.

भगवंतांनी आपल्या लाडक्या भक्ताचे व भक्तियोगाचे समग्र वर्णन या अध्यायात केले आहे.

**।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**

ॐ

## अध्याय १३ वा

## क्षेत्र-क्षेत्रज्ञ विभागयोग

### दिनांक २० जून

तेरावा अध्याय म्हणजे ज्ञानाचे शिखर आहे. या अध्यायात क्षेत्र-क्षेत्रज्ञ, ज्ञान, ज्ञानी पुरुष अशा सर्वांच्या व्याख्या केल्या आहेत. गीतेत भगवंतांनी ७ ते ११ या श्लोकांमध्ये ज्ञानाची लक्षणे सांगितली आहेत. या पाच श्लोकांवर श्री ज्ञानेश्वरांची प्रतिभा एवढी फुलली की, त्यांनी यावर एकूण ६८० ओव्यांत त्यांचे निरूपण केले आहे. काव्याची उत्तुंगता, ज्ञानाचे विशालत्व व तत्त्वज्ञ, संत म्हणून केलेले तात्त्विक विवेचन ही या अध्यायाची वैशिष्ट्ये आहेत. या साऱ्या ओव्यांमध्ये श्री ज्ञानदेवांनी आपला सारा अनुभव ओतला आहे. परमेश्वराचे पूर्ण ज्ञान होण्यास बाह्यसृष्टीच्या क्षराक्षरविचाराबरोबरच मनुष्याचे शरीर आणि आत्मा किंवा क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचा विचार व्हावा लागतो. त्या दृष्टीने या तेराव्या अध्यायाची योजना आहे. त्यातील निवडक ओव्या अशा –

**क्षेत्र[1] आणि क्षेत्रज्ञाते[2] । जाणणें जें निरुतें[3] ।**
**ज्ञान ऐसें तयातें । मानूं आम्ही ।।१।।**

*१) शरीर २) आत्मा ३) खरे*

**अर्थ** – क्षेत्राला आणि क्षेत्रज्ञाला जे यथार्थ जाणणे, त्याला ज्ञान असे आम्ही समजतो.

या अध्यायातील दुसऱ्या श्लोकावरची ही ओवी आहे. क्षेत्र म्हणजे काय? क्षेत्रज्ञ कोणाला म्हणतात? इत्यादी प्रश्नांचा उलगडा या अध्यायात झाला आहे. या प्रश्नांचे ज्ञान ज्यांना झाले ते पुरुष ज्ञानी होत. अशा ज्ञानी पुरुषाची लक्षणे, श्री ज्ञानेशांनी खूप विस्तारांनी सांगितली आहेत. त्यानंतर त्यांनी अज्ञान व अज्ञानी पुरुष यांचीही लक्षणे सांगितली.

क्षेत्र म्हणजे हा मानवी देह आणि या देहाला जो यथार्थपणे जाणतो तो क्षेत्रज्ञ. क्षेत्र म्हणजे शेत! सर्व क्षेत्राचे पालन, पोषण करणारा तो क्षेत्रज्ञ! तोच आत्मा... तोच परमात्मा... तोच सर्वज्ञ. या दोघांना जो जाणतो तो खरा ज्ञानी.

पंचमहाभूते, अहंकार, बुद्धी, अव्यक्त, दहा इंद्रियांचा समुदाय, दहा विषय, मन, सुख, दुःख, द्वेष, संघात, इच्छा, चेतना आणि धृती या ३६ तत्त्वांचा समुदाय म्हणजे क्षेत्र होय. पृथ्वी, जल, अग्नी, वायू, आकाश ही पंचमहाभूते होत. अशा या देहाला क्षेत्र असे नाव आहे.

### दिनांक २१ जून

**नवल अहंकाराची गोठी । विशेषें[1] न लगे अज्ञानापाठीं ।**
**सज्ञानाचे झोंबे कंठी । नाना संकटी नाचवीं ।।८२।।**

*१) विशेषेकरून*

**अर्थ** – अहंकाराची गोष्ट काही विलक्षण आहे. ती अशी की, अहंकार हा अज्ञानी पुरुषाच्या मागे विशेषेकरून लागत नाही. परंतु ज्ञानवान पुरुषाचे नरडे धरतो आणि त्याला नाना प्रकारच्या संकटांत गोते खावयास लावतो.



ॐ

मागील ओवीत सांगितलेल्या ३६ तत्त्वांनी हे शरीर बनले आहे. त्यातील अहंकार या प्रमुख तत्त्वावरील हे भाष्य आहे. अहंकार मनुष्याला सतत या ना त्या स्वरूपात नाचवीत असतो. त्याच्या सुखदुःखाला हा अहंकारच कारणीभूत असतो. या गुणाने गरीब-श्रीमंत, विद्वान-अविद्वान असा भेद कधी पाहिला नाही. पण ज्ञानेश्वर यातील एक वेगळेच वैशिष्ट्य सांगतात. हा अहंकार अज्ञानी पुरुषाला फारसा सतावत नाही, पण ज्ञानी पुरुषाला मात्र अनेक संकटांत गोवत असतो. विद्वत्ता, पांडित्य जेथे असते तेथे हा अहंकार ठाण मांडून असतो.

### दिनांक २२ जून

**तैसीं छत्तीसही इयें तत्त्वें । मिळती जेणें एकत्वें[1] ।**
**तेणें समूहपरत्वें[2] । क्षेत्र म्हणिपे ।।१५५।।**

*१) एकत्वाने २) सामुदायिकपणाने*

**अर्थ** – त्याप्रमाणे ही छत्तीस तत्त्वे ज्या एकतत्त्वाने जमा होतात, त्या समुदायपरत्वाने त्यास क्षेत्र म्हटले जाते.

यापूर्वी, छत्तीस तत्त्वांचा उल्लेख आलाच आहे. यातील प्रत्येक तत्त्वाची ओळख माऊलींनी करून दिली आहे. इंद्रिये आणि बुद्धी यांच्यामधील रजोगुणाच्या आश्रयावर चंचलपणे जे वसती करून असते त्याला मन म्हणतात. शरीरातील आत्मसंगती जड शरीराला सजीवता प्राप्त करून देते. त्या आत्मसत्तेला चेतना असे नाव आहे. छत्तिसावे तत्त्व संघात या नावाचे आहे. संघात म्हणजे आधीच्या ३५ तत्त्वांचा समुदाय. या तत्त्वांमुळे जे बनते ते क्षेत्र होय. या क्षेत्रात पापपुण्याचे पीक उगवते म्हणून याला क्षेत्र असे नाव आहे.

### दिनांक २३ जून

**पैं वसंताचें रिगवणें[1] । झाडांचेनि साजेपणें[2] ।**
**जाणिजे तेवीं करणें[3] । सांगती ज्ञान ।।१७८।।**

*१) प्रारंभ, शिरणे २) टवटवीतपणाने ३) इंद्रिये*

**अर्थ** – वसंत ऋतूचा प्रवेश झाडांच्या टवटवीतपणावरून जाणता येतो. त्याप्रमाणे ज्ञानवान पुरुषांची इंद्रिये त्या पुरुषात ज्ञानाचे अस्तित्व दाखवितात.

वृक्षाच्या मुळांना जेव्हा पाणी दिले जाते तेव्हा ते प्रत्यक्ष दिसत नाही पण पाने-फुले जेव्हा तरारतात तेव्हा ते पाणी त्या सजीवत्वाच्या रूपाने प्रकटते. तसे वसंत ऋतूचे आगमन झाले की त्याचे अस्तित्व वृक्षांच्या टवटवीतपणावरून जाणवते. त्याप्रमाणे ज्ञानी पुरुषाच्या वर्तनावरून त्याच्या ज्ञानाची साक्ष पटते. त्या ज्ञानी पुरुषाची इंद्रिये काही कर्मे करताना दिसतात. त्यावरून त्याला ज्ञान प्राप्त झाले आहे असे आपल्याला समजते. त्याच्या वागण्यावरून दया, क्षमा, शांती अशा गुणांचा परिचय होतो. हे गुण दिसले म्हणजे तेथे ज्ञान प्रतिष्ठित झाले आहे असे समजावे. सद्गुण वर्तनातून प्रकटले की, तो पुरुष ज्ञानी समजावा.

### दिनांक २४ जून

**मोराचा आंगीं असोसे । पिसे आहाति डोळसे[1] ।**
**परी एकली दिठी नसे । तैसे[2] ते[2] गा ।।८३५।।**

*१) नेत्राकार चिन्हयुक्त, डोळे असलेली २) तशी या ज्ञानाची स्थिती*

अर्थ - मोराच्या अंगावर जशी डोळेवाली पिसे पुष्कळ असतात परंतु मोर ज्या आपल्या दृष्टीने पाहतो ती एकटी दृष्टी त्या मोरास जर नसली, तर त्या पिसांवरील डोळ्यांचा जसा काही एक उपयोग नाही; त्याप्रमाणे अर्जुना, एक अध्यात्मज्ञानावाचून त्याच्या इतर ज्ञानांचा काही उपयोग नाही.

ज्याला इतर सर्व शास्त्रांत पारंगतता आहे पण अध्यात्मज्ञानाचे वावडे आहे, त्याला अज्ञानीच समजावे. अशा मनुष्याला श्री ज्ञानेशांनी जन्मांध म्हटले आहे. एका अध्यात्मशास्त्राखेरीज इतर शास्त्रे गौण आहेत, हे समजावून सांगण्यासाठी माऊलींनी मोराच्या पिसांचा दृष्टान्त सांगितला आहे. मोराच्या अंगावर अत्यंत सुंदर डोळ्यांची पिसे असतात, पण त्या डोळ्यांना दृष्टी नसते. त्यांना काहीही दिसत नाही. दृष्टी असणारा केवळ एकच डोळा असतो. तसे एक अध्यात्मज्ञानच माणसाचे खरे कल्याण करू शकते. इतर सर्व शास्त्रे ही गौण आहेत. दृष्टी नसलेली. केवळ दिखावटी. मोराच्या पिसावरील डोळ्यांसारखी. इतर सर्व शास्त्रे माहीत असूनसुद्धा ब्रह्मविद्येत तो जर कोरडा असेल, तर तो अज्ञानीच म्हणायचा.

**दिनांक २५ व २६ जून**

**देह तव पाचांचे जालें । हे कर्मांचा गुणी[१] गुंथलें[२] ।**
**भवतसे चाकी सूदलें[३] । जन्ममृत्यूचा ।।११०२।।**
**हे काळानळाचा कुंडी[४] । घातली लोणियाची उंडी[५] ।**
**माशी पांखु[६] पाखडी[७] । तंव हे सरे ।।११०३।।**

*१) दोऱ्यात २) गुंफलेले ३) चढविलेले ४) कुंडात ५) गोळा ६) पंख झाडायला (जेवढा वेळ लागतो) ७) नाहीसे होते*

अर्थ - हा देह तर पंचमहाभूतांचा बनला आहे व कर्माच्या दोराने गुंफलेला आहे. आणि हा देह जन्ममृत्यूच्या चाकावर घातलेला असून तो गरगरा फिरत आहे. ।।११०२।।

काळरूपी अग्नीच्या तोंडात हा (देहरूपी) लोण्याचा गोळा घातलेला आहे व माशी आपले पंख पाखडायला जेवढा वेळ घेते तेवढ्या कालावधीत या देहाचा नाश होतो. ।।११०३।।

देहाची अवस्था किती क्षणभंगुर आहे! हा देह म्हणजे पंचमहाभूतांचा बनलेला मातीचा गोळा. हे मृण्मय खेळणे आहे. जोपर्यंत तो चिन्मय देहात आहे तोपर्यंत हे खेळणे हिंडते, बागडते, हसते. पण जेव्हा तो चिन्मय निघून जातो, तेव्हा हे मातीचे खेळणे पंचमहाभूतांत विलीन होते. कर्माच्या दोरांनी गुंफलेला हा देह जन्ममृत्यूच्या चाकावर गरगरा फिरत असतो. जो जन्मतो त्याला मृत्यू अटळ आहे व ज्याला मृत्यू आहे त्याला पुन्हा जन्म निश्चित आहे. अर्थात हा जन्म त्याच्या कर्मानुसार ज्या योनीत व्हायचा तेथेच तो होतो. माऊलींनी संपूर्ण ज्ञानेश्वरीत, या विश्वातील पदार्थांचे नेमके वर्णन केले आहे. "उपजे ते नाशे" व "नाशले ते पुनरपि दिसे" ही या जगातील प्रत्येक वस्तूची अवस्था आहे.

**दिनांक २७, २८, २९ व ३० जून**

**या देहाची हे दशा । आणि आत्मा तो एथ ऐसा ।**
**पै नित्य सिद्ध आपैसा[१] । अनादिपणे ।।११०६।।**
**एवरूप पै आत्मा । देही जे म्हणती प्रियोत्तमा ।**
**ते मठाकारे व्योमा । नाम जैसे ।।१११४।।**





**तैसे तयाचिये अनुस्यूती[२] । होती जाती देहाकृती[३] ।**
**तो घे ना सांडी सुमती । जैसा तैसा ।।१११५।।**
**अहोरात्रें[४] जैशी । येती जाती आकाशी ।**
**आत्मसत्ते[५] तैसीं । देहे जाण ।।१११६।।**

*१) सहज २) व्याप्तीने, अखंडपणामुळे ३) देहाचे आकार ४) रात्री व दिवस ५) आत्मा*

अर्थ - या देहाची अशी अवस्था आहे आणि (देहात असलेला) आत्मा तर असा आहे की, अनादिपणामुळे तो स्वभावतः नित्य व सिद्ध आहे. ।।११०६।।

तो (आत्मा) देहात आहे असे जे म्हणतात ते म्हणणे, हे प्रियोत्तमा अर्जुना! मठाच्या आकारात सापडलेल्या आकाशास मठाकाश म्हणण्यासारखे आहे. ।।१११४।।

त्याप्रमाणे त्याच्या अखंड असण्यावर देहाचे आकार होतात व जातात (पण) अर्जुना, तो आत्मा देहाकृती घेत नाही अथवा टाकीत नाही, तर जशाच्या तसाच असतो. ।।१११५।।

आकाशामध्ये जसे दिवस व रात्र येतात व जातात त्याप्रमाणे आत्मसत्तेवर देह येतात व जातात, असे समज. ।।१११६।।

माऊलींनी आधी देहाचे म्हणजे क्षेत्राचे वर्णन केले व आता वरील ओव्यांतून आत्म्याचे म्हणजे क्षेत्रज्ञाचे वर्णन केले आहे. हे करताना दृष्टान्त देऊन हा कठीण विषय सोप्यात सोपा करून सांगितला आहे. आत्मा अनादि, अज, अमर, नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त, सच्चिदानंद, सिद्ध, निर्गुण, अकर्ता, अरूप, अव्यय, अविकारी असा आहे. वास्तविक तो आत्मा देहात आहे असे जे म्हणतात ते म्हणणे म्हणजे मठातील आकाशासारखे आहे. मठ फुटल्यावर ते मूळ आकाशाशीच एकरूप आहे तसे देह गेल्यानंतर आत्मा हा परम आत्म्याशी एकरूपच आहे. तो वास्तविक देह धारण करीत नाही व टाकीतही नाही. पण त्याच्या अस्तित्वामुळे मात्र देहाचे व्यापार होतात. आकाशात जसे ढग येतात व जातात पण आकाशाला त्याचे काही सोयरसुतक नसते. तसेच दिवस व रात्रीचे. त्यामुळे आकाशात काही फरक पडत नाही. तसे आत्म्याचे आहे. ही आत्मसत्ता कितीही देह धारण करीत असली व टाकीत असली तरी आत्मा विकारी होत नाही. देहाच्या ठिकाणी असून देहाने तो लिप्त होत नाही. शरीरात असूनसुद्धा तो अलिप्त व अकर्ता असतो.

**दिनांक १, २ व ३ जुलै**

**तैसा वाग्विलास विस्तारूं । गीतार्थेसी विश्व भरूं ।**
**आनंदाचे आवारूं[१] । मांडू जगा ।।११५९।।**
**फिटो विवेकाची वाणी[२] । हो कानामनाची जिणी[३] ।**
**देखो आवडी ते खाणी । ब्रह्मविद्येची ।।११६०।।**
**दिसो परतत्व डोळा । पाहो सुखाचा सोहळा ।**
**रिघो महाबोधसुकाळा । माजी विश्व ।।११६१।।**

*१) आवार, विस्तार २) दैन्य, उणीव ३) जीवितसाफल्य*

अर्थ - याप्रमाणे वाणीच्या विलासाचा विस्तार करू व गीतार्थाने विश्व भरून टाकू व सगळ्या जगाला आनंदाचा कोट करू. ।।११५९।।

आत्मानात्मविवेकाचा कमीपणा नाहीसा होवो, कानाचे व मनाचे जगण्याचे सार्थ होवो व वाटेल त्याला ब्रह्मविद्येची खाण बघता येवो ।।११६०।।

परब्रह्म सर्वांच्या डोळ्याला दिसो. सुखाचा उत्सव उदयास येवो व सर्व जग ब्रह्मज्ञानाच्या विपुलतेत प्रवेश करो. ।।११६१।।

श्री ज्ञानेश्वरांनी आपल्या लेखनाचा हेतू येथे विशद केला आहे. साऱ्या विश्वाला या भगवद्गीतेच्या तत्त्वज्ञानाचा बोध करून देऊन त्यांना आनंदी करण्याचे ध्येय माऊलींनी घेतले होते. याच भावनेतून त्यांनी विश्वात्मक देवाकडे सर्वांच्या कल्याणाची मागणी केली. ज्ञानदेवांनी धर्मजागृतीचे व सांस्कृतिक प्रबोधनाच्या उत्तुंग कामगिरीबरोबरच, सर्वांच्या दुःखनाशाचे व आनंद प्रदान करण्याचे दैवी काम केले.

याच भावनेतून त्यांना असे वाटले की, सामान्यातल्या सामान्य माणसालासुद्धा ब्रह्मविद्येचे ज्ञान प्राप्त झाले पाहिजे. त्याने आत्मसुखाचा सोहळा अनुभवला पाहिजे. त्याच्या जगण्याचे सार्थक व्हायला पाहिजे. सर्वांना त्या परमतत्त्वाचे दर्शन होवो, त्यांना परमात्मरूपाच्या दर्शनाचे अवीट सुख प्राप्त होवो, अशी प्रार्थना श्री ज्ञानेशांनी या तेराव्या अध्यायातील शेवटच्या टप्प्यातील ओव्यांतून केली आहे. ही विश्वकल्याणाची प्रार्थना शेवटी पसायदानातून त्यांनी विस्तृतपणे मांडली आहे.

।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।





# अध्याय १४

# गुणत्रयविभागयोग

**दिनांक ४, ५ व ६ जुलै**

चौदावा अध्याय हा, तेराव्या अध्यायातील क्षेत्र-क्षेत्रज्ञ किंवा पुरुष-प्रकृती याविषयींच्या विचारांची पूर्तता करणारा अध्याय आहे. पुरुष (आत्मा) हा साक्षी, उदासीन तत्त्व आहे तर प्रकृती ही सर्व प्राणिमात्राला संसारात ओढते. एकाच प्रकृतीपासून नानाविध सृष्टी विशेषतः सजीव सृष्टी कशी उत्पन्न होते; याचे निरूपण या अध्यायात झाले आहे. शरीरधारी पुरुष (आत्मा) प्रकृतीच्या गुणांनी आकृष्ट होऊन त्यात रमत असल्याने, प्रकृतीच्या व्यापाराच्या अधीन, अंकित असतो. एरवी खरोखर पाहिले तर, आत्मा हा स्वयंपूर्ण, गुणातीत आहे. पण तो प्रकृतीच्या ज्या गुणांनी मोहित होतो ते गुण किती व कसे आहेत, ते गुण त्याला कोणत्या प्रकाराने बद्ध करतात तसेच गुणातीताची लक्षणे कोणती याचा संपूर्ण विचार या अध्यायात झाला आहे. यातील निवडक ओव्या पुढीलप्रमाणे –

**याकारणे मी पिता । महद्ब्रह्म[1]माता ।**
**अपत्य पंडुसुता । जगडंबरु ।।११६।।**
**आता शरीरे बहुते । देखोनि न भेद हो चित्ते ।**
**जे मनबुद्ध्यादि भूते । एकेंचि येथे ।।११७।।**
**म्हणोनि जग परौते[2] । सारुनि[3] पाहिजे माते[4] ।**
**तैसा नव्हे उखिते[5] । आघवे[6] मीचि ।।१२७।।**

*१) माया, प्रकृती २) मागे ३) टाकून ४) मला ५) एकंदर ६) सर्व*

अर्थ - या कारणास्तव मी बाप, महद्ब्रह्म ही आई, व अर्जुना! जगडंबर हे मूल आहे. ।।११६।।

आता निरनिराळी शरीरे पाहून चित्तात भेद येऊ देऊ नकोस, कारण की, या सर्व शरीरात मन, बुद्धी, अहंकार व पंचमहाभूते ही जी जगातील आठ तत्त्वे आहेत ती एकच आहेत. ।।११७।।

म्हणून जगाचा निरास करून मला पाहावे. तसा मी नाही, तर सर्वांसकट मीच आहे. ।।१२७।।

जगाचे व आपले नाते कसे आहे याचा निःसंदिग्ध खुलासा भगवंतांनी येथे केला आहे. सर्व जीवांची आई म्हणजे कारण, मीच आहे आणि मीच बीजरूप पिता आहे. देहामध्ये जसे निरनिराळे अवयव असतात पण देह एकच असतो तसे या जगात विविध पदार्थ, शरीरे असली तरी त्यातून एकच तत्त्व व्यक्त होते. ईश्वरच सर्व जग आहे. तोच जगात व्यापून राहिला आहे. अग्नी व ज्वाला, लाटा व समुद्र, घडा व माती हे सर्व जसे एकरूप आहेत तसे मी वाचून जगात काहीही नाही. शरीरे भिन्न भिन्न असली तरी प्रकृतीची आठही तत्त्वे सर्वांत एकच आहेत. हा विचार श्री ज्ञानेश्वरांनी आपल्या विशेष शैलीने प्रतिपादन केला आहे. जग दूर सारून परमेश्वराला पाहावे तसा मी नाही, तर सर्व मिळून मीच आहे. अनेक देहांतून परमात्मा प्रकट झाला तरी त्याचे प्रकाशन तो स्वतःच असतो.

**दिनांक ७ जुलै**

**नलिकेवरूनि[1] उठिला । जैसा शुक[2] शाखे[3] बैसला ।**
**तैसा मूळ[4] अहंते[5] वेढिला । तो म्हणौनिया ।।३०२।।**

ॐ

*१) नळिकायंत्राच्या भ्रमणातून २) पोपट ३) फांदीवर ४) "अहं ब्रह्मास्मि" किंवा 'सोऽहं' या मूळ अहंतत्त्वावर बोध पावतो.*

**अर्थ** - जसा पोपट नळिकेवरून उठून (स्वतंत्रपणाने) झाडाच्या फांदीवर बसावा, तसा तो देह अहंतासोडून स्वरूप (ब्रह्म) हेच मी आहे अशा स्वरूपअहंतेने तो वेष्टिला गेला.

प्रत्येक जीव हा सत्त्व, रज, तम या प्रकृतीच्या गुणांनी बद्ध आहे. सात्त्विक, राजसिक व तामसिक अशा तिन्ही गुणांच्या पलीकडे जाणाऱ्या गुणातीत पुरुषाचे वर्णन माऊलींनी वरील ओवीत केले आहे. असा पुरुष हे तिन्ही गुण; तसेच जन्म, मृत्यू, जरा, व्याधी या अवस्थांतून मुक्त होऊन शुद्ध निर्गुण भावात प्रवेश करतो. नदी जशी समुद्राला जाऊन मिळते तसा जीव शिवस्वरूपाला जाऊन मिळतो. हे सांगण्यासाठी माऊलींनी पोपटाचा सुंदर दृष्टान्त दिला आहे. जोपर्यंत पोपटाने नळीला घट्ट धरून ठेवले आहे तोपर्यंत तो बद्ध असतो, पण नळी सोडून मुक्तपणे जेव्हा झाडाच्या फांदीवर बसतो तेव्हा तो सुखरूप असतो. तसेच अशा गुणातीत पुरुषाचे आहे. सत्त्व, रज, तम हे गुण असेपर्यंत मनुष्य प्रपंचात बद्ध असतो पण तो जेव्हा अहंता व देहात्मकता सोडतो, त्या वेळी तो आपल्या मूळ स्वरूपाला प्राप्त करतो. आत्मस्वरूप प्राप्त झाल्यामुळे तो ईश्वररूप होतो. घट नाहीसे झाल्यावर घटाकाश आकाशरूप होते तसे देह असताना व नसतानाही तो परमात्मस्वरूपच असतो.

**दिनांक ८, ९, १० व ११ जुलै**

**पै परमाणु भूतळी । हिमकणु हिमाचळी ।**
**मजमाजी न्याहाळी । अहं[१] तैसे ।।३८५।।**
**हो का तरंगु लहानु । परी सिंधूसी[२] नाही भिन्नु ।**
**तैसा ईश्वरी मी आनु । नोहेचि गा ।।३८६।।**
**ऐसेनि या समरसे । दृष्टि जै उल्हासे[३] ।**
**ते भक्ति पै ऐसे । आम्ही म्हणो ।।३८७।।**
**आणि ज्ञानाचे[४] चांगावे[४] । इयेचि दृष्टि[५] नावे ।**
**योगाचेही आघवे । सर्वस्व हे ।।३८८।।**

*१) मीपण २) समुद्र ३) फाकते, विशाल होते ४) (ज्ञानाची) अत्युच्च स्थिती ५) ह्या दृष्टीने जो पाहतो*

**अर्थ** - पृथ्वीवर असलेला अल्प परमाणु जसा पृथ्वीरूप आहे, अथवा बर्फाच्या पर्वतावरील बर्फाचा कण जसा बर्फाच्या पर्वतरूपच आहे, त्याप्रमाणे तू आपला 'मी'पणा माझ्या ठिकाणी पाहा. ।।३८५।।

समुद्रावरची लाट जरी लहान असली तरी ती समुद्राहून वेगळी नाही तसा मी ईश्वराच्या ठिकाणी (ईश्वराहून वेगळा) खरोखर नाही. ।।३८६।।

अर्जुना! अशा ऐक्याने जेव्हा दृष्टी विकसित होते तेव्हा त्याला आम्ही 'भक्ती' असे म्हणतो. ।।३८७।।
हीच दृष्टी म्हणजे ज्ञानाचा चांगलेपणा होय. आणि योगाचे सर्व सार हेच आहे. ।।३८८।।

२६व्या श्लोकावरील या अत्यंत महत्त्वाच्या ओव्या आहेत. खरा भक्त व भक्ती यांची व्याख्या यात माऊलींनी केली आहे. भक्त सर्वत्र ईश्वरालाच पाहत असतो. विश्वातच त्याचे दर्शन घेतल्यामुळे आपणही त्या परमेश्वराचे अंश आहोत याची अनुभूती त्याला येते. सोऽहं भावनेने भक्ती केल्यामुळे भक्त व ईश्वर हा भेदाभेदच राहत नाही. मी त्या अमृततत्त्वाचा पुत्र आहे ही दृढ भावना त्याची होते. जसा परमाणू पृथ्वीचा अंशच असल्याने पृथ्वीरूप असतो



ॐ

किंवा बर्फाचा कण हाही बर्फाचा पर्वतरूप असतो तसे समुद्राच्या लाटासुद्धा सागररूपच असतात. आपणही भगवंताचेच अंश आहोत अशी ऐक्यभावना झाल्यामुळे तो सर्वत्र भगवंताचेच दर्शन घेतो. अशी दृष्टी जेव्हा येते तेव्हा त्याला अव्यभिचारी, अनन्यभक्ती असे म्हणतात. हेच खरे ज्ञान. योगांचेही सार या अद्वैतभावनेत दडले आहे. मेघ आणि समुद्र ह्यांच्यामध्ये जशी अखंड जलधारा लागलेली असते, त्याप्रमाणे अशा भक्ताची वृत्ती अखंड ब्रह्ममय असते. म्हणजे जेथून वृत्ती उत्पन्न होते तेही ब्रह्म, ज्याला विषय करते तेही ब्रह्म व वृत्तीही ब्रह्म, अशी ही त्रिपुटी ब्रह्मरूपच असते.

**।।श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**

ॐ

# अध्याय १५
# पुरुषोत्तमयोग

**दिनांक १२ जुलै**

पंधरावा अध्याय म्हणजे गीतेतील संपूर्ण विचारांचा अमृतकुंभच! या अध्यायात संसाराचे म्हणजे जगाचे खरे रूप सांगून, जन्ममरणाच्या फेऱ्यातून मुक्त होण्याचा उपाय येथे भगवंतांनी सांगितला आहे. जीवाचा जगाशी तसेच ईश्वराशी संबंध आणि ईश्वराचे 'पुरुषोत्तम' रूप यांचे विवेचन भगवंतांनी या अध्यायात केले आहे. गुह्यातले गुह्य शास्त्र येथे विशद केले आहे. श्री ज्ञानेशांनी या अध्यायातील २० श्लोकांवर ५९८ ओव्यांतून निरूपण केले आहे. त्यातील महत्त्वाच्या ओव्या अशा –

**आता हृदय हे आपुले । चौफळुनिया[1] भले[2] ।**
**वरी बैसऊं पाऊले । श्री गुरुची ॥१॥**

*१) चौरंग भरून २) चांगले*

**अर्थ** – आता आपल्या शुद्ध अंतःकरणाचा चौरंग करून त्यावर श्रीगुरूंच्या पावलांची स्थापना करू.

श्री ज्ञानेश्वरांनी संपूर्ण ज्ञानेश्वरीत अनेक वेळा सद्गुरूंचे स्तवन गायिले आहे. पंधराव्या अध्यायाच्या प्रारंभीच ज्ञानेश्वर आपल्या सद्गुरूंचे अंतःकरणापासून वर्णन करीत आहेत. ते म्हणतात की, आता शुद्ध असलेल्या अंतःकरणाचा चौरंग करून त्यावर श्रीगुरूंच्या पावलांची स्थापना करावी. एकनिष्ठतारूप स्वच्छ पाण्याने श्रीगुरूंना स्नान घालावे. त्यांची आठवण हेच एक गंधाचे बोट त्यांना लावावे. श्रीगुरूंचे प्रेम हेच एक सोने शुद्ध करून त्याचे लहान वाळे करून सद्गुरूंच्या पायांच्या अंगठ्यात घालावेत. अनन्यतेने शुद्ध झालेले दृढ प्रेम हीच त्यांच्या पायातील जोडवी होत. श्रीगुरूंच्या दोन्ही पायांत माझे शरीर व प्राण या दोन खडावा असाव्यात. भोग व मोक्ष हे दोन्ही सद्गुरूंच्या चरणांवरून ओवाळून टाकावेत... असे हृदय भरभरून श्रीगुरूंची स्तुती त्यांनी अध्यायाच्या सुरुवातीस केली आहे.

**दिनांक १३ जुलै**

**आणि अश्वत्थु येणे नांवे । पिंपळु म्हणती स्वभावे[1] ।**
**परि तो अभिप्राय[2] नोहे[3] । श्रीहरीचा ॥११५॥**

*१) सहजच २) मत ३) नाही*

**अर्थ** – आणि अश्वत्थ या नावाने स्वभावतः पिंपळ असे म्हणतात. परंतु भगवंताचा तसा अभिप्राय नाही.

संसारवृक्षाला अश्वत्थ म्हणजे पिंपळ असे म्हटले आहे. श्व म्हणजे उद्या. अ म्हणजे नाही. हा प्रपंचवृक्ष रूप सदोदित टिकणारा नाही. हा प्रतिक्षणाला नाश पावत असतो म्हणून त्याला ज्ञाते लोक अश्वत्थ असे म्हणतात. भगवंत म्हणतात की, हे काही आपले मत नाही. एका क्षणात मेघांचे रंग बदलतात किंवा वीज क्षणभरात नाहीशी होते, हलणाऱ्या कमळाच्या पानावर पाण्याच्या थेंबाला स्थिरता नसते त्याप्रमाणे या संसारवृक्षाची स्थिती आहे. अश्वत्थ म्हणजे पिंपळ खरा पण भगवंताच्या मनात हा अभिप्राय नाही. अशा या संसारवृक्षाचे वर्णन मोठ्या खुमासदार पद्धतीने माऊलींनी केले आहे. मायेपासून महत्तत्व हीच काय ती उमललेली कोवळी लुसलुशीत पालवी प्रकट होते. त्या पालवीस सत्त्व, रज, तम असे तीन अहंकार निर्माण होतात. हा त्रिगुणात्मक अहंकार म्हणजे पानांचा खालचा शेंडा आहे. यापासून टवटवीत अशी मनाची डहाळी वाढू लागते. मन, बुद्धी, चित्त, अहंकार यांच्या



ॐ

फांद्या त्रिगुणात्मक अहंकारास फुटतात. तामस अहंकारापासून आकाश, वायू, तेज, उदक, पृथ्वी ही पंचमहाभूते फुटतात. जिव्हेला इच्छा निर्माण होते. असा हा संसारवृक्ष अधिक वाढला तरी तो ब्रह्मापेक्षा मोठा होत नाही.

**दिनांक १४ व १५ जुलै**

**पै तोंड भरो का विचारा । आणि अंतःकरणी विषयासी थारा ।**
**तरी नातुडे धनुर्धरा । त्रिशुद्धी मी ॥३९३॥**
**तैसा चित्ती अहंते ठावो । आणि जिभे सकळशास्त्राचा सरावो[1] ।**
**ऐसेनि कोडी[2] एक जन्म जावो । परी न पविजे माते[3] ॥३९६॥**

*१) अभ्यास २) कोट्यवधी ३) मला*

**अर्थ** – अर्जुना, कितीही ज्ञानाने तोंड भरले असेना का? परंतु जर अंतःकरणामध्ये विषयांना आश्रय मिळत असेल, तर मी निश्चयेकरून सापडणार नाही. ॥३९३॥

त्याप्रमाणे चित्तामध्ये अहंकार, अभिमान यांना जागा दिली आहे आणि जिभेवर सर्व शास्त्रे नाचत असतील तरी अशा पुरुषास माझ्या स्वरूपाची प्राप्ती करून घेता यावयाची नाही. ॥३९६॥

मुमुक्षत्व, वैराग्य, अनहंकार व निर्मोहत्व जर नसेल, तर एखादा पुरुष कितीही ज्ञानी जरी असला तरी त्याला भगवंताची प्राप्ती होणार नाही. अंतःकरण विषय-विकारांनी भरलेले असले व चित्तात अभिमान, अहंकार यांना जर थारा असेल तर एक कोटी वेळा जरी त्याने जन्म घेतला तरी माझी प्राप्ती त्याला होणार नाही. चित्तशुद्धी हा परमार्थाचा पाया आहे. तो जर नसेल तर सारे व्यर्थ!

**दिनांक १६, १७ व १८ जुलै**

**पै आघवा मीचि असे । येथ नाही कीर अनारिसे[1] ।**
**परि प्राणियांचिया उल्लासे । बुद्धी[2] ऐसा ॥४१५॥**
**अगा नेणा[3] आणि चतुरा । पुढां निळयांचा[4] दुसरा[5] ।**
**नेणा सर्पत्वे जाला येरा । सुखालागी ॥४१९॥**
**हे असो स्वातीचे उदक । शुक्ती मोती व्याली बिरव ।**
**तैसा सज्ञानासी मी सुख । दुःख तो अज्ञानासी ॥४२०॥**

*१) वेगळे २) बुद्धीसारखा ३) अज्ञान्याला ४) निळमण्यांचा ५) दोन सरांचा आहार*

**अर्थ** – सर्वच मी आहे. यात खरोखर अन्यथा नाही. परंतु प्राण्यांची अंतःकरणस्वरूप उपाधी जशी शुद्ध अथवा अशुद्ध असेल, त्याप्रमाणे मी (त्यांच्या ठिकाणी) तसा व्यक्त होतो. ॥४१५॥

अर्जुना, अरे अज्ञानी व ज्ञानी यांच्यापुढे असलेला दोन पदरांचा निळमण्यांचा हार, हा अज्ञान्याला सर्पपणाने (भीती उत्पन्न करणारा) भासला व तोच हार ज्ञान्याला (हार निळमण्यांचा आहे हे यथार्थ समजल्यामुळे) सुख उत्पन्न करणारा झाला. ॥४१९॥

हे दृष्टान्त राहू दे. एकाच स्वाती नक्षत्राचे पाणी, ते शिंपल्यामध्ये मोती होते व सर्पात विष होते, त्याप्रमाणे मी ज्ञान्याला सुख (रूप) व अज्ञान्याला दुःख (रूप) आहे. ॥४२०॥

या सर्व सृष्टीमध्ये भगवंत व्यापून राहिले आहेत. भगवंताचा अंश सर्व जीवांमध्ये आहे. आदित्याच्या ठिकाणचे तेज त्याचेच आहे. अग्नीची दाहकता, चंद्राचे शीतलत्व हेही त्याचेच आहे. रसात्मक चंद्र होऊन तोच सर्व वनस्पतींचे

पोषण करतो. वैश्वानर बनून सर्व जीवांच्या पोटातील अन्न तोच पचवितो. सर्व विश्वात भगवंतावाचून दुसरे कोणी नाही. प्रत्येकाच्या हृदयात त्याचा वास आहे. चैतन्यरूपाने तोच सर्वांना शक्ती देतो. भगवंत सर्वत्र असताना काही प्राणी सुखी व काही जीव दुःखी का? दारुड्याच्याही अंतःकरणात तोच आहे व सात्त्विक साधकाच्याही अंतःकरणात तोच आहे. मग एकजण दारुण दुःख भोगतो व दुसरा आनंदाच्या डोहात बुडत असतो. भगवंत येथे या शंकेचे निराकरण करीत आहेत. ज्याचे अंतःकरण शुद्ध वा अशुद्ध असेल त्या प्रमाणात त्याला सुखदुःख प्राप्त होईल. जसे पाणी एकच असते पण निरनिराळ्या वनस्पतींना ते दिले की, वेगवेगळ्या प्रमाणात रसाचे पोषण करते. निळमण्यांचा हार ज्ञानी माणसास सुखकारक वाटतो तर तोच हार अज्ञानी माणसाला सर्प वाटतो. स्वाती नक्षत्राचे पाणी एकच असते, पण ते शिंपल्यात पडले की, त्याचे मोती होतात व सापाच्या मुखात पडले की विष होते. त्याप्रमाणे ज्याचे अंतःकरण जेवढे शुद्ध तेवढे त्याला सुख अधिक व जेवढे अशुद्ध तेवढे त्याला दुःख अधिक. त्याप्रमाणे ज्ञानी व शुद्ध चित्ताच्या माणसाला सुख व अज्ञानी, अहंकारी मनुष्यास दुःख.

**दिनांक १९, २०, २१ व २२ जुलै**

**एऱ्हवी सर्वांचा हृदयदेशी । मी अमुका आहे ऐसी ।**
**जे बुद्धि स्फुरे अहर्निशी । ते वस्तु[1] गा मी ।।४२१।।**
**परी संतासवे बैसता । योगज्ञानी पैसता[2] ।**
**गुरुचरण उपासिता । वैराग्येसी ।।४२२।।**
**येणेचि सत्कर्मे । अशेषही अज्ञान विरमे[3] ।**
**जयांचे अहं विश्रामें । आत्मरुपी ।।४२३।।**
**ते आपेआप देखोनि देखी । मियां आत्मेनि सदा सुखी ।**
**येथे मीवाचून अवलोकी । आन हेतु असे ।।४२४।।**

*१) परमात्मा २) अभ्यासिता ३) लय पावते*

**अर्थ** - अर्जुना, वास्तविक विचार करून पाहिले तर सर्वांच्या हृदयदेशात मी अमका आहे, अशी जी बुद्धी रात्रंदिवस स्फुरते, ती वस्तू मी आहे. ।।४२१।।

परंतु संतांच्या संगतीत राहिले असता आणि योग व ज्ञान यात प्रवेश केला असता (यांचा अभ्यास केला असता) आणि वैराग्याने युक्त होऊन गुरुचरणांची सेवा केली असता ।।४२२।।

याच सत्कर्माच्या योगाने संपूर्ण अज्ञान नाहीसे होते व ज्यांचा अहंकार आत्मस्वरूपी स्थिर होतो ।।४२३।।

ते पुरुष आपले स्वरूप आपण ज्ञानाने जाणून त्यांचा आत्मा मी असल्याने माझ्या सुखरूपत्वाने नेहमी आनंदात असतात. या ठिकाणी होणाऱ्या आत्मदर्शनास माझ्याशिवाय दुसरे कोणी कारण आहे काय? ।।४२४।।

पंधराव्या अध्यायातील १५ व्या मंगल श्लोकावर माऊलींनी केलेले हे निरूपण आहे. "सर्वस्य चाहं हृदि संन्निविष्टो....." या श्लोकात भगवंत म्हणतात की, मी सर्व प्राण्यांच्या हृदयामध्ये प्रवेश करून राहिलो आहे. त्यांना स्मृती, ज्ञान व विस्मृती माझ्यापासून होतात...

'मी अमुक आहे' असे जे बुद्धीचे स्फुरण तेच माझे स्वरूप होय, असे भगवंत या ठिकाणी म्हणतात. या स्फुरणाला आधार भगवंत आहे. म्हणून 'मी' रूपाने होणारे स्फुरण माझेच स्वरूप होय असे भगवंतांनी म्हटले आहे. परमात्मा व बुद्धीचे अंतःस्फुरण यांचा विवेक इतका सूक्ष्म आहे की, तो संतसमागम व संतांची सेवा यावाचून अनुभविला जाऊ शकत नाही. पुण्यकर्मांच्या योगाने अज्ञान निःशेष नाहीसे होऊन आत्मस्वरूपाच्या ठिकाणी त्यांचा





'अहं' विश्राम पावतो. ते आपणच आत्मदृष्टीने आपल्याला पाहतात व त्यांचा आत्मा मीच असल्यामुळे ते सदा सुखी असतात.

**दिनांक २३, २४, २५, २६ व २७ जुलै**

**मग म्हणे सर्वत्र सच्चिदानंदु । मीचि एक स्वतः सिद्धु ।**
**जो आपणेनसि भेदु । नेणोनि जाणे ।।५६२।।**
**तेणेचि सर्व जाणितले । हेही म्हणणे थेकुले[1] ।**
**जे तया सर्व उरले । द्वैत नाही ।।५६३।।**
**म्हणोनि माझिया भजना । उचितु[2] तोचि अर्जुना ।**
**गगन जैसे अलिंगना । गगनाचिया ।।५६४।।**
**साडेपंधरा मिसळावे । ते साडेपंधरेचि होआवे ।**
**तेवी मी जालिया संभवे । भक्ति माझी ।।५६६।।**
**ऐसियालागी सर्व प्रकारी । जैसा कल्लोळु[3] अनन्यु सागरी ।**
**तैसा माते[4] अवधारी । भजिन्नला जो ।।५६८।।**

*१) अल्प २) योग्य ३) लाटा ४) मला*

**अर्थ** - मग तो आपणासह भेद न जाणता (मला) जाणतो व त्यामुळे मीच एक स्वतः सिद्ध सच्चिदानंद सर्वत्र आहे असे म्हणतो. ।।५६२।।

त्यानेच सर्व जाणले, हे म्हणणेसुद्धा थोडे आहे. कारण की, त्याला सर्व ब्रह्म असल्यामुळे, त्याच्या ठिकाणी द्वैत उरले नाही. ।।५६३।।

म्हणून अर्जुना, माझ्या भजनाला तोच योग्य आहे. (हे कसे तर) आकाश जसे आकाशाच्या आलिंगनास योग्य आहे. ।।५६४।।

अस्सल सोन्याशी तद्रूप होणे असेल तर अस्सल सोनेच झाले पाहिजे. त्याप्रमाणे मद्रूप होऊनच माझी भक्ती करणे शक्य आहे. ।।५६६।।

एवढ्याकरिता जशी लाट सर्व रीतीनी समुद्राशी अभिन्न असते, त्याप्रमाणे जो मला (तद्रूप होऊन) भजला ऐक. ।।५६८।।

१९ व्या महत्त्वाच्या श्लोकावरील हे भाष्य आहे. भगवंत या ठिकाणी म्हणतात की, "जो ज्ञानी या प्रकारे मला, पुरुषोत्तमाला जाणतो तो सर्वज्ञ होय. तो (आपल्यासकट सर्व माझे स्वरूप आहे असे जाणून) सर्व प्रकारे माझी भक्ती करतो." यावर माऊलींनी दृष्टान्तांच्या आधारे भगवंतांचे म्हणणे समजावून सांगितले आहे. भगवंताशिवाय कोणतीही वस्तू भिन्न नाही. सोऽहं बोधाने तो भगवंत व आपल्यात भेद मानत नाही. संपूर्ण शरणागत होऊन तो भगवंताशी एकरूप होतो. अद्वैत भावनेने जगाकडे पाहत असल्याने सर्वत्र त्याला भगवंताचेच दर्शन होते. असा भक्तच भगवंताला सर्वांत प्रिय आहे. असा भक्त म्हणजे भगवंतच. कारण भगवंताशी तद्रूप होण्यासाठी भगवंतच व्हावे लागते. "कृष्णो भूत्वा कृष्णं यजेत", "देवो भूत्वा देवं यजेत" कृष्ण होऊन कृष्णाची पूजा करायची असते. देव होऊन देवाची पूजा होत असते. जसे शंभर नंबरी सोन्यात मिसळायचे असेल तर तसेच शुद्ध सोने व्हावे लागते. मग जशा लाटा व समुद्र किंवा सूर्य व त्याची प्रभा एकरूप असतात तसे हा भक्त भगवंताशी तद्रूप होऊन जातो. अशी अद्वैत, अभिन्न, एकरूप भक्ती भगवंताला आवडते.

।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।

ॐ

## अध्याय १६
## दैवासुरसंपद्विभागयोग

**दिनांक २८, २९, ३० व ३१ जुलै**

मागील अध्यायातील 'पुरुषोत्तमयोगा'ची परमदशा प्राप्त करून घेण्यासाठी अंतर्बाह्य पूर्ण परिवर्तन घडणे अपरिहार्य आहे. शुद्ध अंतःकरणातच ज्ञान, भक्ती विराजते. अंतःकरण म्हणजे चित्त, मन, बुद्धी, अहं. हे सर्व शुद्ध होण्यासाठी दैवी गुणांची जोपासना झाली पाहिजे. हे गुण जेवढे वृत्तीत येतील तेवढी शुद्धता झाली आहे असे गृहीत धरावे. ज्ञान प्राप्त होण्यासाठी ज्या गुणांची आवश्यकता आहे असे २६ दैवी गुण या अध्यायात भगवंतांनी सांगितले आहेत. ज्ञान प्राप्त झाले म्हणजे देहात्मकता जाऊन आत्मभान प्राप्त होते. आत्मज्ञान हृदयात प्रतिष्ठित झाल्यानंतर तिथे शांतीचा, प्रसन्नतेचा अंकुर फुटतो. जिथे शांती तेथे सुख. आपल्या अंगी, आध्यात्मिक साधना करीत असताना किती दैवी गुण किंवा असुरी दुर्गुण आहेत याचे आत्मपरीक्षण करण्यासाठी या अध्यायाची योजना झाली आहे. आत्मोन्नतीच्या कोणत्या टप्प्यावर आपण आहोत याचे परीक्षण आपणच केले पाहिजे. आपली आंतरिक प्रगती किती आहे याचे परीक्षक आपण स्वतः व भगवंत आहोत. इतरांना जसे वाटते तसे असतेच असे नाही. या अध्यायातील निवडक ओव्या अशा –

**निम्न[1] भरलिया उणे । पाणी ढळोंचि नेणे ।**
**तेवीं श्रांता[2] तोषौनि जाणे । सामोरेया ।।१५८।।**
**पै पायी काटा नेहटे[3] । तंव व्यथा जीवी उमटे ।**
**तैसा पोळे संकटे । पुढिलाचेनि ।।१५९।।**
**कां पावो[4] शीतळता लाहे । की ते डोळयाचिलागी होये ।**
**तैसा परसुखे जाये । सुखावतु ।।१६०।।**
**तो पुरुष वीरराया । मूर्तिमंत जाण दया ।**
**मी उदयजतांचि तया । ऋणिया लाभे ।।१६२।।**

*१) सखल जागा, खड्डा २) दुःखी, श्रमलेला ३) बोचतो ४) पाय*

**अर्थ** - वाहत असलेले पाणी, समोर खड्डा आला तर तो पूर्ण भरल्याशिवाय, पुढे जाणारच नाही त्याप्रमाणे पुढे आलेल्या दुःखिताला संतुष्ट करून मग (ज्याचे) पुढे जाणे होते. ।।१५८।।

अथवा पायाला काटा लागतो त्या क्षणी ते दुःख अंतःकरणात प्रकट होते. त्याप्रमाणे दुसऱ्याच्या दुःखाने तो पोळला जातो. ।।१५९।।

अथवा पायाला थंडावा मिळतो, तो डोळ्यांच्या उपभोगास येतो, त्याप्रमाणे तो दुसऱ्याच्या सुखाने सुखी होत असतो. ।।१६०।।

हे वीरांच्या राजा अर्जुना! तो पुरुषदयेची प्रत्यक्ष मूर्ती आहे असे समज व ती दया त्याच्या ठिकाणी उत्पन्न होताच मी त्यांचा ऋणी होतो. ।।१६२।।

२६ गुणांपैकी एक दया हा गुण. या दैवी गुणावर भाष्य करताना माऊलींनी किती सुंदर दृष्टान्त दिले आहेत! पाण्याच्या दृष्टान्ताने दयाळू माणसाचे चित्र उभे केले आहे. जीवन कसे पाण्यासारखे असावे. समोर खड्डा असेल तर पाणी, तो भरल्याशिवाय पुढे जाणार नाही. तसे दयावान मनुष्य समोर आलेल्या दुःखी माणसाचे दुःख दूर



ॐ

केल्याशिवाय स्वस्थ बसत नाही. पायाला काटा बोचला की ते दुःख अंतःकरणाला होते तसे हा पुरुष दुसऱ्याच्या दुःखाने दुःखी होतो. एकवेळ मनुष्य दुसऱ्याच्या दुःखाने दुःखी होईल पण दुसऱ्याच्या सुखाने सुख होणे यातच खरी कसोटी आहे. हे जर असे झाले तर तो मनुष्य म्हणजे प्रत्यक्ष दयेची मूर्ती आहे असे समजावे. संत रामदासांनी हाच भाव एका ओवीत सांगितला -

**दुसऱ्याचे दुःखे दुखावे । दुसऱ्याचे सुखे सुखावे ।**
**अवघेचि सुखी असावे । ऐसी वासना ।।**

सर्व संतांची हृदयाची भाषा एकच असते. अशी दयाळू वृत्ती जेव्हा निर्माण होते तेव्हा भगवंत स्वतः अशा दयाळू माणसाचा ऋणी असतो.

**दिनांक १, २ व ३ ऑगस्ट**

**तरी विश्व हा अनादि ठावो । येथ नियंता[1] ईश्वररावो ।**
**चावडिये न्यावो[2] अन्यावो[3] । निवडी वेदु ।।२९५।।**
**वेदी अन्यायी पडे । तो निरयभोगे[4] दंडे ।**
**संन्यायी तो सुखाडे[5] । स्वर्गी जिये ।।२९६।।**
**ऐसी हे विश्वव्यवस्था । अनादि जे पार्था ।**
**इयेते म्हणती ते वृथा[6] । अवघेचि हे ।।२९७।।**

*१) चालक, सूत्रधार २) न्याय ३) अन्याय ४) नरकभोग ५) सुखाने ६) थोतांड, खोटे*

**अर्थ** - तर विश्व हे ठिकाण अनादि कालापासून चालत आले आहे व याचे नियमन करणारा सर्वेसर्वा सूत्रधार तो ईश्वर आहे व न्याय आणि अन्याय यांचा निवाडा वेद चावडीवर (उघडपणे) करतात. ।।२९५।।

वेदांच्या दृष्टीने जो अन्यायी ठरतो तो नरकभोगाची शिक्षा भोगतो व वेदांच्या दृष्टीने जो न्यायी ठरतो तो सुखाने स्वर्गात राहतो. ।।२९६।।

अर्जुना! अशी जी ही जगातील व्यवस्था पुरातन कालापासून चालत आलेली आहे तिला ते (असुर लोक) थोतांड आहे असे समजतात. ।।२९७।।

भोगविषयात रमलेले अनीश्वरवादी असुर लोक केवळ भौतिक सुखाचाच विचार करतात. जोपर्यंत देह आहे तोपर्यंत काहीही करून भोग प्राप्त करावेत. उद्याचे कोणी पाहिले आहे. "यावज्जिवेत सुखं जीवेत्" अशी चार्वाकभोगवृत्ती बाळगून पापपुण्याचा कसलाच विचार करावयाचा नाही. उलट या जगाचा कोणीही सूत्रधार नाही. मृत्यूनंतर स्वर्ग व नरक हे अस्तित्वातच नाही; एकदा देहाची राखरांगोळी झाली की, सारे संपले. म्हणून ईश्वर, पाप-पुण्य, पुनर्जन्म, कर्मानुसार मिळणारी गती या सर्व कल्पना कोणत्याही पुराव्यावर अधिष्ठित नसल्यामुळे हे सर्व केवळ थोतांड आहे, अशी या असुरी लोकांची विचारसरणी असते.

**दिनांक ४ ऑगस्ट**

**तैसा कामादिकी तिघी । सांडिला सुख पावोनि जगी ।**
**संगु लाहे[1] मोक्षमार्गी । सज्जनांचा ।।४४०।।**

*१) लाभे, पावतो*

ॐ

अर्थ - त्याप्रमाणे कामादिक तिघांनी जो (पुरुष) टाकलेला आहे, तो जगामध्ये सुख पावून, त्यास मोक्षमार्गात सज्जनांचा संग मिळतो.

काम, क्रोध, लोभ ही नरकाची तीन द्वारे आहेत. हे तिन्ही जोपर्यंत अंतःकरणात आहेत तोपर्यंत कालत्रयी प्रगती व सुख मिळणार नाही. उलट या तिन्हीमुळे आत्मनाश मात्र निश्चित आहे असे समजावे. या तिन्हीपासून जो मुक्त होतो, तो मनुष्य आत्मकल्याणाचे साधन करतो व श्रेष्ठ गतीस पोहोचतो. असुरी दुर्गुणांमध्ये सर्वांत नाशकारक असे हे तीन दुर्गुण आहेत.

**दिनांक ५, ६ व ७ ऑगस्ट**

**शास्त्र म्हणेल सांडावे । ते राज्यही तृण मानावे ।**
**जे घेववी तें न म्हणावे । विषही विरुद्ध ।।४६०।।**
**ऐसिया वेदैकनिष्ठा । जालिया जरी सुभटा ।**
**तरी के[१] आहे अनिष्टा । भेटणे गा ।।४६१।।**
**पैं अहितापासुनि[२] काढिती । हित देऊनी वाढविती ।**
**नाही श्रुतीपरौती[३] । माऊली जगा ।।४६२।।**

*१) कोठे २) नाश होण्यापासून ३) वेदांसारखे*

अर्थ - शास्त्र जे टाकावे म्हणून म्हणेल, ते जर राज्य असले, तरी ते गवताच्या काडीप्रमाणे समजावे व शास्त्र जे घ्यावे म्हणून सांगेल, ते जरी विष असले तरी ते प्रतिकूल समजू नये. ।।४६०।।

अर्जुना! याप्रमाणे केवळ वेदाच्या ठिकाणी जर एकनिष्ठ झाले तर अकल्याणाची गाठ कोठून पडणार? ।।४६१।।

अकल्याणापासून काढणारी व हित देऊन वाढविणारी अशी श्रुतीशिवाय दुसरी कोणी माऊली जगात नाही. ।।४६२।।

श्री ज्ञानेश्वरांनी आदिशंकराचार्य, वेद, उपनिषदे, महाभारत अशा सर्वांना वाट विचारूनच आपल्या धर्मकीर्तनाची मुहूर्तमेढ रचली. सर्वांना सुलभपणे आचरता येईल असा धर्म समाजाला दिला. नैतिक मूल्यावर आधारलेली भक्ती त्यांनी समाजाला दिली. यज्ञयाग, व्रत-वैकल्ये इत्यादींचा निषेध करून स्वधर्म हाच यज्ञ आहे असे ठामपणे प्रतिपादले. ज्ञानापासून शतकानुशतके वंचित असलेल्या बहुजन समाजाला मायमराठीतून गीतेचे तत्त्वज्ञान सांगितले. हे सर्व करताना श्री ज्ञानेश्वरांनी कोठेही वैदिक तत्त्वज्ञानाला फाटा दिला नाही. वेद ही आपली माऊली आहे असे या जगाच्या माऊलीने म्हटले आहे. वेद हे कृपण आहेत व ते तीन वर्णांच्याच कानी लागले, अशी त्यांनी उणीवही बोलून दाखविली. तरी त्यांची वेदांवरील श्रद्धा तसूभरही कमी झाली नाही. ज्याला स्वतःचे हित साधावयाचे असेल त्याने वेदांच्या आज्ञा पाळाव्या. शास्त्र जर सांगत असेल तर राज्यही गवताच्या काडीप्रमाणे सोडून द्यावे. कारण ही वेदमाता अकल्याणांपासून वाचविणारी व श्रेयमार्ग दाखविणारी आपली माता आहे असे श्री ज्ञानेश्वर म्हणतात.

सोळाव्या अध्यायाच्या शेवटच्या २४ व्या श्लोकांवरील, माऊलींचे हे निरूपण आहे. अर्जुनाने या श्रुतीवचनानुसारच धर्माचरण करावे अशी भगवंताची इच्छा आहे.

**।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।**



ॐ

# अध्याय १७
# श्रद्धात्रयविभागयोग

**८ व ९ ऑगस्ट**

सतरावा अध्याय मनुष्याच्या अत्यंत जिव्हाळ्याच्या मूलभूत अशा स्वभाववैशिष्ट्यांचे दर्शन घडविणारा अध्याय आहे. श्रद्धा हा संपूर्ण जीवन व्यापून टाकणारा विषय आहे. श्रद्धावान पुरुषाचे जीवन सात्त्विक, भावमय, रसमय असते. श्रद्धाविहीन मनुष्य पशूसमान असतो. श्रद्धावान मनुष्यालाच ज्ञानप्राप्ती होते, हे भगवंतांनी आधीच सांगितले आहे. अश्रद्ध, अज्ञ व संशयात्मा नाश पावतो. त्याला ऐहिक व पारलौकिक या दोन्हीही ठिकाणी दुःखाशिवाय काहीही मिळत नाही. श्री आदिशंकराचार्यांच्या मते श्रद्धा म्हणजे शास्त्रवचन आणि गुरुवचन यावरील अविचल निष्ठा! म्हणून या श्रद्धेचे स्वरूप सांगण्यासाठी या अध्यायाची मांडणी झाली आहे. श्रद्धा म्हणजे स्वतःवरचा विश्वास तसेच प्रत्येक आत्म्याच्या ठिकाणी वसत असलेल्या अनंत शक्तीवरचा विश्वास. एखादा मनुष्य महान बनतो व दुसरा कोणी सामान्य, दुबळा राहतो याला कारण त्याची श्रद्धाच असते. श्रद्धेच्या बळावर पंगुसुद्धा पर्वत चढू शकतो. आंधळासुद्धा डोळसांना लाजवील असे प्रचंड कार्य करू शकतो. श्रद्धाच माणसाला त्याच्या ध्येयाप्रत नेते. ज्याची जशी श्रद्धा तसा तो घडतो. म्हणून या अध्यायात अर्जुनाने एक मार्मिक प्रश्न विचारला आहे.. तो असा - "शास्त्रविधी न जाणता जो केवळ श्रद्धापूर्वक भगवंताला पूजतो त्यांची निष्ठा कोणत्या प्रकारची असते?" या प्रश्नाचे भगवंतांनी दिलेले उत्तर म्हणजे हा सतरावा अध्याय. यातील निवडक ओव्या अशा -

**म्हणोनि श्रद्धा स्वाभाविक । असे पैं त्रिगुणात्मक ।**
**रजतमसात्त्विक । भेदी इही ।।६७।।**
**जैसे जीवनचि उदक[१] । परी विषी[२] होय मारक ।**
**का मिरयामाजी[३] तीख[४] । उंसी गोड ।।६८।।**

*१) पाणी २) विषामध्ये ३) मिऱ्यांमध्ये ४) तिखट*

अर्थ - म्हणून स्वाभाविक रीतीने राजस, तामस व सात्त्विक या (प्राण्यांच्या) तीन प्रकारांमुळे श्रद्धाही तीन गुणांच्या रूपाची बनली आहे. ।।६७।।

ज्याप्रमाणे पाणी हे स्वभावतः जगविणारेच आहे. परंतु विषाशी युक्त झाले असता मारक होते अथवा मिऱ्याशी युक्त झाले असता तिखट होते व उसाशी युक्त झाले असता गोड होते. ।।६८।।

प्राण्यांची श्रद्धा ही निसर्गतःच सात्त्विक, राजस व तामस या तीन प्रकारची असते. हे तिन्ही जरी मनुष्यात असले तरी जो गुण जेवढ्या प्रमाणात अधिक तेवढे त्याचे ते गुण अधिक. एक गुण वाढला की दुसरे दोन गुण निष्प्रभ होतात. रावण रजोगुणी होता तर कुंभकर्ण तामसी व बिभीषण हा सत्त्वगुणी होता. एकाच कुटुंबातील तीन सख्खे भाऊ अशा तीन गुणांचे होऊ शकतात. प्रत्येकाची श्रद्धा ज्याच्या त्याच्या सत्त्वादि संस्कारांप्रमाणे असते. ज्याची जशी श्रद्धा असते तसा तो असतो. सात्त्विक श्रद्धा त्याला सत्कर्मांकडे प्रवृत्त करते. राजसिक वृत्ती माणसाला सतत कर्मप्रवृत्त करते तर तामसिक मनुष्य निद्रा, प्रमाद, आळस, लोभ अशा प्रवृत्तींनी घेरलेला असतो. सात्त्विक देवांची पूजा करतात तर राजसिक यक्ष-राक्षसांची तर तामसिक प्रेते व भूते यांची उपासना करतात. म्हणून माऊलींनी पाण्याचा सुंदर दृष्टान्त देऊन हे समजावले आहे. ज्याप्रमाणे पाणी हे स्वभावतः जगविणारे असले तरी विषाने युक्त

ॐ

झाले असता घातक होते, मिऱ्यांशी युक्त झाले असता तिखट होते व उसाशी युक्त झाले की गोड होते. त्याप्रमाणे ज्याच्यामध्ये जो गुण अधिक प्रमाणात असतो त्याप्रमाणे तो बनतो. हे सर्व जग त्या प्रकारच्या श्रद्धांनी बनलेले आहे. म्हणून माणसेही अशी वेगवेगळी वागतात.

### दिनांक १० ऑगस्ट

सकल[1] तीर्थांचिये धुरे[2] । जिये का मातापितरे ।
तया सेवेसी कीर[3] शरीरे । लोण[4] कीजे[4] ।।२०७।।

*१) सर्व २) श्रेष्ठ, प्रमुख ३) खरोखर ४) ओवाळून टाकावे*

अर्थ - सर्व तीर्थांमध्ये श्रेष्ठ जे आईबाप त्यांच्या सेवेवरून शरीराला खरोखर ओवाळून टाकतो.

वरील ओवीमध्ये माऊली सात्त्विक यज्ञाचे वर्णन करीत आहेत. शास्त्रविधीला सोडून श्रद्धारहित व मंत्रहीन असा तामस यज्ञ असतो. पण देव, आई-वडील, गुरू यांचे पूजन व सरळता, शुद्धता हे सात्त्विक तप होय. सर्व तीर्थांमध्ये श्रेष्ठ असलेले जे आई-वडील त्यांच्या सेवेसाठी तो स्वतःचे शरीर खरोखर ओवाळून टाकतो. ज्ञानवान व दयावान गुरूची तो पूजा करतो. स्वधर्माचरण करून देहात्मकतेचा, अहंकाराचा त्याग करतो. सर्व भूतमात्रांमध्ये व सृष्टीमध्ये सर्वत्र भगवंताचा वास असल्याने सर्वत्र पूज्य भावनेने व आत्मौपम्य दृष्टीने पाहतो. तसा व्यवहारही करतो. हे त्याचे शारीरिक, मानसिक तप असते.

### दिनांक ११, १२ व १३ ऑगस्ट

तरी सर्व मंत्रांचा राजा । तो प्रणवो[1] आदिवर्णु बुझा[2] ।
आणि तत्कारु जो दुजा । तिजा सत्कारु ।।३४२।।
एवं ॐतत्सदाकारु । ब्रह्मनाम हे त्रिप्रकारू ।
हे फूल तुरंबी[3] सुंदरु । उपनिषद ते ।।३४३।।
तैसे वेळे[4] कृत्य[5] पावे[5] । तेथीचा मंत्रुही[6] आठवे ।
परी व्यर्थ ते आघवे[7] । विनीयोगेवीण[8] ।।३५२।।

*१) ॐकार २) समजा ३) हुंगणे ४) योग्य वेळी ५) कर्म घडते ६) मंत्र (७) सर्व ८) योजनेशिवाय*

अर्थ - तरी त्या मंत्राचा राजा तो, ॐ ते त्या नांवातील पहिले अक्षर समजा आणि 'तत्' हे दुसरे अक्षर होय व तिसरे अक्षर 'सत्' हे होय. ।।३४२।।

याप्रमाणे 'ॐ तत् सत्' या रूपाने ब्रह्माचे हे नाम तीन प्रकारचे आहे. ह्या सुंदर फुलाचा उपनिषदांनी वास घेतला आहे. (उपनिषदांनी याचा चांगला विचार केला आहे.) ।।३४३।।

त्याप्रमाणे योग्य वेळी, योग्य कर्मे करण्याचा प्रसंग आला व त्या कर्मासंबंधाचा मंत्रही आठवला, परंतु ते सर्व विनियोगावाचून व्यर्थ आहे. ।।३५२।।

२३ व्या श्लोकावरील हे निरूपण आहे. "ॐ. तत् सत्" असा तीन प्रकारचा ब्रह्माचा नामनिर्देश उपनिषदांनी, वेदांनी सांगितला आहे. या नामाच्या योगाने पूर्वी प्रजापतीने ब्राह्मण, वेद आणि यज्ञ तयार केले. जे परब्रह्म आरंभरहित असून जगाचे उत्पत्तिस्थान व विश्रांतीस्थान आहे. त्याचे एक नाव या तीन प्रकारचे आहे. वास्तविक परब्रह्म नामरहित आहे पण अविज्ञान व अज्ञान यांनी भरलेल्या लोकांनी त्यास ओळखावे म्हणून त्या परब्रह्मास हे



ॐ

नाव दिले. या नामाची जी तीन अक्षरे आहेत ती कर्माच्या आरंभी, मध्ये व शेवटी या तीन ठिकाणी योजावी, म्हणजे ते कर्म यज्ञरूप बनून निर्विघ्नपणे पार पडते. यज्ञ, दान, तप यांच्या आरंभी हा प्रणवोच्चार केल्याने ती कर्मे त्याला मोक्ष सोपा करून देतात. सृष्टीच्या आरंभी ब्रह्मदेवांनी "ॐ तत् सत्" याचा जप केल्यावर त्याला सृष्टी निर्माण करण्याची शक्ती आली. म्हणून सर्व मंत्रांचा राजा म्हणून या मंत्राला गणले जाते. या मंत्राचे हे त्रिविधरूप आहे. या मंत्रासहित सात्त्विक कर्म केले असता ते सिद्धीस जाते. तेल, वात, अग्नी असले तरी दिवा लावता आला पाहिजे. त्याप्रमाणे योग्य वेळी योग्य कर्म करीत असता हा मंत्र आठवला पाहिजे.

### दिनांक १४, १५ व १६ ऑगस्ट

पाहे पा ॐ तत् सत् ऐसे । हे बोलणे तेथ नेतसे ।
जेथूनि का हे प्रकाशे । दृश्यजात[1] ।।४०१।।
उदयिला आकाशी । रवीची रवीते प्रकाशी ।
हे नामव्यक्ती तैसी । ब्रह्मा करी ।।४०४।।
म्हणौनि त्र्यक्षर[2] हे नाम । नव्हे जाण केवळ ब्रह्म ।
ययालागी कर्म । जे जे कीजे ।।४०५।।

*१) दिसणारे सर्व पदार्थ २) तीन अक्षरी*

अर्थ - हे पाहा, ज्याच्याकडून हे सर्व दृश्यमात्र प्रकाशिले जाते, त्या ठिकाणी "ॐ तत् सत्" हे बोलणे (हा नामोच्चार) नेते. ।।४०१।।

आकाशात उगवलेला सूर्यच जसा सूर्याला प्रकाशतो त्याप्रमाणे 'ॐ तत् सत्' या नामाचा उच्चार ब्रह्माला प्रकाशित करतो. ।।४०४।।

म्हणून हे तीन अक्षरी नाम, हे नाम नव्हे तर केवळ ब्रह्म आहे असे समज. एवढ्याकरिता जे जे कर्म करावे. ।।४०५।।

२६ व्या श्लोकावरील या ओव्या आहेत. या मंत्राचीच ही पुढील चर्चा आहे. ॐकाराचा उच्चार करून यज्ञ, दान, तप अशी सर्व कर्मे करावीत. कर्मबंधनांतून मुक्त होऊन मोक्षाचा मार्ग यामुळे सुकर होतो. जी वस्तू सर्वही जगापलीकडे आहे, जी एक वस्तू सर्वांचाही द्रष्टा आहे आणि जो सर्वांच्या पलीकडे आहे. ती वस्तू 'तत्' या शब्दाने सांगितली जाते. यज्ञादिक कर्माची फळे त्या 'तत्' स्वरूप ब्रह्माला अर्पण करावीत. 'इदं न मम' म्हणून कर्मे करूनसुद्धा मोकळे व्हायचे. ॐकाराने सुरू केलेले व तत् शब्दाच्या विनियोगाने जे ब्रह्माचे ठिकाणी अर्पण केले ते कर्म ब्रह्मरूपच होते. पण हे कर्म करणारा पुन्हा वेगळा राहतो. म्हणून हे द्वैत काढून टाकण्यासाठी 'सत्' शब्दाचा विनियोग करायचा आहे. हा 'सत्' शब्द आपल्या सत्पणाच्या सामर्थ्याने, ते कर्माचे असत्पण नाहीसे करतो. आकाश या नावाला आकाश हाच एक असा आधार आहे. त्याप्रमाणे 'ॐ तत् सत्' या नामाला व नामीला (ब्रह्माला) आश्रय अभेद आहे. आकाशात उगवलेला सूर्यच जसा सूर्याला प्रकाशतो त्याप्रमाणे 'ॐ तत् सत्' या नामाचा उच्चार ब्रह्माला प्रकाशित करतो. म्हणून हे तीन अक्षरी नाम हे नाम नव्हे तर केवळ ब्रह्मच आहे.

ॐ

दिनांक १७ ऑगस्ट

म्हणौनि ब्रह्मनाम श्रद्धा । सांडूनि की जे जो धांदा ।
हे असो शिणु[1] नुसधा[1] । दृष्टादृष्टी[2] तो ।।४२२।।

१) नुसता शीण २) इह व परलोकी

अर्थ - म्हणून ब्रह्मनामावरील श्रद्धा सोडून जो खटाटोप करावयाचा तो राहू दे. कारण तो इहपरलोकी नसता शीण आहे.

सतराव्या अध्यायाच्या शेवटच्या २८ व्या श्लोकावरील हे निरूपण आहे. अश्रद्धेने केलेले हवन, दिलेले दान, आचरलेले तप व केलेले कर्म जे असेल त्याला 'असत्' असे म्हणतात. मृत्यूनंतर त्याचे फळ मिळत नाही व या लोकीसुद्धा ते सर्व व्यर्थ आहे. श्रद्धा संपली की, दुराग्रह आला, संशय आला. अशा वेळी अश्रद्धेने कितीही मोठे दान केले, कठोर तपाचरण केले अथवा सत्कर्मे केली तरी ती खडकावर बीजे पेरल्यासारखी व्यर्थ आहे. २८ श्लोकांच्या या अध्यायावर माऊलींनी ४३३ ओव्यांतून निरूपण केले आहे. संपूर्ण अध्यायात श्रद्धेचे महत्त्व विशद केले आहे.

।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।



ॐ

## अध्याय १८
## मोक्षसंन्यासयोग

दिनांक १८ ऑगस्ट

अठराव्या अध्यायाविषयी श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतात की, हा अठरावा अध्याय नाही तर ही 'एकाध्यायी गीता'च आहे. संपूर्ण गीतेचे सार या अध्यायात सामावलेले असल्याने, केवळ या अध्यायाच्या अभ्यासाने, गीतेचे गुह्यतम रहस्य समजणे सोपे झाले आहे. गीतेतील कर्म, ज्ञान व भक्तियोग यांचा समन्वय, साधनेचे एकूण स्वरूप, जीव, जगत् व जगदीश्वर यांच्या निःसंदिग्ध संकल्पना, सिद्धीचे स्वरूप व फळ याविषयीचे समग्र ज्ञान या अध्यायात ओतप्रोत भरले आहे. सर्व विषयांची एकवाक्यता करून सर्वोच्च सिद्धान्त सांगणारा हा उपसंहारात्मक अध्याय आहे. अठरा रत्नांचा हार जसा एकाच दोरीत ओवावा, तसे या अध्यायात संपूर्ण गीतोपदेश गुंफले आहेत. संपूर्ण गीतेचे नवनीत असलेल्या या अध्यायात, अर्जुनाने स्पष्ट कबुली दिली की, आपला मोह, अज्ञान हे सर्व काही नष्ट झाले आहे. आता मी भगवंताचे कार्य करावयास तयार आहे. आता श्री माऊलींनी ज्ञानेश्वरीत हा अध्याय समजावण्यासाठी ७८ श्लोकांवर एकूण १८१० ओव्यांमधून निरूपण केले आहे. त्यातील निवडक ओव्या अशा -

अगा जया जे विहित[1] । ते ईश्वराचे मनोगत ।
म्हणौनि केलिया निभ्रांत[2] । सांपडेचि तो ।।९११।।

१) कर्तव्य २) निःसंशय

अर्थ - अरे अर्जुना! ज्याला जे उचित कर्म सांगितलेले आहे तेच त्याने करावे, असे ईश्वराचे मनोगत आहे. म्हणून ते विहित कर्म केले म्हणजे तो ईश्वर निःसंशय प्राप्त होतो.

"स्वे स्वे कर्मण्यभिरतः ...." या ४५ व्या श्लोकावरील हे निरूपण आहे. आपापल्या कर्मांमध्ये पूर्णपणे रत असलेल्या मनुष्याला वैराग्य प्राप्त होते. स्वकर्मरत मनुष्य मोक्ष प्राप्त करून घेतो. शास्त्राने संमत केलेले व वर्णाश्रमधर्माप्रमाणे वाट्याला आलेले विहित कर्म निष्ठेने करतो तो मोक्षधर्मास प्राप्त करतो. हे विहित कर्मच आपले सर्वस्व आहे व हे उत्तम तऱ्हेने पार पाडणे आपले धर्मकर्तव्य आहे अशी त्याची पक्की धारणा होते. ईश्वराच्या इच्छेनुसारच हे प्राप्त होते असे माऊली म्हणते.

दिनांक १९, २० व २१ ऑगस्ट

अगा जया जे विहित । ते ईश्वराचे मनोगत । म्हणौनि केलिया निभ्रांत... याच ओवीचा पुढचा भाग म्हणून, माऊलींनी ४६ व्या श्लोकावर हा विषय पूर्ण केला आहे. माऊली म्हणते -

तया सर्वात्मका ईश्वरा । स्वकर्मकुसुमांची[1]वीरा[1] ।
पूजा केली होय अपारा[2] । तोषालागी ।।९१७।।
म्हणौनि तिये पूजे । रिझलेनि[3] आत्मराजे ।
वैराग्यसिद्धी देईजे । पसाय[4] तया ।।९१८।।
जिये वैराग्यदशे । ईश्वराचेनि वेधवशे[5] ।
हे सर्वही नावडे । जैसे वांत[6] होय ।।९१९।।

१) स्वकर्मरूपी फुलांनी २) खूपच ३) संतुष्ट झाल्याने ४) प्रसाद ५) छंदाने ६) वमन, ओकारी

**अर्थ** - हे वीरा अर्जुना, त्या सर्वात्मक ईश्वराची स्वकर्मरूपी फुलांनी पूजा केली असता, ती पूजा त्याच्या अपार संतोषाला कारणीभूत होते. ।।९१७।।

म्हणून त्या पूजेने संतुष्ट झालेल्या आत्मराजाकडून त्याला वैराग्यसिद्धी हा प्रसाद दिला जातो. ।।९१८।।

त्या वैराग्यावस्थेमध्ये ईश्वराचा वेध लागल्याकारणाने हे सर्व (प्रपंच, स्वर्ग इ.) ओकलेल्या पदार्थाप्रमाणे आवडेनासे होते. ।।९१९।।

''स्वकर्मणा तमभ्यर्च्य'' हा खरा मंत्र आहे. स्वतःच्या कर्माने ईश्वराची पूजा करायची. आपली कर्मरूपी फुले ईश्वराला अर्पण करायची. कर्तृत्व व भोक्तृत्व भाव टाकून देऊन समर्पित भावनेने अर्पण केलेल्या या कर्मरूपी फुलांच्या पूजेने भगवंताला अतीव आनंद होतो. भगवंत अशा भक्ताला वैराग्यसिद्धी प्रदान करतो. या वैराग्यामुळे ईहलोकीचे ऐश्वर्य, प्रपंच एवढेच नव्हे तर स्वर्गादि कामनासुद्धा त्याला तुच्छ वाटतात. वमन केलेल्या पदार्थाप्रमाणे या सर्व भोगांचा त्याला उबग येतो. संसारातील जी लौकिक सुखे आहेत ती दुःखाप्रमाणे त्रासदायक वाटतात. त्यामुळेच ईश्वरप्राप्तीच्या वाटेवर त्याला योग्य ते ज्ञान प्राप्त होऊन, त्याची परमार्थात विलक्षण प्रगती होते. विहित कर्म ही ईश्वराचीच आज्ञा आहे असे मानून निष्ठेने तो हे कर्तव्यकर्म करतो व केलेले सर्व 'इदं न मम'' म्हणून भगवंताला अर्पण करतो. ईश्वराला आवडणारी हीच खरी पूजा.

### दिनांक २२ व २३ ऑगस्ट

**जाणे अजु[१] मी अजरु[२] । अक्षयो[३] मी अक्षरु[४] ।**
**अपूर्व[५] मी अपारु । आनंदु मी ।।११९३।।**
**ऐसे आत्मत्वे मज एकाते । इया अद्वभक्ती जाणोनि निरुते[६] ।**
**आणि याही बोधा जाणते । तेही मीचि जाणे ।।१२००।।**

*१) उत्पन्न न होणारा २) जरारहित ३) नाशरहित ४) अविनाशी ५) अनादि, ज्याच्या पूर्वी काही नाही असा ६) सत्यतेने*

**अर्थ** - तो असे जाणतो की, मी जन्मरहित आहे, वृद्धपणरहित आहे, मी नाशरहित आहे, मी न गळणारा आहे. मी अपूर्व आहे. मी अपार आहे व आनंद आहे. ।।११९३।।

याप्रमाणे मला एकाला या अद्वय भक्तीने आत्मत्वेकरून यथार्थपणे जाणतो आणि याही बोधाला जाणणारा तोही मीच आहे असे तो जाणतो. ।।१२००।।

गीतेतील ५५ व्या श्लोकावर माऊलींनी ११५ ओव्यांतून निरूपण केले आहे. ज्ञानभक्तीच्या योगाने भक्त ईश्वराला जाणतो. तो कसा आहे? तो कोण आहे व केवढा आहे हे तत्त्वतः जाणतो. हे तत्त्वतः जाणल्यानंतर तो भगवंतरूप होतो. भगवंताच्या स्वरूपाची विविध रूपे माऊलींनी वर्णन केली आहेत. असा भक्त अद्वैत भक्तीने व आत्मत्वाने भगवंताला जाणतो. ईश्वर जन्मरहित, वृद्धपणरहित, नाशरहित, अपूर्व, अपार व आनंदी आहे. तो अच्युत आहे, अंतरहित, द्वैतरहित, सर्वांच्या आरंभीचा, निराकार व साकार आहे. नियम्यही तोच नियामकही तोच. आरंभरहित, अमर, भयरहित, सर्वांचा आश्रय व आश्रित तोच आहे. तो स्वतःसिद्ध, अखंड, सर्वव्यापी व सर्वांच्या पलीकडचा आहे. तोच नवा व जुना, शून्य व संपूर्ण, मोठे व सूक्ष्म, क्रियारहित, संगरहित व शोकरहित आहे. तोच व्याप्त व व्यापक आहे. रूपरहित, कुळरहित, सारखा व स्वतंत्र, सर्वांहून पलीकडचे जे ब्रह्म ते तो आहे. या अद्वय भक्तीने तो यथार्थपणे त्या भगवंताला जाणतो. वरील ओव्यांमधून भगवंताच्या स्वरूपाचे किती रोचक वर्णन केले आहे! त्या आपल्या अद्वयपणाला जाणणारे जे ज्ञान, ते ज्ञान ईश्वररूप आहे असे भगवंत म्हणतात.





### दिनांक २४ व २५ ऑगस्ट

**स्वकर्माचा चोखौळी[१] । मज पूजा करुनि भली ।**
**तेणे प्रसादे आकाळी । ज्ञाननिष्ठेते ।।१२४७।।**
**ते ज्ञाननिष्ठा जेथ हातवसे[२] । तेथे भक्ति माझी उल्लासे ।**
**तिया[३] मजसी समरसे[४] । सुखिया होय ।।१२४८।।**

*१) चोख पुष्पांनी २) हस्तगत होते ३) त्या भक्तीने ४) ऐक्य पावतो*

**अर्थ** - स्वकर्मरूप पवित्र फुलांनी माझी चांगली पूजा करून त्या (माझ्या) प्रसादाने ज्ञाननिष्ठा प्राप्त करून घेतो. ।।१२४७।।

तो ज्ञानमार्ग जेव्हा हस्तगत होतो तेव्हा माझी भक्ती प्रकट होते व त्या भक्तीच्या योगाने माझ्याशी एकरस होऊन सुखी होतो. ।।१२४८।।

या दोन ओव्या अनेक दृष्टींनी खूप महत्त्वाच्या आहेत. स्वधर्म, स्वकर्म, विहित कर्म यांचा माऊलींनी पुनःपुन्हा विचार केला आहे. आपल्या कर्मरूपी फुलांनी भगवंताची पूजा केली असता, भगवंतच बुद्धियोग प्रदान करतो. भगवंतावर निरतिशय, अनन्य व प्रीतिपूर्वक प्रेम करणारे या ज्ञानास पात्र होतात. अशांना भगवंत आपल्यापासून दूर ठेवीत नाही. जो बुद्धीने, वाचेने व शरीराने भगवंताचा आश्रय करून राहतो, त्याने चुकून निषिद्ध कर्मे जरी केली तरी त्याचा पुण्यमार्ग त्यामुळे ढळत नाही. भगवंताचे यथार्थ ज्ञान झाल्यावर पाप-पुण्याची तशी ऐक्यस्थिती होत असते. म्हणून भक्तीत ज्ञानाची आवश्यकता आहे. ज्ञान व भक्ती हे दोन डोळे आहेत. ज्ञानाची उपासना करणे हे काहीजणांना कष्टाचे वाटते. ज्ञानमार्ग हा आम्हा सामान्यांसाठी नाही हे गृहीत धरून परमार्थाची वाटचाल करणाऱ्यांना भगवंतांनी येथे दिलासा व आश्वासन दिले आहे. भगवंतावरील अनन्यप्रेमामुळेच हे ज्ञान प्राप्त होते. सततयुक्त असणाऱ्या भक्तांवर भगवंत कृपा करतो. भगवंताचा अपरोक्ष अनुभव आल्यावर त्याची सर्व कर्मे नाहीशी होऊन तो मोक्षाच्या पदावर बसतो. असे पद प्राप्त झाल्यावर त्याला परमात्मसुखाची प्राप्ती होते. अखंड प्रसन्नता व अवीट आत्मसुख प्राप्त झाल्यावर बाकी काहीही प्राप्त करावयाचे राहत नाही.

### दिनांक २६, २७ व २८ ऑगस्ट

**तैसा मी एकवांचूनि काही । मग भिन्नाभिन्न आन नाही ।**
**सोऽहंबोधे[१] तयाचा[२] ठायी । अनन्यु होय ।।१३९७।।**
**पै आपुलेनि भेदेविण । माझे जाणिजे जे एकपण ।**
**तयांचि नाव शरण । मज येणे गा ।।१३९८।।**
**म्हणौनि घटाचेनि नाशे । गगनी[३] गगन प्रवेशे[३] ।**
**मज शरण येणे तैसे । ऐक्य करी ।।१३९९।।**

*१) तोच मी आहे या जाणिवेने २) त्या माझ्या ठिकाणी ३) घटाकाश आकाशात मिळते*

**अर्थ** - त्याप्रमाणे मग मी एकट्यावाचून दुसरे भिन्न भिन्न काहीच नाही (असे जे माझे स्वरूप) त्याच्या ठिकाणी 'तोच मी आहे' अशा ज्ञानाने अनन्य हो. ।।१३९७।।

अर्जुना, आपल्याला माझ्याहून भिन्न न मानता जे माझे एकपण जाणावयाचे, त्याचेच नाव मला शरण येणे होय. ।।१३९८।।

म्हणून (ज्याप्रमाणे) घट फुटल्याने घटाकाश जसे महाकाशात ऐक्याने प्रवेश करते, अशा ऐक्याने मला शरण ये. ।।१३९९।।

"सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज" ... या ६६ व्या महान श्लोकावर माऊलींनी निरूपण करताना आपले हृदय ओतले आहे. सर्वधर्माचा त्याग करून मला एकट्यालाच अद्वैत भावाने शरण ये. म्हणजे मी तुला सर्व पापांपासून मुक्त करीन. तू शोक करू नकोस. हे भगवंतांचे वचन आहे. श्री ज्ञानेश्वरांनी या शरणागतीचा अर्थ सांगताना समर्पक दृष्टान्तांचा मुक्त वापर केला आहे. शरणागत होण्यासाठी पहिली गोष्ट ही की, मी व भगवंत यात कोणताही भेदाभेद नाही. मी त्याचा अंश आहे. त्याचा पुत्र आहे, म्हणून ते अमृततत्त्व माझ्यातही आहे. माझे मूळ स्वरूप तेच असल्यामुळे मी व भगवंत वेगळा नाहीच. अशी ऐक्य दृष्टी जेव्हा येते तेव्हा त्याला शरण येणे म्हणतात. माझ्याहून भिन्न न मानणे हीच शरणावस्था व हीच सहजभक्ती असे भगवंतांचे सांगणे आहे. मद्रूप होऊन माझी सेवा, भक्ती करणे हीच खरी ऐक्य भक्ती. घट फुटल्यानंतर घटाकाश महाकाशात जसे एकरूप होऊन जाते तसे मनुष्याचा देह निघून गेल्यानंतर आत्मा परमात्म्याशी विलीन होतो. वास्तविक तो वेगळा नाहीच. उपाधीमुळे मात्र आपण वेगळा मानतो. सोन्याचा मणी जसा सोन्याला शरण येतो, किंवा लाट जशी समुद्राशी ऐक्य पावते तशा अभिन्नत्वाने भगवंताशी एकरूप झाले पाहिजे. जीवदशा असेपर्यंत हे वेगळेपण भासते. पण जेव्हा जीव-शिवाचे ऐक्य होते तेव्हा जीवदशेचे बंधन राहत नाही. ताकातून लोणी काढल्यानंतर ते लोणी ताकात जसे मिसळत नाही, त्याप्रमाणे या अद्वैत भावाने भगवंताला शरण गेल्यावर धर्माधर्माचे बंधनही राहत नाही. भगवंतच अशा वेळी भक्ताच्या पाप-पुण्याची जबाबदारी घेतो.

**दिनांक २९ ऑगस्ट**

**हृदया हृदय येक जाले । ये हृदयीचे ते हृदयी घातले ।**
**द्वैत[१] न मोडता केले । आपणा ऐसे अर्जुन ।।१४२१।।**

*१) दोघांचे देह तसेच (वेगवेगळे) असताना*

**अर्थ** - तेव्हा आलिंगनाच्या वेळी देवाचे व अर्जुनाचे हृदय एक झाले, देवांनी आपल्या हृदयात असलेला बोध अर्जुनाच्या हृदयात घातला आणि देव व भक्त हे द्वैत न मोडता, देवांनी अर्जुनाला आपल्यासारखेच केले.

या अध्यायात श्रीकृष्ण व अर्जुन एकरूप झालेले दिसतात. देवांनी अर्जुनाला, सर्व धर्मांचा त्याग करून केवळ मला एकट्यालाच शरण ये म्हणजे मी तुला सर्व दोषांतून मुक्त करीन असे सांगितले. त्याप्रमाणे अर्जुन भगवंताला शरण आला आहे. दोघांत ऐक्य निर्माण झाले आहे. हा अर्जुन सर्व भक्तांचा राजा होता. भगवंतांनी त्याला आलिंगन दिले. त्याला सर्वस्व अर्पण करण्यासाठी देवाचे हे आलिंगन होते. या आलिंगनामुळे देवाच्या हृदयातील बोध अर्जुनाच्या हृदयात प्रकट झाला. देव व भक्त हे द्वैत न मोडता देवांनी अर्जुनाला आपल्यासारखे केले. एका दिव्याने जसा दुसरा दिवा लावावा व दोहोत कोणी कोणाला प्रकाश दिला हे जसे न समजावे तसे या दोघांत झाले.

**दिनांक ३० ऑगस्ट**

**वेदु संपन्नु होय ठाईं[१] । परी कृपणु[२] ऐसा आनु[३]नाही ।**
**जे कानी लागला तिहीं[४] । वर्णांचिये[४] ।।१४५७।।**

*१) आपल्या ठिकाणी २) कंजुष ३) दुसरा ४) ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तीन वर्णांच्या*





**अर्थ** - वेद मूळचाच संपन्न आहे. परंतु त्याच्यासारखा दुसरा कोणीच कृपण नाही. कारण की, तो (ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य) या तीन वर्णांच्याच कानाला लागला. (म्हणजे वेद हा तीन वर्णांनीच ऐकावा अशी आज्ञा आहे.)

श्री ज्ञानेश्वरांनी वेदांची खूप स्तुती केली आहे, पण येथे आपली स्पष्टोक्ती देताना वेदांना थोडे दूषणही दिले आहे. वेद हे तीन वर्णांसाठीच असल्याने ते कृपण आहेत असा आरोप माऊलींनी केला आहे. वेदांचे श्रेष्ठत्व त्यांना मान्य आहे. म्हणून "नाही श्रुतीपरौती । माऊली जगा ।" अशी प्रशंसाही केली आहे. माऊली वेदांना जगाची माऊली म्हणते. पण माऊली असूनसुद्धा आपल्या अपत्यांबद्दल थोडा दुजाभाव झाला अशी ही तक्रार आहे. श्री ज्ञानेश्वरांनी संपूर्ण जगासाठी पसायदान मागितले. अखिल विश्वाच्या कल्याणासाठी त्यांनी हे धर्मकीर्तन केले. आपल्या भक्तिपंथात त्यांनी जातिभेदास स्थान दिले नाही. सर्व जग एकाच बीजापासून निर्माण झाले आहे मग त्यात लहान-थोर, श्रेष्ठ-कनिष्ठ असा भेद कसा राहील? एकाच सुवर्णाच्या देहात, धाग्यात सर्व सोन्याचे मणी ओवलेले आहेत. एकाच ब्रह्मापासून हे जग निर्माण झाले आहे. सर्वच संतांनी या भेदा-भेदाला, स्पृश्य-अस्पृश्याला तिलांजली दिली आहे. "विष्णुमय जग । वैष्णवांचा धर्म । भेदाभेद भ्रम । अमंगल ।।" अशी संत तुकारामांच्या उक्तीप्रमाणे सर्वांची धारणा होती. म्हणून याच विशाल मानवतेच्या भावनेने माऊलींनी टीका केली आहे. ज्ञानेश्वरकालीन संतांच्या मांदियाळीमध्ये संत जनाबाई, नरहरी सोनार, गोरा कुंभार, सेना न्हावी, सावता माळी, चोखा महार असे सर्व थरातील संत होते. समाजाचे हे ऐक्य आजही पंढरीच्या वारीमध्ये व वारकऱ्यांमध्ये दिसते, पण वेदकाळात वेद हे तीन वर्णांच्याच कानी लागले ही व्यथा व आक्षेप माऊलींनी येथे प्रकट केला आहे.

**दिनांक ३१ ऑगस्ट व १ सप्टेंबर**

**ते हे मंत्ररहस्य गीता । मेळवी जो माझिया भक्ता ।**
**अनन्यजीवना[१] माता । बाळका जैसी ।।१५१२।।**
**तैसी भक्तां गीतेसी । भेटी करी जो आदरेसी ।**
**तो देहापाठी मजसी । येकचि होय ।।१५१३।।**

*१) मातेच्या स्तन्यावाचून अन्य जीविकेला साधन नाही अशा*

**अर्थ** - आईशिवाय ज्या बालकाला दुसरे जीवन नाही त्या बालकाची व आईची जशी गाठ घालून द्यावी त्याप्रमाणे गायत्री मंत्राचे रहस्य सांगणाऱ्या त्या गीतेची माझ्या भक्तांना ओळख करून देतो. ।।१५१२।।

त्याप्रमाणे भक्तांची गीतेशी जो प्रेमाने भेट करील, तो मृत्यूनंतर मलाच येऊन मिळेल. ।।१५१३।।

६८ व्या श्लोकावरील हे भाष्य आहे. आधी ६७ व्या श्लोकात भगवंतांनी स्पष्ट सांगितले की, गीतेचे तत्त्वज्ञान तपोहीन, भगवंताची निंदा करणाऱ्या, जो भक्त नाही अशाला व ज्याला ऐकण्याची इच्छा नाही अशा अश्रद्ध माणसाला कधीही सांगू नये. पण हे परमगुह्य ज्ञान आपल्या ठिकाणी पराकाष्ठेचे प्रेम ठेवून जो माझ्या भक्तांना सांगेल त्याला निश्चित परमगती प्राप्त होईल. देहपातानंतर तो भक्त मलाच येऊन मिळेल असे भगवंत म्हणतात. नव्हे, हे भगवंताचे आश्वासन आहे. जो भक्तजनांच्या समुदायामध्ये गीता सांगतो, तसा भक्त या सर्व पृथ्वीतलावावर मला दुसरा कोणी आवडता नाही. असा गीता सांगणारा भक्त जितका मला आवडतो, तितका निश्चयाने दुसरा कोणी नाही. या गीतारूपी संवादाचे जो अध्ययन करील तो ज्ञानरूपी यज्ञाने भगवंताचेच पूजन करतो. ६९ व ७० व्या श्लोकात भगवंतांनी हा निर्वाळा दिला आहे.

ॐ

### दिनांक २ सप्टेंबर

चंद्र तेथे चंद्रिका[1] । शंभु तेथे अंबिका[2] ।
संत तेथे विवेका । असणें कीं जे ।।१६३२।।

*१) चांदणे २) देवी पार्वती*

**अर्थ** - महाराज, चंद्र तेथे चांदणे असावयाचे. शिव तेथे शक्ती असावयाचीच व संत तेथे विवेक असायचाच.

गीतेच्या शेवटच्या ७८ व्या श्लोकावरील हे भाष्य आहे. जेथे योगेश्वर कृष्ण व जेथे धनुर्धर पार्थ असतील, तेथे श्री, विजय, ऐश्वर्य आणि अढळ नीती हे आहेतच, असे माझे निश्चित मत आहे, असे संजय या श्लोकात म्हणतो. यावर श्री ज्ञानेश विविध प्रकारचे दृष्टान्त देऊन हा विषय समजावतात. जेथे आयुष्य आहे तेथे जगणे आहेच. जेथे चंद्र आहे तेथे चांदणे असायचेच. जेथे शिव तेथे पार्वती त्याप्रमाणे जेथे संत तेथे सुविचार असायचाच. राजा तेथे सैन्य, प्रेम तेथे भावसंबंध, अग्नी तेथे ज्वलनाची शक्ती असावयाची. याचाच विस्तार करत ते म्हणतात, दया तेथे धर्म, धर्म तेथे सुखप्राप्ती आणि जेथे अवीट सुख तेथे परमात्मा पुरुषोत्तमाचा वास. वसंत तेथे झाडांना नवी पालवी येते. फुले फुलतात. भ्रमरांचे आगमन होते. गुरू तेथे ज्ञान, ज्ञान तेथे आत्मदर्शन आणि आत्मदर्शन तेथे सुख व समाधान राहते. सूर्य तेथे प्रकाश जसा असतो तसे हे अर्जुना, तुझ्या प्राप्तीमुळे मी सनाथ झालो आहे. तू ज्यांच्या बाजूने उभा राहशील तेथे विजय प्राप्त होईल. हे सर्व सांगून संजय धृतराष्ट्राला म्हणतो की, दोन्ही सैन्यांचे काय होईल हे मला माहीत नाही पण राजा, तू नीट विचार कर.

### दिनांक ३ सप्टेंबर

तैसा व्यासाचा मागोवा[1] घेतु । भाष्यकारातें वाट पुसतु[2] ।
अयोग्यही मी न पवतु[3] । के जाईन ।।१७२२।।

*१) मार्ग २) विचारून ३) पोचेन*

**अर्थ** - त्याप्रमाणे व्यासांचा माग घेत घेत व भाष्यकारांना वाट पुसत पुसत, मी अयोग्य असलो तरी तेथे (गीतार्थाच्या ठिकाणी) प्राप्त न होता कोठे जाईन?

मराठी भाषेत गीतेचा भावार्थ आपण का व कसा आणला याचे नम्र निवेदन माऊली करते आहे. श्रेष्ठांच्या पावलावर पाऊल ठेवून जे जातात त्यांना श्रेय मार्गच मिळतो. याप्रमाणे व्यासांचा माग घेत घेत, भाष्यकारांना वाट विचारीत विचारीत माझ्यासारखा अपात्रही एवढे मोठे काम करू शकलो. ज्ञानेश्वरांच्या पूर्वी, गीतेवर भाष्य करणारे श्री शंकराचार्य, रामानुजाचार्य असे काही भाष्यकार होऊन गेले. श्री ज्ञानेश्वरांनी हे विनम्रतेने जरी म्हटलेले असले तरी मराठीतील हे स्वतंत्र भाष्य आहे. संत, कवी, योगी व तत्त्वज्ञानी अशा चारी भूमिकांतून केलेले हे तत्त्वदर्शन आहे. श्रीगुरूंच्या कृपेने आपण हा ग्रंथ सांगत आहोत हे माऊलींनी आधीच अनेक वेळा सांगितले आहे.

### दिनांक ४ सप्टेंबर

किंबहुना तुमचे केले । धर्मकीर्तन हे सिद्धी गेले ।
येथ माझे जी उरले । पाईकपण[1] ।।१७९२।।

*१) सेवकत्व, चाकरपणा*



ॐ

**अर्थ** - महाराज, फार काय सांगावे! तुमच्या कृपेने केलेले हे धर्माचे व्याख्यान पूर्णत्वास आले. या ठिकाणी माझा काय तो सेवकपणाच उरला.

गीतेचा अर्थ सांगणे किती कठीण आहे याचे वर्णन माऊली करतात. साताही समुद्रांना अमृताने भरणे सोपे आहे. ताऱ्यांचे चंद्र करणे कठीण नाही. कल्पतरूंचे बगीचे लावणेसुद्धा कठीण नाही, परंतु गीतेच्या अर्थाचे मर्म स्पष्ट सांगता येणार नाही. हे काही लहानसहान काम नाही. पण हे कामसुद्धा, श्रीगुरूंच्या कृपेने आपण केले असे श्री ज्ञानदेव नम्रतेने म्हणतात. यामुळे माझ्या संपूर्ण जन्माचे फळ मला श्रीगुरूंनी प्राप्त करून दिले व सुखी केले असे प्रांजलपणे सांगतात. श्री ज्ञानेश्वरी हे धर्मकीर्तन आहे. धर्माच्या सर्व बाजूंचा विचार यात आला आहे. समाजाचे योग्य ते धारण करण्यासाठी व अज्ञानी जनांना धर्माच्या या विविध अंगांचा योग्य तो अर्थ सांगण्याचे युगप्रवर्तक काम, श्री ज्ञानेश्वरांनी केले. पण एवढे करूनही काहीही श्रेय न घेता, आपण फक्त सेवकपण निभावले असे माऊली म्हणते.

### दिनाक ५, ६, ७ व ८ सप्टेंबर

आता विश्वात्मके देवे । येणे वाग्यज्ञे[1] तोषावे ।
तोषोनि मज द्यावे । पसायदान[2] हे ।।१७९३।।
जे खळांची व्यंकटी[3] सांडो । तया सत्कर्मी रती[4] वाढो ।
भूता परस्परे पडो । मैत्र जीवाचे ।।१७९४।।
दुरितांचे तिमिर[5] जावो । विश्व स्वधर्मसूर्ये पाहो ।
जो जे वांछील[6] तो ते लाहो[7] । प्राणिजात ।।१७९५।।
येथ म्हणे श्रीविश्वेशरावो । हा होईल दानपसावो ।
येणे वरे ज्ञानदेवो । सुखिया जाला ।।१८०१।।

*१) ग्रंथरूप यज्ञाने २) प्रसाद ३) वक्रदृष्टी ४) बुद्धी, इच्छा, आवड ५) अंधार ६) इच्छा करील ७) प्राप्त होवो*

**अर्थ** - आता विश्वरूपी देवाने या वाग्यज्ञाने संतुष्ट व्हावे व संतुष्ट होऊन मला प्रसाद द्यावा तो असा ।।१७९३।।

खळांचा (दुष्टांचा) कुटिलपणा नाहीसा व्हावा आणि त्यांची सत्कर्माच्या ठिकाणी आवड वाढावी व मनुष्यांची एकमेकांशी जीवाभावापासून मैत्री व्हावी. ।।१७९४।।

पापाचा अंधार जावा व विश्वात स्वधर्मरूपी सूर्याचा उदय व्हावा. प्राणिमात्रात जो जे इच्छिल ते त्याला प्राप्त होवो. ।।१७९५।।

तेव्हा विश्वाचे प्रभुराय म्हणाले की, हा दानप्रसाद होईल. या वराने ज्ञानदेव अंतःकरणात सुखी झाले. ।।१८०१।।

१७९३ ते १८०१ या नऊ ओव्यांमध्ये माऊलींनी विश्वात्मक देवाकडे पसायदान मागितले आहे. जगाच्या कोणत्याही भाषेत अशी प्रार्थना नसेल. किती उदात्त भाव व्यक्त झाला आहे! जगाच्या कल्याणासाठी केलेली ही प्रार्थना, ही सर्व धर्मांसाठी एकच होऊ शकेल. एवढी ही मंगल प्रार्थना आहे. पसायदानावर एक स्वतंत्र पुस्तिका होऊ शकेल असे यातील शक्तिशाली विचार आहेत. श्री ज्ञानेशांनी स्वतःसाठी काहीच मागितले नाही. ''इदं न मम' म्हणून हे श्रेयही श्रीगुरूंना अर्पण केले आहे. या वाग्यज्ञाने संतुष्ट होऊन, मला हे विश्वकल्याणाचे प्रसादरूपी फळ द्यावे. संपूर्ण ज्ञानेश्वरीत जीव, जगत्, जगदीश्वर यांचाच विचार प्रकट झाला आहे. हा विचार जीवाच्या आत्मकल्याणासाठी मांडला आहे. नीती, चित्तशुद्धी, समता, बंधुभाव, प्रेम, भक्ती, सद्‌गुण या मूल्यांनी धर्मपरिवर्तनाचे व धर्मजागृतीचे केलेले हे कार्य अजोड आहे. हे पसायदान 'सर्वेऽत्र सुखिनः सन्तु' या प्राचीन वैदिक प्रार्थनेचे पुढचे रूप आहे. या पसायदानात संतस्तुती, गुरुसंवाद, विश्वदर्शन आहे. ''भूता परस्परे पडो मैत्र जीवाचे'' यात कल्याणकारक मंत्रजागरही

ॐ

आहे. ही विश्वात्मक देवाची प्रार्थना आहे. परमेश्वराच्या अवताराचे प्रयोजन ''विनाशायच दुष्कृतां'' असे चौथ्या अध्यायात सांगितले आहे. ज्ञानेश्वरांचा विचार याही पुढचा आहे. श्री ज्ञानदेव ''खळांची व्यंकटी सांडो'' असे मागणे मागतात. दुर्जनांचा दुष्टावा किंवा व्यंकटी निघून गेल्यानंतर खल हा सज्जन होईल अशी ज्ञानदेवांची धारणा आहे. म्हणून खलत्व जावे पण खलांना नष्ट करू नये असा त्यांचा मानवतावादी व्यापक दृष्टिकोन आहे. म्हणून ही प्रार्थना हे विश्वकल्याणाचे प्रार्थनागीत आहे. स्वधर्माचा महिमा त्यांनी संपूर्ण ज्ञानेश्वरीत पुनःपुन्हा गायिला आहे. हा स्वधर्मरूपी सूर्य उदय पावावा व पापाचा अंधार नष्ट व्हावा. जे जे उत्तम असेल ते ते प्रत्येकाला प्राप्त व्हावे व सर्वजण सुखी व्हावेत अशी आर्तता त्यांनी या प्रार्थनेत व्यक्त केली आहे. कृतज्ञतेने त्या जगन्नियंत्याची अखंड भक्ती करावी. सज्जनांची मांदियाळी परस्परांना भेटोत. ईश्वरनिष्ठांची भेट सर्वांना होवो. सर्व त्रैलोक्य आनंदाने भरून जावे अशी उदात्त इच्छा श्री ज्ञानेशांनी या पसायदानात व्यक्त केली आहे. शेवटी श्रीगुरू निवृत्तिनाथ म्हणाले की, हा दानप्रसाद होईल. या वराने श्री ज्ञानदेव अंतःकरणात सुखी झाले.

**दिनांक ९ सप्टेंबर**

तेथ महेशान्वयसंभूते[1] । श्रीनिवृत्तिनाथसुते[2] ।
केले ज्ञानदेवे गीते । देशीकार[4] लेणे[3] ।।१८०९।।

*१) श्री शंकराच्या परंपरेतील २) श्री निवृत्तिनाथांच्या शिष्याने, आदिनाथ परंपरासंभूत. ३) अलंकार ४) मराठी भाषा (अलंकार)*

अर्थ – तेथे आदिनाथ शंकर यांच्या परंपरेत उत्पन्न झालेला श्री निवृत्तिनाथशिष्य जो ज्ञानदेव, त्याने गीतेवर देशी भाषेचा (मराठी टीकेचा) अलंकार चढविला.

२५० निवडक ओव्यांतील ही शेवटची ओवी! पसायदान मागून झाल्यानंतर, श्री निवृत्तिनाथांनी ही विनंती मान्य केली आणि हा दानप्रसाद मिळाल्यावर श्री ज्ञानदेव सुखी झाले.

अठराव्या अध्यायाच्या शेवटी, या ग्रंथाच्या निर्मितीचे स्थळ व काळ यांचा उल्लेख आला आहे. या कलियुगात आणि महाराष्ट्र देशात गोदावरीच्या दक्षिण तीरावर एक पवित्र क्षेत्र आहे. या क्षेत्रात श्री मोहिनीराज यांचे स्थान आहे. येथील खांबाला टेकून संत श्रोत्यांपुढे श्री माऊलींनी आपल्या ग्रंथाचे निरूपण केले. त्या काळी यादववंशातील एक राजा रामदेवराय न्यायाने राज्य करीत होता. श्री ज्ञानेश्वरीच्या नऊ हजार ओव्यांतील केवळ एका ओवीत याचा उल्लेख आहे. हे पवित्र ठिकाण म्हणजे नेवासे! आदिनाथ शंकराच्या परंपरेत निर्माण झालेल्या निवृत्तिनाथांच्या या शिष्याने गीतेवर मराठी भाषेचा अलंकार चढविला. शके १२१२ मध्ये ज्ञानेश्वरीचे लेखन पूर्ण झाले आणि सच्चिदानंदबाबाने हा ग्रंथ पूज्य बुद्धीने लिहून घेतला असे ते सांगतात.

।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।

०-०-०-०-०-०



ॐ

## ।। श्री ज्ञानेश्वरांचा भक्तियोग ।।

पहिल्या खंडात, भक्तियोगावर (संपूर्ण १८ अध्यायांत) खूप ओव्या आल्या आहेत. या दुसऱ्या खंडात भक्ती, ज्ञान, कर्म व योग या चारही योगांवर विस्तृत विवेचन व महत्त्वाच्या ११५ ओव्यांचे निरूपण होणार आहे. पहिल्या खंडातील प्रत्येक योगावरील महत्त्वाच्या ओव्या संदर्भासाठी एकत्र देत आहे. सुरुवातीसच या ओव्यांचे केवळ अध्याय व ओवी क्रमांक दिल्यामुळे विषय समजणे अधिक सोपे जाईल.

या दुसऱ्या खंडात अध्यायानुसार ओव्या येणार नसून, या चारही योगांच्या विषयानुसार स्वतंत्रपणे, त्या एकत्र येतील. संपूर्ण ज्ञानेश्वरीचे साररूप तत्त्वज्ञान मांडण्याचा हा प्रयत्न आहे.

त्यातील भक्तियोगावरील ओव्या –

| अध्याय | ओवी क्रमांक | अध्याय | ओवी क्रमांक |
|---|---|---|---|
| १ | २ | १० | ७७ |
| २ | १२६ | १० | १०३, १३५ |
| ४ | ६६, ६७ | १० | ११७, ११८ |
| ६ | ८१ | १० | ३१७ |
| ७ | १९ | ११ | २३८ |
| ७ | ३२ | ११ | ४७१ |
| ७ | ६६, ६७ | १२ | १०४,१०५,१०६,१०९,११० |
| ७ | ९७, ९८, ९९, १००, | १२ | १२०, १२२, १२३, १२४ |
|  | १०१, १०२ | १२ | १५६ |
| ७ | १०९ | १२ | १९० ते १९६ |
| ८ | ७५, ७९, ८१, ८२ | १२ | २१३, २२५ |
| ८ | ११८ | १३ | ११०६, १११४, १११६ |
| ८ | १२६ | १४ | ११६, ११७, १२७ |
| ८ | २४८ | १४ | ३०२ |
| ९ | ५७, ५८, ६० | १४ | ३८५ ते ३८८ |
| ९ | २०६, २०७, २०८ | १५ | ४२१ ते ४२४ |
| ९ | ३०२ | १५ | ५६२ ते ५६६ |
| ९ | ३३६, ३३७ | १६ | १५८, १५९, १६०, १६२ |
| ९ | ४२८, ४२९ | १६ | २९५, २९६, २९७ |
| ९ | ३९५, ३९६ | १७ | ६७, ६८ |
| ९ | ४३६ | १७ | ३४२, ३४३ |
| ९ | ५१४, ५१५, ५१६ | १८ | ११९३, १२०० |
| ९ | ५१७, ५१८, ५१९ | १८ | १३९७, १३९८, १३९९ |

पहिल्या खंडात भक्तियोगावर साधारण १०३ ओव्या आल्या आहेत. भक्त, भगवंत, भक्ती, चेतना, चैतन्य, आत्मा, ईश्वर व त्याचे स्वरूप, भक्तांचे प्रकार, अनन्यभक्ती, श्रद्धा, ईश्वराचा ठावठिकाणा, पराभक्ती, भक्तीचा महिमा, चार प्रकारची भक्ती, सगुण-निर्गुण स्वरूप, या सर्वांच्या व्याख्या - असे भक्तियोगाचे अनेक पैलू या १०३ ओव्यांतून उलगडले आहेत.

यापुढील ओव्यांतून भक्तियोगाचे समग्र स्वरूप जाणण्याचा आपण प्रयत्न करणार आहोत.

**दिनांक १० सप्टेंबर**

**ज्ञानी इयेते स्वसंविती[1] । शैव[2] म्हणती शक्ति ।**
**आम्ही परमभक्ति[3] । आपुली म्हणो ।।१८.११३३।।**

*शब्दार्थ - १) आत्मज्ञानकला २) शिवोपासक ३) श्रेष्ठ भक्ती*

अर्थ - ज्ञानी हिला (चौथ्या भक्तीला) स्वसंवित्ती म्हणतात. शैव हिला शक्ती म्हणतात आणि आम्ही आपली 'श्रेष्ठ भक्ती' म्हणतो.

## श्री ज्ञानेशांची समन्वयवादी भूमिका

श्री ज्ञानेश्वरांनी अध्यात्मनिष्ठेला अग्रस्थान दिले आहे. या अध्यात्मविचारात त्यांनी मानवतावादाचा पुरस्कार केला आहे. हा मानवतावाद धार्मिक स्वरूपाचा असल्याने त्यांनी भक्तिमार्गावर संपूर्ण ज्ञानेश्वरीत भर दिला आहे. बुद्धीच्या स्थैर्यासाठी भक्तीशिवाय पर्याय नाही हे वारंवार त्यांनी सांगितले. स्थिर बुद्धी व अंतःकरण शुद्धी यासाठी नीतिमूल्यांचा आग्रह त्यांनी धरला.

माऊलींनी भक्ती ही स्वतंत्र जीवननिष्ठा मानली आहे. सर्वच मार्ग, वेदांतील तत्त्वज्ञानाला अनुसरून असल्याने त्यात भेद असण्याचे कारण नाही. हा त्यांचा आग्रह होता. जसे सूर्य उगवल्यावर अनेक मार्ग दिसतात पण सर्वच मार्गांनी कोणी जात नाही, एकच मार्ग निवडावा लागतो. तसे प्रत्येक व्यक्ती आपल्या प्रकृतिधर्मानुसार मार्ग निवडत असते. पण अज्ञान व दुराग्रह यामुळे आपलाच मार्ग सर्वश्रेष्ठ आहे, असा घोष ते करीत असतात. ज्ञानेश्वरांच्या काळात शैव-वैष्णव यांच्यातील मतभेद विकोपाला गेले होते. पंथापंथातील दरी वाढली होती. कनिष्ठ, क्षुद्र देव-देवतांच्या भजनी लागल्यामुळे, शुद्ध भक्तितत्त्वाचा विसर पडला होता. अशा कोलाहलात माऊलींनी समाजाला सर्वसमावेशक उदार, व्यापक असा समन्वयात्मक विचार दिला. म्हणून ''ज्ञानी जिला स्वसंवित्ती म्हणतात, शैव जिला शक्ती म्हणतात, तिलाच आम्ही परमभक्ती म्हणतो,'' असे त्यांनी निःसंदिग्धपणे प्रतिपादले. त्यांच्या दृष्टीने भक्ती हा साधनमार्ग तर आहेच पण ती ज्ञानोत्तरही विराम न पावणारी जीवननिष्ठा आहे.

अशा व्यापक भूमिकेने, माऊलींनी अद्वैताचा पुरस्कार केला. अभेद भक्तीच्या मंदिरात सेव्य-सेवक भाव उरत नाही. उपास्य व उपासक यांचे द्वैत राहत नाही. तरीसुद्धा अद्वैतात भक्ती आहे ही गोष्ट अनुभूतीने घेण्यासारखी आहे असे त्यांचे म्हणणे आहे. अद्वैतभक्ती, सहजभक्ती, अकृत्रिम भक्ती, ज्ञानी भक्ती असे एकाच अर्थाचे वेगवेगळे शब्द माऊलींनी यासाठी योजले आहेत. अमृतानुभवात यासाठी त्यांनी सुंदर दृष्टान्त दिला आहे. डोंगरावरील एका विशाल दगडामध्ये देव, देऊळ व त्यांचा परिवार असे सर्व कोरलेले असते. ती सर्व जशी एकत्वाने नांदतात तसा भक्तीचा सर्व व्यवहार का होऊ नये? असा त्यांचा प्रश्न आहे. साधनमार्ग म्हणून भक्तीच सर्वश्रेष्ठ आहे. म्हणून त्याचा स्वीकार राजापासून रंकापर्यंत व ब्राह्मणापासून अंत्यजापर्यंत सर्वांना सहजपणे करता येतो. पूर्वतयारीची व यम-नियमांची गरज नसतानासुद्धा, केवळ अंतरीची तळमळ ठेवून भक्तिमार्गात वाटचाल करता येते.





**दिनांक ११, १२ व १३ सप्टेंबर**

**कुणबट[1] कुळवाडी[2] । तैसा आन[3] आन[3] देव मांडी ।**
**आदिलाची परवडी[4] । वरी तया ।। १३.८११।।**
**ऐसा अखंड भजन करी । उगा नसे क्षणभरी ।**
**आघवेनि[5] गांवद्वारी । अहेव[6] जैसी ।। १३.८२१।।**
**तैसेनि जो गा भक्तु । सैरा[7] देखसी धांवतु ।**
**जाण अज्ञानाचा मूर्तु । अवतार तो ।। १३.८२२।।**

*शब्दार्थ - १) अज्ञानी २) शेतकरी ३) नव्या नव्या ४) प्रकार ५) सर्व प्रकारे ६) वेश्या ७) चोहोकडे*

अर्थ - अडाणी शेतकरी जसा नवीन नवीन उद्योग करतो, त्याप्रमाणे हा अज्ञानी पुरुष रोज नव्या नव्या देवाची स्थापना करतो व जेवढ्या उत्सुकतेने पहिल्याची पूजा करतो, तितक्याच जोराने पुन्हा दुसऱ्याचीही करतो. ।।१३.८११।।

वेशीत तंबू (पाल) ठोकून बसलेली वेश्या गावातील सर्व लोकांचेच कुटुंब असल्यामुळे, त्या सर्वांच्या योगाने अखंड सौभाग्यवतीच राहते, त्याचप्रमाणे जो, असतील तेवढ्या देवांची एकसारखी भक्ती करतो व क्षणभर रिकामा राहत नाही. ।।१३.८२१।।

त्याप्रमाणे जो भक्त मनाने वाटेल तसा धावणारा तू पाहशील, तो अज्ञानाचा मूर्तिमंत अवतार आहे, असे समज. ।।१३.८२२।।

## अज्ञानी भक्तीचे खंडन

श्री ज्ञानेश्वरांनी अज्ञानी समाजाला दिशा दाखविण्याचे क्रांतिकारी कार्य केले म्हणूनच आज ७०० वर्षांनंतरसुद्धा गावागावात ज्ञानेश्वरीचे पारायण होते आहे. सात शतके व याही पुढे, ज्या ज्ञानेश्वरीचे पूजन होते आहे, असा ग्रंथ जगात इतर कोणत्या भाषेत झाला असेल हे संभवत नाही.

श्री ज्ञानेशांच्या काळात धर्मक्षेत्र अज्ञानात बुडाले होते. कर्मकांडाची बजबजपुरी माजली होती. यज्ञकर्म व व्रत-नियमांनी अज्ञानी समाजाला घेरले होते. क्षुद्र देवदेवतांच्या पूजेला ऊत आला होता. बळी देऊन, नवस फेडणारे खोट्या समाधानात वावरत होते. दीक्षितांनी धर्माचा बाजार मांडला होता. अशा भरकटलेल्या समाजाला योग्य दिशा देण्याचे अलौकिक कार्य माऊलींनी केले. भागवत धर्माचा पाया त्यांनी घातला, म्हणून संत बहिणाबाईंनी सार्थ उद्गार काढले -

**संतकृपा झाली । इमारत फळा आली ।।**
**ज्ञानदेवे रचिला पाया । उभारिले देवालया ।।**

भागवत मंदिराची उभारणी, माऊलींनी समाजाला दिलेल्या या तात्त्विक बैठकीवर झाली आहे.

श्री ज्ञानेशांच्या मते भक्तीसाठी सर्वांत महत्त्वाची गोष्ट ही की, ज्याचे भजन करायचे त्या मुख्य ईश्वराचे स्वरूप काय? त्याचा पत्ता काय? त्या देवाला भक्तीत काय आवडते? तो काय मागतो? हे सर्व जाणल्याशिवाय जो अनिष्ट परंपरेने चालत आलेल्या चुकीच्या मार्गाने जातो त्याच्या पदरी भक्तीचे यथार्थ फळ पडत नाही. म्हणून भक्तीचे स्वरूप समजावण्यासाठी त्यांनी, त्या काळातील शबल सामाजिक व धार्मिक परिस्थिती व क्षुद्र देवतांच्या पूजनाच्या पद्धतीवर कडक शब्दांत निंदा केली आहे. वृक्षाच्या फांद्या, पाने, फुले यांना पाणी घालून काहीच उपयोग नसतो. ते सर्व जरी एकाच बीजाचे असले तरी पाणी मुळालाच घालावे लागते. रस जिभेनेच सेवता येतो. सुवास नाकानेच घ्यावा लागतो. तसे भगवंताला ओळखूनच भगवंताचे भजन करायचे असते.

ॐ

**रस तो मुखेचि सेवावा । परिमळ तो घ्राणेंचि घ्यावा।**
**तैसा मी तो यजावा । मीचि म्हणोनि ।।**

एवढ्या सोप्या शब्दांत भक्तीची सुलभ पद्धती त्यांनी सांगितली.

माऊलींनी तेराव्या अध्यायातील वरील तिन्ही ओव्यांतून अज्ञानी भक्तीवर कठोर प्रहार केले आहत. ८०९ ते ८२२ अशा ओव्यांतून त्यांनी याचा विस्तार केला आहे. सकाम भक्तीने याची सुरुवात झाली आहे. मनात कामना ठेवून, विषयप्राप्तीसाठी जे भक्ती करतात व फळ मिळाले नाही की, ईश्वराच्या अस्तित्वाविषयीच शंका घेऊन हे सर्व काही खोटे आहे असे म्हणून भजन सोडून देतात; त्यांची हेटाळणी केली आहे. रोज नव्या नव्या देवांची स्थापना करून, नव्या नव्या उमेदीने त्यांची पूजा केली जाते. ज्या गुरूंचा थाटमाट दिपवून टाकतो त्या गुरूच्या संप्रदायावर विश्वास ठेवून त्यांचा अनुग्रह घेतो. असा अज्ञानी पुरुष भूतमात्रांशी निर्दयपणाने वागतो, पण पाषाणाच्या मूर्तीवर मात्र भीतीने नम्र होतो. भगवंताची मूर्ती घराच्या कोपऱ्यात बसवितो व त्याचे दर्शन घेण्यासाठी दूर दूर तीर्थयात्रेला जातो. घरात त्या मुख्य देवतेची स्थापना केलेली असताना दुसऱ्या देव-देवतांची व्रते करतो. एकादशीच्या दिवशी प्रधान देवतेला जेवढा मान तेवढाच मान नागपंचमीच्या दिवशी नागाला देतो. चतुर्थीच्या दिवशी गणपतीचा उपासक होतो व त्याच दिवशी आई दुर्गे, मी तुझा भक्त आहे असे म्हणतो. नित्य-नैमित्तिक कर्मे टाकून नवरात्रातील देवीच्या अनुष्ठानाला बसतो व रविवारी बहिरोबाला नैवेद्य वाढतो. नंतर सोमवार आला की बेल घेऊन शिवलिंगाकडे धाव घेतो. याप्रमाणे एकटाच सर्व देवदेवतांची कशीबशी उपासना करतो. असा भक्त एकनिष्ठ नसल्यामुळे त्याची भक्ती स्थिर नसते. मनबुद्धी स्थिर नसते. अशा अज्ञानी भक्ताची अवस्था सांगण्यासाठी माऊलींनी गावाबाहेर राहणाऱ्या वेश्येचा दृष्टान्त दिला आहे. ती जशी व्यभिचारी, निष्ठाहीन व अखंड सौभाग्यवती असते तसा हा अज्ञानी भक्त असतील तेवढ्या देवांची एकसारखी भक्ती करतो व क्षणभर रिकामा राहत नाही. असा मनाने वाटेल तसा धावणारा व मी करतो आहे तीच खरी भक्ती, असा अट्टाहास करणारा भक्त हा अज्ञानाचा मूर्तिमंत अवतार आहे असे श्री ज्ञानेश्वर म्हणतात.

२१व्या शतकातील आजची परिस्थितीसुद्धा याहून काही वेगळी नाही. भक्तीचे मळे फुलले आहत, देवळे भक्तांनी खचाखच भरली आहेत. गावोगाव जत्रा भरताहेत व नैवेद्य म्हणून लाखो बकऱ्यांचे बळी दिले जात आहेत, शेंदूर फासलेल्या, झाडाखालील देवांची मनोभावे पूजा केली जाते, रोज देवतांची संख्या वाढते आहे. संप्रदाय, पंथ, मठ यांची संख्यासुद्धा त्याच प्रमाणात वाढत आहे. भक्तीपेक्षा इतर गोष्टींनाच त्यातून प्राधान्य दिले जात आहे. मठाधिपतींचे अहंकार, मठामठातील वादाला इंधन पुरवताहेत. भक्ता-भक्तातील द्वेष, ईर्ष्या यांना खतपाणी घातले जात आहे. संतांचे तत्त्वज्ञान व भक्तांचा दैनंदिन आचार यांतील अंतर वाढत आहे. त्यामुळे अज्ञानी भक्तीचा जोर आजसुद्धा तसाच आहे.

यासाठी श्री ज्ञानेश्वरांचा भक्तियोग समजून घेऊन तसे आचरण होणे हे पारमार्थिक कल्याणासाठी आवश्यक आहे. श्री ज्ञानेश्वर हे संतांचे संत असे संतशिरोमणी होते. त्यांनी दाखविलेली वाटच इतर संतांनी अनुसरिली म्हणून माऊलींचे तत्त्वज्ञान हे पायाभूत, तर्कशुद्ध, अनुभूतीपूर्ण व सिद्ध असे आहे.

**दिनांक १४ सप्टेंबर**

**यापरी[1] पापयोनीही अर्जुना । का वैश्य शूद्र अंगना[2] ।**
**माते[3] भजता सदना । माझिया येती ।। ९.४७४ ।।**

*शब्दार्थ - १) याप्रमाणे २) स्त्रिया ३) माझे*

**अर्थ** - याप्रमाणे अर्जुना, दुष्ट जातीत जन्म झालेले किंवा वैश्य, शूद्र अथवा स्त्रिया यांनी माझे भजन केले असता, ती सर्व माझ्या स्वरूपाला येऊन मिळतात.



ॐ

## सर्वांनाच भक्तीचा अधिकार

श्री ज्ञानेश्वरांच्या लोकोत्तर प्रतिभेत, त्यांची समन्वयशील व सर्वसंग्राहक मानवतावादी दृष्टी याची जोड मिळाल्यामुळे, त्यांनी प्रतिपादिलेल्या भक्तितत्त्वाला विश्वव्यापक स्वरूप प्राप्त झाले. समाजातील सर्व घटकांना एकत्र घेऊन जाण्याची त्यांची हातोटी विलक्षण होती. श्री ज्ञानेश म्हणजे मूर्तिमंत विधायकता! जगाच्या कल्याणासाठीच त्यांचा जन्म. जे जे पिडीत, दुःखीकष्टी, बहिष्कृत आहेत त्या सर्वांना जवळ करून त्यांना आनंद देणे हेच त्यांचे जीवितकार्य होते. त्यांनीच म्हटल्याप्रमाणे -

**तैसी बांधली सोडित । बुडाली काढीत ।**
**सांकडी फेडीत । आर्ताचिया ।।१६.२०१।।**
**किंबहुना दिवसराती । पुढिलांचे सुख उन्नती ।**
**आणित आणित स्वार्थी । प्रवेशिजे ।।१६.२०२।।**

**अर्थ** - त्याप्रमाणे अविद्येने बांधलेल्यास मुक्त करीत, संसारसागरात बुडालेल्यांना बाहेर काढीत व अध्यात्मादि दुःखांनी, पिडलेल्यांचे संकटांचे निवारण करीत. ।।१६.२०१।।

फार काय सांगावे! रात्रंदिवस दुसऱ्याचे सुख वाढवीत वाढवीत आत्महितात प्रवेश करणे. ।।१६.२०२।।

दैवीगुणसंपत्तीचे वर्णन करीत असताना माऊलींनी आपल्याच जीवितकार्याचेच वर्णन केले आहे. दलितोद्धार हे त्यांच्या कार्याचे प्रधान अंग होते. शूद्रातिशूद्रांनासुद्धा भक्तीचा तेवढाच अधिकार आहे जेवढा उच्चवर्णीयांना! भगवंताच्या दरबारात कोणी श्रेष्ठ-कनिष्ठ, लहान-थोर असा भेदाभेदच नाही. शतकानुशतके ज्या शूद्र वर्णीयांना हा अधिकार नाकारला होता, तो अधिकार श्री ज्ञानेशांनी अधिकारवाणीने त्यांना बहाल केला. धार्मिक क्षेत्रातील त्यांचे हे अजोड, अलौकिक कार्य आहे. परमार्थसिद्धी ही काही कोण्या विशिष्ट जाती-पंथांची मिरासदारी नाही. प्रापंचिकांनासुद्धा भक्तीच्या जोरावर ती प्राप्त करून घेता येते, हे माऊलींनी सांगितल्यामुळे सर्वसामान्यांच्या मनातील न्यूनगंड नाहीसा झाला. संस्कृत भाषा, वेदांचे ज्ञान व कर्मकांड येत नसले तरीसुद्धा भक्तीच्या जोरावर परमात्मप्राप्ती करून घेता येते हा विश्वास सर्वसामान्यांत त्यांनी निर्माण केला.

म्हणून वरील ओवीत त्यांनी स्पष्ट विवरण केले आहे की, वैश्य, शूद्र, स्त्रिया एवढेच नव्हे तर दुष्ट-पापयोनीत जन्मलेलेसुद्धा भक्तीच्या बळावर परमात्म स्वरूपाला पोहोचू शकतात.

**दिनांक १५ सप्टेंबर**

**हे त्रैलोक्यचि पुरुषोत्तमु । ऐसा साचु जयाचा मनोधर्मु ।**
**तया अस्तिकांचा आश्रमु । पांडवा गा ।। ८.१९३।।**
**जे संतोषिया वाढिले ताट । जे अचिंता[1] अनाथांचे मायपोट ।**
**भक्तीसी उजु वाट । जया गावा ।।८.१९५।।**

*शब्दार्थ - १) चिंतारहित*

**अर्थ** - हे त्रैलोक्यच पुरुषोत्तम आहे अशी ज्यांची पक्की समजूत आहे, त्या अस्तिकांचे, अर्जुना, जे (परमात्मस्वरूप) राहण्याचे ठिकाण आहे. ।।८.१९३।।

जे संतोषी पुरुषास वाढलेले ताट आहे, जे संसाराची चिंता न करणारे असून ज्यांना माझ्यावाचून दुसरा कोणी मालक नाही, अशा भक्तांचे मायपोट आहे आणि ज्या गावाला, पोहोचण्याला भक्ती हीच रसाळ वाट आहे. ।।८.१९५।।

ॐ

## श्री ज्ञानेशांचे विश्वव्यापक भक्तितत्त्व

श्री ज्ञानेश्वरांनी आपली भक्तिसंकल्पना संपूर्ण ज्ञानेश्वरीत विविध अंगांनी मांडली आहे. ही संकल्पना स्पष्ट करताना भक्तीची व्याख्या, भक्तीचे प्रकार, भक्तांचे प्रकार, श्रेष्ठ भक्तीचे गमक, भक्तीची महती, भगवंताला आवडणारी भक्ती, भक्तीची आवश्यकता... असे अनेक पैलू, विविध अंगांनी एवढ्या विस्तृतपणे व रसाळमय भाषेत केले आहेत की, ज्ञानेश्वरी हा ग्रंथ तत्त्वज्ञानाचा आहे की, भक्तितत्त्व निरूपणासाठी लिहिला आहे असा संभ्रम पडावा. सर्वांत जास्त ओव्या या भक्तिसंकल्पनेवरच आहेत.

वरील ओव्यांतून माऊलींनी, भक्तीने विश्वव्यापक तत्त्व मांडले आहे. ईश्वराचे दर्शन सर्व चराचरात घेतले पाहिजे. ज्ञानेशांच्या चिद्‌विलासतत्त्वाची हीच कल्पना आहे. भेदात अभेदत्वाचे दर्शन घेणे हीच भक्ती. प्रत्येकाच्या हृदयात ते ईश्वरतत्त्व आहे. प्रत्येक उपाधीत, चराचरात तो भरून उरला आहे. म्हणूनच भक्तियोगाची व्याख्या करताना, दहाव्या अध्यायात त्यांनी स्पष्ट केले की,

**जे जे भेटे भूत । ते ते मानिजे भगवंत ।**
**हा भक्तियोगु निश्चित । जाण माझा ।। १०.११८।।**

भूते ही निरनिराळी दिसत असली, त्यांनी शरीरे जरी भिन्न भिन्न दिसत असली तरी मन, बुद्धी, आत्मा एकच आहेत. सूर्याचे किरण जरी असंख्य असले तरी सूर्य एकच आहे, वृक्षाच्या फांद्या, पाने, फुले जरी वेगवेगळे असले तरी ते एकाच बीजातून जन्मलेले असतात. सागरावर अनेक लाटांचे दर्शन होत असले तरी सागर एकच असतो व पाणी आणि लाटा यांचे अभिन्नत्व असते. संपूर्ण विश्वात तो परमात्मा नाना रूपांनी नटला आहे. अशा भिन्न भिन्न आकारांतून, द्वैतातून त्याचे अभेद किंवा अद्वैत दर्शन घेणे हीच खरी भक्ती होय.

म्हणून हे त्रैलोक्यच पुरुषोत्तम आहे अशी ज्यांची पक्की धारणा झाली आहे अशा भक्तांना परमात्मा खूप दूर नाही. जे कायावाचामने परमात्म्यावाचून दुसरी गोष्टच ऐकत नाहीत व पाहत नाहीत त्या एकनिष्ठांना संसाराची चिंता करण्याचे काहीच कारण नाही. अशा भक्तांनी भक्तीची ही रसाळ वाट चोखाळल्यामुळे, त्यांच्या अंतिम कल्याणाचा, सुखाचा मार्ग त्यांना मिळालाच आहे. असा भक्त जगद्रूप बनून 'विश्व होऊनि विचरे । विश्वामाजी ।।' असा राहत असतो. सर्व चराचरात ईश्वराची अनुभूती घेणे हे भक्तीचे मर्म आहे. म्हणून विश्वात्मक देवाची कल्पना मांडली. अशा परमेश्वराची जवळीक साधायची असेल तर मन ईश्वरमय करून ईश्वराशी अद्वैत प्रस्थापित केले पाहिजे.

अशा ईश्वरस्वरूप मानवतावादावर माऊलींनी भक्तियोगाची व्याख्या आधारलेली आहे. सामाजिक उन्नयनासाठीसुद्धा या भक्तिमार्गाचा श्रेष्ठ साधन म्हणून उपयोग होऊ शकतो. समता, बंधुभाव, प्रेम या मूल्यांचा विकास या अद्वैतभक्ती स्वरूपात अभिप्रेत आहे.

अशी भक्तीची रसाळ वाट मनुष्याचे जीवन सर्वार्थाने कृतार्थ करू शकते.

**दिनांक १६ सप्टेंबर**

**क्षत्रियांचा आचारी । पांचवा गुणेंदु[1] अवधारी ।**
**चहूं पुरुषार्थां शिरीं । भक्ति जैसी ।। १८.८६७।।**

*शब्दार्थ - १) मुख्य गुण*



ॐ

**अर्थ** - अर्जुना, ऐक, धर्मार्थादि चार पुरुषार्थांपेक्षाही वरचढ अशी भक्ती ही एक पाचवी आहे, त्याप्रमाणे क्षत्रियांच्या आचारातील हा सर्वश्रेष्ठ असा पाचवा गुण आहे.

## पाचवा पुरुषार्थ - भक्ती

हिंदुधर्मशास्त्रात धर्म, अर्थ, काम, मोक्ष असे चार पुरुषार्थ मानले आहेत. ''धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरर्तभ।'' असे भगवान श्रीकृष्ण गीतेत म्हणतात. धर्माला अनुसरून असणारा कामसुद्धा भगवंताची विभूती आहे. चार पुरुषार्थांनी मोक्षाची प्राप्ती होते. पण श्री ज्ञानेश्वरांनी ही चतुर्विध पुरुषार्थाची संकल्पना अधिक संपन्न केली. त्यांनी भक्तीला पाचवा व श्रेष्ठ पुरुषार्थ म्हटले आहे. क्षत्रियांच्या आचारातील हा सर्वश्रेष्ठ असा पाचवा गुण आहे. भारतीयांचा धर्मविचार हा अध्यात्मावर आधारलेला आहे. ज्ञानेश्वर हे अध्यात्मवादी परंपरेतील एक युगप्रवर्तक तत्त्वज्ञ होते. त्यामुळे त्यांची भक्तिसंकल्पना हीसुद्धा अध्यात्मनिष्ठ आहे. दैवतोपासना, कर्माचरण, शास्त्राध्ययन हे सर्व काही आत्मज्ञानासाठीच असते. अध्यात्म दृष्टीचा जर अभाव असेल तर ही सर्व साधने फोल आहेत, असा माऊलींचा दृढ विचार होता. चारी पुरुषार्थांचा मान ठेवून, भक्तीला मात्र त्यांच्या मुकुटस्थानी बसविले. वै. सोनोपंत दांडेकरांसारख्या श्रेष्ठ भक्तांनीही 'ज्ञानेश्वरी हे भक्तिशास्त्र आहे,' असे म्हटले आहे. भक्तिमार्गाचे सर्वांगीण दर्शन हा ज्ञानेश्वरीचा गाभा आहे. श्री ज्ञानेशांना भक्तीचे केवळ कर्मकांडही नको होते व त्यातील भाबडेपणाही नको होता. वैदिक धर्माने सांगितलेल्या चारही पुरुषार्थांपेक्षा जीवनात भक्तीचा पाचवा पुरुषार्थ श्रेष्ठ आहे ही ज्ञानेशांची विचारसरणी वारकरी संप्रदायातील साऱ्या संत मंडळाला प्रेरक ठरली. त्या भक्तिभावनेला एका बाजूने कर्मयोगाचा तर दुसऱ्या बाजूने ज्ञानयोगाचा आधार देऊन ज्ञानदेवांनी भक्तिमार्गाची भक्कम पायावर उभारणी केली.

**दिनांक १७ सप्टेंबर**

**तैसे राज्यभोगसमृद्धि । उज्जीवन[1] नोहे[1] जीवबुद्धि ।**
**एथ जिव्हाळा[2] कृपानिधी । कारुण्य तुझें ।।२.६८।।**

*शब्दार्थ - १) या बुद्धीला उत्तेजन येत नाही २) जीवीचे रहस्य*

**अर्थ** - त्याचप्रमाणे या माझ्या मोहीत झालेल्या बुद्धीला राज्यभोगांची समृद्धी ही उत्तेजन देऊ शकणार नाही. या वेळी, कृपानिधे तुझी करुणाच माझा आधार आहे.

## भक्तिपंथात करुणेचे स्थान

अर्जुनाच्या मनात शोक, संभ्रम निर्माण झाला होता. हा शोक पृथ्वीचे राज्य जरी मिळाले तरी जाणार नाही असे अर्जुनाला वाटले. जसे आयुष्य संपत आले तर औषधाचा उपयोग होत नाही तेथे एका परमामृताचाच उपयोग होतो. त्याप्रमाणे मोहित झालेल्या बुद्धीला राज्यभोगांची समृद्धी ही परिणाम करणारी ठरत नसून इथे भगवंताची करुणाच आपला आधार आहे असे अर्जुनाला वाटले.

भगवंत करुणासागर आहे, दयाळू आहे, म्हणूनच तो भक्तांचा आधार आहे. भगवंताप्रमाणे संतदेखील करुणानिधी आहेत. 'बुडता हे जन न पाहवे डोळा । म्हणोनि कळवळा येत असे ।' अशी करुणा संत तुकारामांना आल्यामुळेच दुःखितांचे दुःख दूर करण्यासाठी त्यांनी जीवन खर्चिले. आर्तजनांना हृदयाशी धरून त्यांचे दुःख कमी करण्यासाठी माऊलींनी ही भक्तीची रसाळ वाट दुःखी जनांना दिली. याच करुणेपोटी 'आनंदाचे आवारु मांडू जगा' असे म्हणून अवघा संसार आनंदाने भरण्यासाठी हा अमृतरूपी भक्तिमार्ग जगाला दिला.

ॐ

भक्तिमार्गात करुणेचे स्थान अनन्यसाधारण आहे. जसा शोकाकुल अर्जुन भगवंताच्या कृपेची याचना करतो
तसा भक्तदेखील या भवसागरातून पार पडण्यासाठी भगवंताच्या करुणेला साद घालतो. तसे आपण सर्वजण अर्जुन
आहोत. सोळाव्या अध्यायात आत्म्याला माऊली म्हटले आहे. 'तेथ प्रियाची पैली सीमा । ते भेटे माऊली आत्मा ।।'
(१६.४४३) आत्मा म्हणजे भक्तांचे अनंत अपराध पोटात घालणारी जगन्माऊली आहे, अशी ज्ञानेश्वरांची श्रद्धा
होती. आपल्या लहानमोठ्या सर्व भक्तांवर परमेश्वर समदृष्टीने व वात्सल्याने मायेची पाखर घालतो. भक्तिपथात
परमेश्वर, गुरू व संत यांचा महिमा सारखाच आहे. स्वतःच्या दुःखावर मात करणे व दुसऱ्याच्या दुःखाबद्दल
सहानुभूती बाळगणे असे ज्ञानेश्वरप्रणीत भक्तीचे दुहेरी स्वरूप आहे. जसे पाणी समोरील खड्डा भरल्याशिवाय पुढे
जात नाही तसे समोरील माणसाचे दुःख दूर केल्याशिवाय दयावान पुरुष पुढे जात नाही. दुसऱ्याच्या दुःखाने दुःखी
होणे व दुसऱ्याच्या सुखाने सुखी होणे हा गुणच भक्ती पुष्ट करतो. हातून चुका झाल्या तरी पश्चात्तापदग्ध झालेल्याला
क्षमा करणे हेच भक्तीत अपेक्षित आहे. अंतःसामर्थ्य, दया, सहृदयता, करुणा, शांती यांचा मिलाफ ज्ञानेशांच्या
भक्तियोगात घडून आला आहे. म्हणूनच दुष्टांचे दुष्टपण, खलांचे खलत्व दूर होण्याची प्रार्थना माऊलींनी पसायदानात
केली आहे. खलांचा नाश, दुष्टांचा संहार व्हावा अशी मागणी नाही. हे फक्त करुणेमुळे! भक्तिसंप्रदायात पापकृत्याविषयी
तिरस्कार असला तरी पतिताबद्दल करुणा आहे. याच माणुसकीच्या भावनेत ज्ञानेश्वरांच्या भक्तिसंकल्पनेचे बळ
साठले आहे.

**दिनांक १८ सप्टेंबर**

**म्हणोनि सद्भाव जीवगत । बाहेरि दिसती फांकत ।**
**जे स्फटिकगृहींचे[१] डोलत । दीप जैसे ।। १३.४७५।।**

*शब्दार्थ - १) स्फटिकाच्या तावदानात*

**अर्थ -** म्हणून स्फटिकाच्या तावदानात ठेवलेले दिवे मंद मंद हालताना जसे बाहेरून दिसतात तशा अंतःकरणातील चांगल्या मनोवृत्ती बाहेर (इंद्रियांद्वारा) प्रकट झालेल्या दिसतात.

## भक्ती व नीती एकच

भक्तीत करुणेनंतर नीतीचे स्थान अजोड आहे. अंतःकरणशुद्धी हा परमार्थाचा पाया आहे. दैवीगुणसंपत्ती अंगी आणल्याशिवाय भक्ती मूळच धरू शकत नाही. सहा शास्त्रे, अठरा पुराणे, वेद इत्यादी सर्व धर्मशास्त्रे कोळून जरी प्याली किंवा प्रत्यक्ष सरस्वती जिभेवर नाचत जरी असली, तरी जोपर्यंत अंतःकरणात अहंकार, विषयविकार आहेत तोपर्यंत भक्तीचे कोणतेही फळ प्राप्त होत नाही. पंधराव्या अध्यायात भगवंत स्पष्ट करतात -

**तैसा चित्ती अहंते ठावो । आणि जीभे सकळशास्त्राचा सरावो ।**
**ऐसेनि कोडी एक जन्म जावो । परि न पविजे माते ।।**

**अर्थ -** चित्तामध्ये अहंकार, अभिमान यांना जागा दिली आहे आणि जिभेवर सर्व शास्त्रे नाचत असतील तरी अशा पुरुषास माझ्या स्वरूपाची प्राप्ती करून घेता यावयाची नाही.

एवढे हे स्पष्ट आहे. म्हणून ज्ञानेश्वरांनी आपल्या भक्तिसंकल्पनेत भावशुद्धीबरोबरच सत्त्वशुद्धीला सर्वोच्च स्थान दिले आहे. मनुष्य जेवढा चारित्र्यवान, नीतिवान तेवढा तो मोठा व बाकी भौतिक दृष्टीने कितीही मोठा असला व त्याला नीतीची बैठक नसेल तर तो क्षुद्रच. ज्ञानेश्वरीच्या नवव्या अध्यायात माऊली म्हणते -



ॐ

**जया भक्तीची येतुली प्राप्ती । जे कैवल्याते परौते सर म्हणती ।**
**जयाचिये लीलेमाजी नीति । जियाली दिसे ।। ९.१९२।।**

**अर्थ -** ज्यांना भक्तीची एवढी प्राप्ती झालेली असते की, ते मोक्षाला, "पलीकडे हो" असे म्हणतात. ज्यांच्या सहजकर्माचरणांमध्ये नीती जगलेली दिसते.

श्रेष्ठ भगवद्भक्ताचे हे वर्णन आहे. नीतिनियमांचे पालन करण्यासाठी या भक्तांना मुद्दाम प्रयत्न करावा लागत नाही, तर त्यांच्या सहज आचरणांमध्ये नैतिक अधिष्ठान भरून राहिलेले असते.

परमार्थात चित्तशुद्धीखेरीज तरुणोपाय नाही व चित्तशुद्धी आचार-विचारात एकता आल्याशिवाय होत नाही. सत्य, अहिंसा, निर्भयता, निःस्पृहता, निरहंकारता, सत्त्वशुद्धी, धैर्य, त्याग, शांती, भूतदया... असे सद्गुण अंगी बाणल्याखेरीज नीती प्रतिष्ठित होत नाही. ही नीती जितकी अंगी बाणेल तेवढी भक्तीत प्रगती. शाश्वत नीतिमूल्यांचे संगोपन व संवर्धन हा आपला सहजभाव झाला पाहिजे.

म्हणून वरील ओवीत तशा सहजधर्माचे वर्णन आले आहे. अंतःकरण स्फटिकासारखे निर्मळ व प्रसन्न असेल, तर त्यातील सद्भावना स्वाभाविकपणे आपल्या लहानमोठ्या सर्व कृतींमधून व्यक्त होतील. सदाचरण हा भक्तीचा गाभा आहे. सर्व काही घडते आहे, व्रत-वैकल्ये, यज्ञ-तप, पूजा-दानधर्म... पण नीती, सदाचरण, चित्तशुद्धी, भावशुद्धी, मनाचे पावित्र्य, विकारहीनता नसेल तर सारा खटाटोप व्यर्थ! भक्ती सोडून झालेले कर्म असेच त्याचे वर्णन करता येईल.

म्हणून ज्ञानेश्वरांनी अध्यात्म व भक्ती यांना नीतीच्या कोंदणात बसविण्याची दक्षता घेतली. नीतीशिवाय भक्ती व्यर्थ, हे सूत्र संपूर्ण ज्ञानेश्वरीत त्यांनी गोवले आहे.

**दिनांक १९ सप्टेंबर**

**म्हणोनि अतिशये विषय सेवावा । तैसा विरोध न व्हावा ।**
**का सर्वथा निरोधु[१] करावा । हेंही नको ।।६.३४८।।**

*शब्दार्थ - १) बंद करावा, नियमन*

**अर्थ -** म्हणून विषयांचे अतिसेवन करावे अशी विरोधी बुद्धी नसावी किंवा वाजवीपेक्षा फाजील नियमन करणे हेही कामाचे नाही.

## भक्तियोग सरळ, सोपा, सुखावह

रूढीने, परंपरेने सांगितलेल्या भक्तिमार्गातील अवघड वळणांना ज्ञानेश्वरांनी फाटा दिला. शास्त्रांनीच सांगितलेली भक्ती सुलभ, सरळ, सोपी व सुखाची आहे याचा निर्वाळा त्यांनी दिला. ज्ञानेश्वरीत, कधी अर्जुनाच्या तर कधी श्रीकृष्णाच्या तोंडून भक्तांना ग्वाही दिली की, भक्तीसाठी काहीही सोडण्याची गरज नाही. प्रपंच, व्यवसाय न सोडता परमार्थ करतो येतो हे सांगून सामान्य लोकांच्या मनातील न्यूनगंड काढून टाकला. परमात्म्याच्या दर्शनासाठी घरदार सोडून तीर्थक्षेत्रालासुद्धा जाण्याची गरज नाही. नाना व्रते, संकल्प, नियम करून शरीराला पिडण्याचे काहीच कारण नाही.

**तुम्ही व्रते नियमु न करावे । शरीराते न पीडावे ।**
**दूरी केही न वचावे । तीर्थासी गा ।। ३.८९।।**

ॐ

तिसऱ्या अध्यायात याची स्पष्ट कल्पना माऊलींनी मांडली. यज्ञयागात, कर्मकांडात अडकलेल्या भक्तीला साधा, सोपा नामसंकीर्तनाचा मार्ग दिला. संस्कृतचे ज्ञान नसल्यामुळे वंचित झालेल्या सामान्य जनांना, वैदिक तत्त्वज्ञानांतील गहन प्रमेये सोपी करून सांगितली. नाना साधनांच्या उपाधीत गुंतून पडण्याची आवश्यकता नाही हा दिलासा दिला. सकामता व संन्यास, प्रवृत्ती व निवृत्ती, अतिभोगलोलुपता व पराकोटीचा देहदंडनातील आततायीपणा अशा दोन्ही टोकांचा निषेध करून संयमाचा, मध्यममार्गाचा, अनासक्तबुद्धीचा सुटसुटीत मार्ग सांगितला. परमेश्वराला प्राप्त करावयाचे असल्यास अनन्यतेने, एकनिष्ठतेने त्याची भक्ती सदासर्वकाळ करावी. त्याला प्राप्त करण्यासाठी साधनाचे कोणतेही बंधन नाही. पण अव्यभिचारी भक्तीमुळे हा ईश्वर सुलभतेने प्राप्त होतो. म्हणूनच 'झडझडोनि वहिला निघ। इये भक्तिचीये वाटे लाग ।' असे श्रीकृष्ण अर्जुनाला सांगतात. या संसारसागरातून सुटण्याचा एकमेव मार्ग हा भक्तीचा असल्याने तू तो स्वीकार, असा आग्रह भगवंत करतात. ईश्वरावाचून ज्यांचे जगणे केवळ अशक्य असते अशा अनन्यभक्ताला भगवंत दूर नसतो हे पुनःपुन्हा माऊलींनी समजावले आहे.

**जे मन बुद्धि इही । घर केले माझा ठायी ।**
**तरि सांगे मग काई । मी तू ऐसे उरे ।।१२.९९।।**

अर्थ - कारण की, मन व बुद्धी ही माझ्या ठिकाणी कायमची राहिली तर मग, मी व तू असे द्वैत राहील काय? सांग.

भगवंत भक्तांचे प्रेम मागतो. त्याचे मन व बुद्धी मागतो. असे प्रेमयुक्त मन व निश्चयात्मक बुद्धी भगवंताला अर्पण करणे हीच खरी भक्ती आहे. हे भगवंताच्या मुखाने श्री ज्ञानेश्वरांनी सांगितले.

### दिनांक २० सप्टेंबर

**एक अविद्यानाशु हे स्थळ । तेणे मोक्षोपादन[1] फळ ।**
**या दोन्ही केवळ । साधन ज्ञान ।। १८.१२४३।।**

*शब्दार्थ - १) मोक्ष संपादन*

अर्थ - या ग्रंथात अविद्येचा निरास करणे हा विषय आहे व त्या योगाने मोक्ष मिळवणे हे फळ (प्रयोजन) आहे. या दोहोंस साधन केवळ ज्ञान आहे.

## अविद्यानाशानेच मोक्षप्राप्ती

केवळ गीताशास्त्रच असे शास्त्र आहे की, त्यात मोक्षप्राप्तीचा उपाय सांगितला आहे. ज्ञानेश म्हणतात की, इतर शास्त्रांनी जरी तो सांगितला असला तरी ते उपाय प्रमाणसिद्ध नाहीत. आत्मदर्शनाला प्रतिबद्धक असा जो अविद्येचा मळ आहे तो काढून टाकण्यास इतर शास्त्रे समर्थ आहेत पण ती मोक्ष प्रदान करू शकत नाहीत. परंतु हा ग्रंथ आत्मस्वरूपाचे ज्ञान करून देण्यास समर्थ आहे. तसेच मोक्ष प्रदान करण्यास एकमेव आहे, असे गौरवोद्गार माऊलीने काढले आहेत. ग्रंथाच्या सुरुवातीसही हे फळ सांगितले होते व शेवटीही त्याचा उच्चार केला आहे. ग्रंथाच्या मध्यभागी अनेक सिद्धान्तांची चर्चा जरी केलेली असली तरी अविद्येचा नाश हेच त्यांचे मुख्य प्रयोजन आहे. अविद्यानाश व मोक्ष या दोहोंना मात्र साधन केवळ ज्ञान आहे. नित्यप्राप्त मोक्षासाठी व अज्ञाननाशासाठी आत्मज्ञान हे साधन आहे.

श्री ज्ञानेश्वरांनी भक्ती-ज्ञान-योग-कर्म यांचा समन्वय केला आहे. सकळ मनुष्यजात जरी भजनशील असली तरी ज्ञानाच्या अभावी मात्र त्याची भक्ती वाया जाते. त्यामुळेच ईश्वराचे नेमके स्वरूप त्यांना समजत नाही. या अज्ञान-अविद्येमुळेच ते अभेदात भेदाचे दर्शन घेतात व जो अनाम्या आहे त्याला नावे ठेवतात. म्हणून भगवंतसुद्धा ज्याचा



ॐ

भाव, ज्याची भक्ती जेवढी असेल त्याला तेवढेच फळ देतो. म्हणून ज्याची भक्ती करायची तो ईश्वर कसा आहे, त्याचे स्वरूप कसे आहे याचे ज्ञान झाले पाहिजे. ज्ञान हा भक्तीचा डोळा आहे. एकनिष्ठ व अनन्यभक्तीने सतत भगवंताची भक्ती करणाऱ्यांना हे ज्ञान भगवंत देतो. अशा भक्तांना आपण बुद्धियोग देतो हे भगवंतांचे आश्वासन आहे. (अध्याय चौथा ओव्या ६६ ते ६९)

श्री ज्ञानेश्वरांच्या भक्तियोगाचे हेच वैशिष्ट्य आहे की, त्यांनी भक्ती आणि ज्ञान यांचा अजोड व पवित्र असा संगम घडवून आणला. त्यांच्या काळात अनेक पंथ व संप्रदाय असल्यामुळे मुख्यतः ज्ञान व भक्ती यांच्यातच झगडा होता. परंतु पराभक्ती व पराज्ञान यात फरक नाही हे सांगून त्यांनी ज्ञान आणि भक्ती यांच्या भांडणाचे मूळच संपवून टाकले.

आजसुद्धा काहींचे म्हणणे असे आहे की, भक्तीत ज्ञानाची काय आवश्यकता? अज्ञानमूलक भक्तीने, साधनेचे फळ मिळत नाही. म्हणून ज्ञान, भक्ती, कर्म यांचा समन्वय घडून आल्याशिवाय शुद्ध भक्ती प्राप्त होत नाही. चारही मार्गात भक्तीला श्रेष्ठ स्थान दिलेले असले तरी इतर मार्गही त्याला अनुषंगिक आहेत.

### दिनांक २१ सप्टेंबर

**ऐसे भजतेनि प्रेमभावे । जया शरीरही पाठी[1] न पवे ।**
**तेणे भलतेया[2] व्हावे । जातीचिया ।। ९.४१५।।**

*शब्दार्थ - १) पुन्हा २) कोणत्याही*

अर्थ - अशा प्रकारे प्रेमभावाने भजत असता त्याला पुन्हा शरीरही मिळत नाही. तो मग कोणत्या का जातीचा असेना?

## भक्तीत प्रेमभाव महत्त्वाचा

ज्ञानेश्वरांच्या भक्तियोगात 'प्रेमभाव' हा सर्वांत महत्त्वाचा आहे. जो प्रेमभावाने ईश्वराची सेवा करतो त्याला पुनर्जन्म घ्यावा लागत नाही. ईश्वराच्या ठिकाणी भीतीने भक्ती करणाऱ्यांना ईश्वराजवळ जाता येत नाही. पण प्रेमभावाने त्याला हाक मारली की, प्रतिसाद मिळतो. सर्वश्रेष्ठ भक्त नारदांनी भक्तीची व्याख्या करताना 'साऽत्वास्मिन परम प्रेमरूपा । अमृत स्वरूपा च' असे भक्तिसूत्रात म्हटले आहे. भक्ती म्हणजे भगवंतावरील प्रेम. शुद्ध प्रेमात अपेक्षा काही नसते. ईश्वराजवळ जाताना निरपेक्ष भावाने कामनारहित होऊन जावे लागते. प्रेम म्हणजे समर्पण. भक्तीत भगवंताला आपला भाव द्यायला असतो. आपली मन, बुद्धी अर्पण करावयाची असते. भगवंत भावाचा भुकेलेला आहे. भक्ताने आपल्या सर्वस्वाचे समर्पण करून एकनिष्ठतेने जर भक्ती केली तर अशा अनन्य भक्ताचा योगक्षेमदेखील तो चालवितो. जो समर्पित भावनेने भगवंताचा धावा करतो, असा भक्त कधीही नाश पावत नाही हे भगवंताचे आश्वासन आहे. जसे माऊलीला आपल्या मुलाकडून कशाचीच अपेक्षा नसते. ती भरभरून प्रेम देत असते. भगवंत हेच सर्वस्व आहे, माता-पिता-धाता... असे जेव्हा होते, तेव्हा भक्ताचे संपूर्ण जीवन भगवंतमय होऊन जाते. त्याला ईश्वरलाभाशिवाय कोणत्याही भोगविषयात रस वाटेनासा होता. जिण्याचे सर्वस्व तोच ईश्वर आहे अशी धारणा होते. तेव्हा ईश्वर अशा अनन्यभक्तापासून दूर राहत नाही.

अन्य मार्ग हे बुद्धीचे विषय आहेत. भक्ती ही मुख्यतः अंतःकरणाचा, हृदयाचा विषय आहे. त्यामुळे मनुष्याचा स्वाभाविक कल हा भक्तिमार्गाकडेच असतो. या भक्तीच्या, प्रेमाच्या गोडीत मोक्षाचा आनंदसुद्धा फिका वाटतो. अशी

ॐ

भक्ती करताना, भगवंत भक्ताची जात कोणती आहे याचा विचारही करत नाही. म्हणून वरील ओवीत भगवंताने हे स्पष्ट केले आहे.

ज्या भक्ताची आवड अखंड ईश्वराच्या ठिकाणी असते तो कर्मरूपी बंधनातून पार पडतो. ज्याने मन-बुद्धीचे सर्व व्यवहार एकनिष्ठतेने भगवंताच्या चरणी वाहिलेले असतात. त्याची भक्ती अव्यभिचारी असते. म्हणून प्रेमभावाने जो भगवंताची भक्ती क्षणभरही सोडत नाही त्याला भगवंताचे स्वरूप-सान्निध्य प्राप्त होते.

भक्ती म्हणजे प्रेम. या प्रेमात जो गोडवा आहे ते माधुर्य भीतियुक्त भक्तीत प्राप्त होत नाही. सर्व संतांनी हा प्रेमभाव स्वतः अनुभूती घेऊन वर्णन केला आहे.

**दिनांक २२ सप्टेंबर**

**का रुपे[1] वयसा[1] माजा । आथिलेपणे[2] का गाजा ।**
**एक भाव नाही माझा । तरी पाल्हाळ[3] ते ।। ९.४३२।।**

*शब्दार्थ - १) रूपाची आणि तारुण्याची प्रतिष्ठा २) संपत्तीचा डौल ३) व्यर्थ*

**अर्थ** - उत्तम सुस्वरूपाने व तारुण्याने मस्त का व्हावे? संपन्नपणाचा डौल कशाला मिरवावा? (कारण) माझ्याविषयी एक भक्ती जर नसेल, तर हा सर्व पसारा निष्फळ आहे.

## भक्तीशिवाय सर्व व्यर्थ

श्री ज्ञानेश्वरांनी भक्तीचा महिमा, गरिमा, वैभव, थोरवी यांचे वर्णन अनेक ठिकाणी केले आहे. त्यांच्या अंतःकरणात भक्तीचे स्थान अढळ होते म्हणून कर्म; ज्ञान यांचे महत्त्व जाणूनही त्यांनी भक्तीचीच थोरवी गायिली आहे. त्यांच्या मते भक्ती जर नसेल तर सारा डौल व्यर्थ आहे. कितीही ज्ञान असेल पण विशुद्ध भक्तिभाव नसेल तर त्या ज्ञानाचे अहंकारात रूपांतर होते.

**माझिये भक्तिविण । जळो ते जियालेपण ।**
**अगा पृथ्वीवरी पाषाण । नसती काई ।। ९.४३६।।**

अश्रद्ध, अनीश्वरवादी व सर्वांनाच हा खरमरीत इशारा आहे. मनुष्याने योग्य वेळी विचार करून भक्तीची कास धरावी म्हणून ज्ञानेशांनी येथे सर्वांना सावध केले आहे. भगवंताच्या कृपेनेच मनुष्याचा जन्म मिळतो. जन्म, मरण हे त्याच्याच हाती आहे. जन्मापूर्वी त्याचेच असतो व मृत्यूनंतर त्याच्याच ठिकाणी जायचे. त्याच्याच कृपेने शरीर प्राप्त झाले आहे. जी काही इंद्रियसुखे, भोग मिळतात ती घेण्याची शक्ती, बुद्धी, मती, युक्ती सर्व काही त्याच्याच कृपेने घडते. तोच या जीवनाचे सर्वस्व असताना त्या ईश्वराची कृतज्ञतेने आठवण न काढणे म्हणजे वास्तविक घोर पाप आहे. भक्ती म्हणजे ही कृतज्ञता व्यक्त करणे. बुद्धीची देणगी ही मनुष्यासच दिल्यामुळे या कृतज्ञतेची जाण तो ठेवू शकतो. पशु-प्राण्यांकडून ही अपेक्षा नाही. शरीरात जसा प्राण असेल तरच सर्वस्व असते. तसे जीवनात कृतज्ञता, समर्पितता, भक्ती नसेल तर त्या जगण्याला काय अर्थ? असे जगणे पशुसमानच आहे असे म्हणवयास हरकत नाही. आपल्यासाठी कोणी साधा चहाचा कप दिला तर, आपण त्याचे थँक्स मानतो. मग त्या जगन्नीयत्याने येथे जन्म दिला... प्राण, शक्ती, इंद्रिये सर्व काही दिले, तोच त्या सर्वांचा नियंता आहे.त्याच्या सत्तेवाचून झाडाचे पानही हालत नाही असा तो 'कर्तुमकर्तुम अन्यथा कर्तुम' असा असताना त्याचे स्मरण न करणे हे घोर पाप आहे. पृथ्वीवरचे पाषाण असे निष्प्राण व जेथल्या तेथेच असतात. तसेच ही कृतघ्न माणसे जिवंत असूनही पाषाणांसारखे असतात. माऊलींनी हे कठोरपणे सांगितले आहे.



ॐ

या मृत्युलोकाच्या रहाटगाडग्यातून जर बाहेर पडायचे असेल तर भक्तीचा एकमेव उपाय ज्ञानेश्वरांनी सांगितला 'तरि झडझडोनि वहिला निव । इये भक्तीचिये वाटे लाग । जिया पावसी अव्यंग । निजधाम माझे ।। (९.५१६) सुखदुःखाच्या लाटेवर न राहता अखंड शांती व आनंदाचे साम्राज्य पाहिजे असेल तर, झटकन मोकळा होऊन माझ्या भक्तीच्या मार्गाला लाग. ज्याच्या योगाने तू माझ्या सदनी येशील, माझ्या स्वरूपाला येऊन मिळशील, असे भगवान श्रीकृष्णांनी अर्जुनाला सांगितले. नव्हे, अर्जुनाच्या निमित्ताने आपणा सर्वांना सांगितले.

भक्तिहीन माणसाचे सारे जीवनच व्यर्थ आहे, मग त्याने सुखासाठी कितीही आटापिटा केलेला असो. म्हणून ज्यांना म्हणून मनुष्यशरीराचे वैभव प्राप्त झाले आहे त्याचा उपयोग त्यांनी अंतःकरणपूर्वक ईश्वराची भक्ती करण्यासाठी करावा असे माऊली आग्रहाने म्हणते.

**दिनांक २३ सप्टेंबर**

**जे पुरुषार्थ[1] सिद्धी[1] चौथी । घेऊनि आपुला हाती ।**
**रिगाला[2] भक्तिपंथी । जगा देतु ।। १२.२१९।।**

*शब्दार्थ - १) मोक्ष २) वाटचाल करतो*

**अर्थ** - कारण की, तो भक्त चौथी पुरुषार्थसिद्धी जो मोक्ष, तो आपल्या हातात देऊन भक्तीच्या मार्गाने जगाला मोक्ष देण्यास निघाला.

## श्रेष्ठ भक्तीची परिणती

भक्तीची परिणती आनंदस्वरूप होणे व मिळालेला आनंद वाटणे. संत तुकाराम म्हणतात, "सेवितो रस तो वाटितो आणिका । घ्या रे होऊ नका रानभरी ।।" आपल्याला जो ब्रह्मरस, आनंद मिळाला तो जगाला वाटण्यातच कृतार्थता असते. गुरू, संत किंवा श्रेष्ठ भक्त केवळ स्वान्तसुखासाठी भक्ती करत नाहीत. 'जे जे भेटे भूत । ते ते मानिजे भगवंत ।' अशी विश्वव्यापक दृष्टी झाल्यामुळे ते 'आपणचि विश्व जाहला' अशी दृढ भावना ठेवून 'विचरे विश्व होऊनि विश्वामाजी' असे आचरण ठेवीत असतात. संपूर्ण भेदभाव गळून पडल्यामुळे हा माझा, हा परका असा दुजाभाव त्यांच्या मनी नसतो. म्हणून भक्तीचे फळ ते स्वतःकडे ठेवत नाहीत. केवळ आपल्यातच ते समाधीस्थ होऊन राहत नाहीत.

म्हणूनच ज्ञानदेव, नामदेव, तुकाराम ही सर्व संतमंडळी एका जागी स्थिर राहिली नाहीत. तीर्थयात्रांच्या निमित्ताने जाऊन जगाला प्रबोधन करीत आनंदरस वाटत होती. सर्व जग आनंदमय करण्याची प्रतिज्ञाच श्री ज्ञानेशांनी घेतली होती. 'आनंदाचे आवारू मांडू जगा ।' व 'अवघाचि संसार सुखाचा करीन' हे त्यांचे जीवितकार्यच होते.

भक्तीच्या सामर्थ्याने जगातील दुःख दूर करून, संसारसागरात बुडत असलेल्या लोकांना तारण्याचे काम त्यांनी केले.

म्हणूनच असा भक्त चौथी पुरुषार्थ सिद्धी जो मोक्ष, तो आपल्या हातात देऊन भक्तीच्या मार्गाने जगाला मोक्ष देण्यास निघतो.

करुणा, उदारता व ऐक्याची भावना यामुळे असा भक्त पाण्यासारखा असतो. पाणी जसे समोरील खड्डा भरल्याशिवाय पुढे जात नाही तसा हा भक्त पुढ्यात आलेल्या श्रान्त जीवांचे दुःख हरण केल्याशिवाय पुढे जात नाही. त्यासाठी त्यांनी आपल्या अंगी सेवाभाव बाणवलेला असतो. दुःखी जनांची सेवा हीच ईश्वरसेवा मानून तो आपले

ॐ

कार्य करीत असतो. ''की भक्तिसुखालागी । आपणपेंचि दोही भागी । वांटूनिया आंगी । सेवकै बाणी ।।'' ''तथापि भक्तसुखाकरिता आपल्यातच (देव व भक्त) असे दोन भाग करून तो आपल्या ठिकाणी सेवाधर्म स्वीकारतो.'' देव व भक्त या दोन्ही कल्पना आपल्यातच सारख्या कल्पून अद्वैत भक्तीने तो सकळजनांची सेवा करीत असतो.

सूर्य जसा आत-बाहेर पवित्र, निर्मळ असतो तसा हा भक्त सदैव सदाचरणी असतो. आकाश सर्वव्यापक असून जसे निर्लेप असते तसे त्याचे मन सर्वव्यापक असते. असा भक्त म्हणजे शांतीचे निधान असते. आनंदाचा पुतळा असतो. तृप्त व शांत झाल्यामुळे जगाला तसेच आनंदी करण्यासाठी धडपडत असतो. 'आम्ही वैकुंठवासी । आलो याचि कारणांसी ।।' अशी तुकाराम महाराजांसारखी त्याची धारणा, वृत्ती होते. स्वतः सिद्ध होऊनसुद्धा इतरांच्या कल्याणासाठी देह झिजवीत असतात. भक्तीचे हे सामर्थ्य आहे.

**दिनांक २४ सप्टेंबर**

**मी कवण केतुला[1] । कवणाचा कै जाहला ।**
**निरुती[2] या करिता बोला । युगे गेली ।। १०.६७।।**

*शब्दार्थ - १) केवढा २) निश्चय*

**अर्थ** - मी कोण आहे, केवढा आहे, कोणापासून व केव्हा उत्पन्न झालो, या गोष्टींचा निर्णय करण्यात कित्येक युगे निघून गेली.

**भगवंताचे स्वरूप**

या कलियुगात भक्ती हे साधन सोपे आहे असे म्हटले जात असले तरी ते तेवढेच कठीणही आहे. म्हणून म्हटले आहे -

**भक्त म्हणविता गोड वाटे ।**
**करणी करिता टीर फाटे ।।**

नामस्मरणाने भक्ती सहजतेने करता येते, पण ज्याचे नाम घ्यायचे त्याचे स्वरूप जर माहीत नसेल तर अशा अज्ञानमूलक भक्तीने काय साध्य होणार? 'भक्ती तो शूळावरील पोळी' असे संत तुकाराम म्हणतात त्यातील रहस्य हेच आहे. भगवंताच्या स्वरूपाचे ज्ञान, त्याला आवडणारी भक्ती, भगवंताचे गुण... या सर्वांची कल्पना जर मनी असेल तर ज्ञानयुक्त, शास्त्रशुद्ध भक्ती होऊ शकेल.

भजन, कीर्तन व नामस्मरण ही भक्तिमार्गाची खास साधने आहेत. ''रामाचे भजन हेचि माझे ज्ञान'' असे म्हणून समर्थांनी भजनाला ध्यानाचा दर्जा दिला. नामसाधनाचा महिमा गाताना तुकाराम महाराज म्हणतात -

**पवित्र तो देह वाणी पुण्यवंत ।**
**जो वदे अच्युत सर्वकाळ ।**
**तयांच्या चिंतने तरतील दोषी ।**
**जळतील राशी पातकांच्या ।।**

भगवंताच्या नामस्मरणाने देह पवित्र होतो व त्याच्या चिंतनाने पापांच्या राशीसुद्धा जळून जातात. तर कीर्तनाचे माहात्म्य सांगताना श्री ज्ञानेश्वर म्हणतात -

**कीर्तनाचेनि नटनाचे ।**
**व्यवसाय नाशिले प्रायश्चिताचे ।**



ॐ

**जे नावचि नाही पापांचे । ऐसे केले ।।**

हे सर्व जरी असले तरी नामस्मरण, भजन, कीर्तन करीत असताना कोणता भाव ईश्वराविषयी ठेवायचा? कोणती प्रतिमा मनःचक्षुपुढे ठेवायची? कोणते रूप डोळ्यात साठवायचे? हृदयात स्मरण कशाचे ठेवायचे? मूर्तीचे स्वरूप कसे ठेवायचे? ईश्वराच्या कोणत्या रूपाचे ध्यान करावयाचे? अशा अनेक शंका-कुशंका भक्तिमार्गात येतात. श्री ज्ञानेशांनी ज्ञानेश्वरीमध्ये याचा सविस्तर ऊहापोह केला आहे. या सर्वांची उत्तरे देऊन निःशंक करण्याचा मार्ग दाखविला आहे.

देवांना, महर्षींनासुद्धा भगवंताची उत्पत्ती माहीत नाही. कारण देव व महर्षी या सर्वांचे आदिकारण तोच आहे. या स्वरूपासंबंधी वेदांनी ''नेति नेति'' म्हणून हात टेकले. पोटात असलेला गर्भ जसे वय जाणत नाही तसे देवांनासुद्धा माझे ज्ञान होत नाही, असे भगवंत अर्जुनाला सांगतात. भगवंताला जाणणे कठीण आहे हे जरी खरे असले तरी त्याला जाणण्याचा मार्ग मात्र निश्चित आहे. देहात्मकता काढून टाकून, अनहंकाराने सर्व बाह्यवृत्ती आवरून घेऊन, इंद्रियनिग्रहाने अंतःशुद्धी करून जर भगवंताची भक्ती केली तर भगवंत भक्तापासून दूर नाही. असा भक्त जो, त्याला जाणतो तो या भूतलावरील ईश्वररूपच आहे असे समजावे.

यापुढील ओव्यांमधून हे ईश्वराचे स्वरूप व त्याला जाणण्याचा मार्ग याचा आपण वेध घ्यावयाचा आहे.

**दिनांक २५ सप्टेंबर**

**देवोदेवी मीचि पाही । हाही निश्चय त्यासि नाही ।**
**भाव ते ते ठायी । वेगळाला धरी ।।७.१४४।।**

**अर्थ** - देवदेवतान्तरातून मीच आहे, हा निश्चयदेखील त्यास नसतो. त्या त्या देवताविषयी त्याची भिन्न भिन्न समजूत असते.

**ज्या देवतेची पूजा, त्याचीच फळप्राप्ती**

मनात कामना ठेवून, त्याच्या परिपूर्तीसाठी त्या त्या विशिष्ट देवदेवतांची भक्ती करणारे; परमतत्त्वाचे स्वरूप जाणत नाहीत. त्यामुळे शास्त्राने सांगितलेल्या विधीप्रमाणे या कनिष्ठ देवदेवतांची पूजा करून शेवटी त्यांना ती फळेसुद्धा प्राप्त होतात. ज्याने ज्याची इच्छा करावी त्याला ते फळ मिळते पण ते देखील त्या परमतत्त्वाच्याच कृपेने व त्याच्याच इच्छेने.

देवतांकडून ज्या अल्पबुद्धी मनुष्यांना ती फळे प्राप्त झालेली असतात, ती सर्व विनाशी ठरतात. देवतांची भक्ती करणारे देवतांप्रत जातात व परमात्म्याची भक्ती करणारे परमात्मस्वरूप होतात. अशा भजनाने त्या भक्तांचा जन्म-मरणाचा फेरा चुकत नाही व मिळालेले ऐहिक भोगसुद्धा अल्पजीवी असल्यामुळे ती भक्ती व्यर्थच ठरते.

वास्तविक जो जो, ज्या ज्या देवतांना भजतो तो तो त्या त्या देवतांप्रत जातो. दुसरे जे शरीराने, मनाने व प्राणाने अखंड परमात्म्याच्या भजनाच्या मार्गात असतात ते परमात्मस्वरूपाच्या ठिकाणी पोहोचतात.

म्हणून भक्ताने आपल्या विवेकबुद्धीने शाश्वत फळाचा मार्ग स्वीकारावा. त्यासाठी स्वर्गाप्रत नेणारे जे जे मार्ग आहेत त्यांचा विचार न करता अखंड शांतीचा मार्ग अनुसरावा. पुण्यप्राप्तीच्या जोरावर स्वर्गाप्रत जाता येते पण पुण्यक्षय झाल्यावर मात्र पुन्हा जन्म घ्यावा लागतो. अमृताच्या समुद्रामध्ये बुडी घ्यायची आणि अमृत न पिता तोंड घट्ट धरून ठेवावे, अशी ही स्थिती आहे.

ॐ

हे सर्व घडते कारण मनुष्यास त्या परमात्म्याच्या सत्य स्वरूपाचे ज्ञान नाही. योगमायेच्या पडद्याने ते आंधळे झालेले असतात.

तेराव्या अध्यायात अज्ञानी भक्त धावपळ करून, नाना लटपटी-खटपटी करून, सर्व देवतापूजन करता करता कासावीस होऊन जातो. त्याचे वर्णन माऊलींनी मोठे गमतीदार केले आहे -

**एकादशीच्या दिवशी । जेतुला पाडु आम्हांसी ।**
**ते तुलाची नागासी । पंचमीच्या दिवशी ।**
**चौथ मोटकी पाहे । आणि गणेशाचाचि होये ।**
**चावदशी म्हणे माये । तुझाच वो दुर्गे ।।**
**पाठी सोमवार पावे । आणि बेलेसी लिंगा धावे ।**
**ऐसा एकलाची आघवे । जोगवी जो ।।**

एकादशीच्या दिवशी जेवढे आमचे भजन करतो, तेवढीच भक्ती पंचमीच्या दिवशी नागाची करतो. चतुर्थीच्या दिवशी गणेशाची तर पुन्हा दुर्गेची आणि सोमवारी बेल घेऊन शिवलिंगापाशी.

असे अनेक ठिकाणी निष्ठा ठेवून काही साधता येत नाही. भक्तीत एकनिष्ठतेला खूप महत्त्व आहे. त्याशिवाय तल्लीनता येत नाही. जो नित्ययुक्त नसतो त्याची साधना अपुरी राहते. वास्तविक सर्व देव-देवतांच्या ठिकाणी त्यांना देवत्व प्राप्त करून देणारा तोच एकमेव परमात्मा आहे. पण त्या परमात्म्याचे स्वरूप माहीत नसल्यामुळे अशी अनेकचित्त विभ्रांत मनोभूमिका तयार होते.

**दिनांक २६, २७ व २८ सप्टेंबर**

**मज आकारशून्या आकारू । निरुपाधिका उपचारु[1] ।**
**मज विधिविवर्जिता व्यवहारु । आचारादिक ।।९.१५७।।**
**मज वर्णहीना[3] वर्णु । गुणातीतासि गुणु ।**
**मज अचरणा चरणु । अपाणिया[4] पाणी ।।९.१५८।।**
**किंबहुना ऐसे समस्त । जे हे मनुष्यधर्म[5] प्राकृत ।**
**तयाचि नाव मी ऐसे विपरीत । ज्ञान तयांचे ।।९.१६१।।**

*शब्दार्थ - १) सुखसाधने, सुखसाहित्य २) कर्तव्याकर्तव्यरहिताला ३) जातिरहिताला ४) हस्तरहिताला ५) मनुष्याचे धर्म*

**अर्थ -** जो मी निराकार आहे त्या मला आकार आहे असे मानतात व देहरहित जो मी त्या मला पूजेचे उपचार अर्पण करतात. शास्त्रमर्यादेचे बंधन नसलेल्या मला, आचारादिक व्यवहार लावतात. ।।९.१५७।।

जातीच्या पलीकडे असणाऱ्या मला एका विशिष्ट जातीचा समजतात. निर्गुणाला सगुण समजतात. पाय नसताना माझ्या ठिकाणी पायांची कल्पना करतात व त्याचप्रमाणे हातांच्या कल्पनेस माझ्या ठिकाणी जागा नसूनही, हात या अवयवांची कल्पना करतात ।।९.१५८।।

फार काय सांगावे? असे हे जे मनुष्याचे सामान्य धर्म, तेच सर्व माझ्या ठिकाणी आहेत, असे त्या अज्ञानी लोकांचे विपरीत ज्ञान असते. ।।९.१६१।।



ॐ

## भगवंत निर्गुण, निराकार, गुणातीत आहे

भगवद्‌गीतेच्या नवव्या अध्यायातील ११ व्या श्लोकावर माऊलींनी २१ ओव्यांतून यावर निरूपण केले आहे. त्यातील वरील तीन ओव्या. भगवंत त्या श्लोकात म्हणतात, ''सर्व भूतांचा मोठा ईश्वर असे जे माझे परमस्वरूप ते न जाणणारे मूर्ख लोक मनुष्यदेह धारण केलेल्या मला (मनुष्य देहधारी समजून) अवमानितात.''

अशा लोकांच्या आशा व्यर्थ, कर्मे फुकट, ज्ञान व्यर्थ आणि चित्त भ्रष्ट असून त्यांनी मोहात्मक राक्षसी व आसुरी स्वभावाचा आश्रय केलेला असतो.

भगवंताला 'मानुषी', मनुष्यशरीरधारी समजून त्याची स्तुती, भजन केले म्हणजे भगवंत संतुष्ट होतो अशी धारणा आहे. अशा भगवंताची भीती बाळगून मग दानधर्म, सत्कृत्ये व यज्ञ-याग केले जातात. भगवंताला तत्त्वतः न जाणता, त्याचे श्रेष्ठतम स्वरूप न जाणता, त्याला आवडणारी भक्ती न करता जे अशी भक्ती करतात त्यांचे जिणे व्यर्थ आहे. सर्वशक्तिमान, सर्वज्ञ, समर्थ, कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम अशा दिव्य परमात्म्याची अवज्ञा केल्याने असे पुरुष श्रेयसापासून वंचित होतात. महारथी कर्णाचे असेच झाले. पृथ्वीने रथचक्र गिळले होते आणि अर्जुनाने बाणांचा वर्षाव सुरू केला होता, पण प्रतिकार करण्यासाठी कर्णाला एकही अस्त्र स्फुरेना. कारण त्याने गुरूची अवज्ञा केली होती. शेवटी कर्णाचा अंत झाला. म्हणून भगवंत येथे राजमार्ग दाखवीत आहेत की, केवळ प्रकृतीचा आश्रय घेऊन भक्ती करणारा आसुरी वृत्तीने भक्ती करत असतो. अशांना शक्ती, संपत्ती, सत्ता इत्यादी वैभव प्राप्त होते. पण अशा मिळालेल्या गोष्टींना दैवी सुगंध, स्पर्श नसतो म्हणून त्या अल्पकाळ टिकतात. असे वृथा भक्ती करणारेही भक्तच असतात. रावणही असाच महान भक्त होता. पण वाट चुकलेला.

या नवव्या अध्यायात भक्तीचे गुह्यतम ज्ञान प्रकट झाले आहे. ही राजविद्या अर्जुनाला सांगताना ईश्वराच्या स्वरूपाचे यथार्थ ज्ञान व भक्तीचे शास्त्र भगवंताने येथे सांगितले आहे.

या ओव्यांतून ब्रह्मस्वरूपाचे वर्णन आहे.

जीव, जगत् व जगदीश्वर हे तिन्ही एकच आहेत असे स्पष्ट वर्णन उपनिषदांतून आले आहे. श्वेताश्वेतर उपनिषदातील एक महान श्लोक अतिशय बोलका आहे.

**एको देवः सर्वभूतेषु गूढः सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा ।**
**कर्माध्यक्षः सर्वभूताधिवासः साक्षी चेता केवलो निर्गुणश्च ।।**

भगवंत एकच आहे. तोच सर्व भूतांच्या ठायी आहे. सर्व विश्वाला व्यापून राहणारा परमात्मा सर्व भूतमात्रांच्या अंतर्यामात आहे. सर्व कर्मांचे मूळ तोच आहे. सर्व घटनांचा साक्षी, चैतन्यस्वरूप केवल असा परमात्मा निर्गुणस्वरूप आहे.

श्री ज्ञानेश्वरांनी जीव (आत्मा किंवा पुरुष) जगत् (प्रकृती) व परब्रह्म (परमात्मा किंवा पुरुषोत्तम) यांचे स्पष्ट वर्णन ज्ञानेश्वरीत केले आहे. परब्रह्माची व्यक्त व अव्यक्त, सगुण व निर्गुण अशी सर्व रूपे सांगितली आहेत. ''आपणच ब्रह्माचे, अव्यक्त मोक्षाचे, शाश्वत धर्माचे व परमावधीच्या सुखाचे मूळ स्थान आहे.'' (१४.२७) असे भगवंतांनी म्हटले आहे.

असा हा भगवंत अव्यक्त, निर्गुण, निराकार, अक्षर, अचिन्त्य, कूटस्थ, अचल, नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त, सच्चिदानंदस्वरूप आहे. अशा या निर्गुण परमात्म्याची त्रिगुणात्मक प्रकृती ही दैवीमाया असून त्या मायेला जे तरून जातात तेच मला येऊन मिळतात असे त्याने आश्वासनही दिले आहे.

मूर्त विश्वात सर्वत्र ब्रह्मसत्ता व्याप्त आहे. सर्वत्र तो ओतप्रोत आहे. ईशावास्यम् असलेल्या या जगात तो परमात्मा निर्गुण असूनही गुप्तस्वरूपात चैतन्यरूपाने वास करीत आहे, याची अनुभूती तत्त्वज्ञ, संत घेत असतात असे माऊली म्हणते -

**या उपाधीमाजी गुप्त । चैतन्य असे सर्वगत ।**
**ते तत्त्वज्ञ संत । स्वीकारीती ।।२.१२६।।**

पण अज्ञानी लोक मात्र हे स्वीकारत नाहीत. ज्याला शरीर नाही त्याला शरीररूपात मानून त्याची मनुष्यधर्माप्रमाणे, सर्व धर्मांत असलेल्या विधीनुसार पूजा करतात. निराकार असलेल्या परमात्म्याला आकार देतात. ज्याला नाव नाही त्याला नावे ठेवतात. जो एकच आहे त्याला अनेकत्वाने पाहतात. जो सर्वत्र आहे त्याला विशिष्ट ठिकाणीच पाहतात. जो अवयवरहित आहे त्याच्या ठिकाणी अवयव पाहतात. प्रत्येक वस्तूला जी सत्ता आहे, ती त्या परमसत्तेची आहे. परमात्म्याच्या सत् चित् आनंद स्वरूपाने जगत् भासते हेच त्याचे स्वरूप आहे. सर्वत्र फक्त परमेश्वरच आहे हेच त्याचे अद्वैत तत्त्वज्ञान होय.

हे तत्त्वज्ञान ध्यानी न घेता सर्वव्यापी असणाऱ्या ईश्वराला एकाच ठिकाणी कल्पून, मनुष्याचे सामान्य धर्म त्याच्या ठिकाणी आहेत असे समजणाऱ्या अज्ञानी लोकांना हे विपरीत ज्ञान असते. म्हणून जेव्हा एखादी मूर्ती आपल्यापुढे पाहतात, त्या वेळेला त्या मूर्तीएवढाच देव आहे अशा समजुतीने भक्ती करतात. आणि मग तीच मूर्ती भंग पावली म्हणजे आता देव नाहीसा झाला असे समजून पूजा करण्याचे थांबवतात. अशा या प्रकारांनी आकारावरून इतर देहधाऱ्यासारखा तो आहे असे समजतात. म्हणून त्यांचे हे विपरीत ज्ञान परमात्म्याच्या शुद्ध स्वरूपाच्या यथार्थ ज्ञानास झाकून टाकते.

**दिनांक २९, ३० सप्टेंबर व १ ऑक्टोबर**

**तेणे कारणे मी बोलेन । बोली अरुपाचे[१] रूप दावीन ।**
**अतींद्रिय[२] परि भोगवीन । इंद्रियांकरवी ।।६.३६।।**
**आइका यश श्री औदार्य । ज्ञान वैराग्य ऐश्वर्य ।**
**हे साही गुणवर्य[३] । वसती जेथ ।।६.३७।।**
**म्हणोनि तो भगवंतु । जो निःसंगाचा सांगातु[४] ।**
**तो म्हणे पार्था दत्तचित्तु[५] । होई आता ।।६.३८।।**

*शब्दार्थ - १) निराकाराचे २) इंद्रियातीत ३) श्रेष्ठ गुण ४) सोबती ५) लक्ष दिलेला*

**अर्थ** - त्या सद्गुरूच्या कृपेच्या आधारावर (तेणे कारणे) मी व्याख्यान करीन व माझ्या व्याख्यानात अरूप, निराकार ब्रह्माचे स्पष्ट रूप दाखवीन आणि जरी ते (ब्रह्म) इंद्रियांना गोचर होण्यापलीकडचे आहे, तरी त्याचाही अनुभव इंद्रियांना येईल, असे मी करेन. ।।६.३६।।

ऐका, यश, श्री (लक्ष्मी), उदारता, ज्ञान, वैराग्य, आणि ऐश्वर्य हे सहा उच्च प्रतीचे गुण ज्याच्या ठिकाणी वास करतात. ।।६.३७।।

म्हणून ज्यास भगवंत असे म्हणतात व जो सर्वसंगपरित्याग केलेल्यांचा सोबती आहे तो श्रीकृष्ण म्हणाला, ''अर्जुना, आता तू पूर्ण लक्ष दे.'' ।।६.३८।।

## निर्गुण निराकाराचे रूप दाखविण्याची प्रतिज्ञा

श्री ज्ञानेश्वरांचा आत्मविश्वाससुद्धा केवढा मोठा होता! भगवंताचे स्वरूप निर्गुण, निराकार, अव्यक्त असे आहे. ते दृष्टीला गोचर नाही. शब्दांनी व्यक्त करता येत नाही. ते अनिर्वचनीय रूप आहे. जड इंद्रियांना त्याचे ज्ञान होत





नाही. तरीसुद्धा आपले गुरू श्री निवृत्तिनाथ यांच्या कृपेने आपण ते बुद्धीला अनाकलनीय असलेले रूप पाहीन. अतींद्रिय ज्ञानाचे बळ प्राप्त करून जे दृष्टीला दिसत नाही ते आपण पाहीन. सद्गुरूंच्या त्या कृपेमुळे मी त्यावर व्याख्यान करीन व ज्या अरूप भगवंताचे रूप जसे मी पाहिले तसेच तुम्हाला ते दाखवीन. अतींद्रिय असलेले त्याचे स्वरूप इंद्रियांकरवी पाहता येईल असे मी गुरुकृपेने करेन, असे ज्ञानदेव म्हणाले. ही त्यांची प्रतिज्ञाच होती. ज्ञानेश्वरी लिहिण्यामागील हा त्यांचा हेतू होता.

मराठी भाषेच्या नगरीत ब्रह्मविद्येचा सुकाळ करण्याची त्यांची इच्छा होती. ते स्वतः गुरुपरंपरेने नाथपंथीय होते. त्यामुळे ज्ञानेश्वरांच्या विचारसरणीवर नाथपंथातील तत्त्वज्ञानाचा ठसा उमटला आहे. ज्ञानेश्वरीत अद्वयानंदवैभव, अष्टांगयोग, दलितोद्धाराची प्रेरणा, मराठी भाषेची प्रशंसा म्हणजे हा नाथपंथीयांचाच वारसा होय. नाथपंथाप्रमाणेच शांकर वेदान्त व काश्मिरी शैवमत यांचेही संस्कार त्यांच्या मनावर झाले होते. तरीसुद्धा कोणतीही एकांगी भूमिका न स्वीकारता स्वतंत्र दृष्टिकोन ठेवून ज्ञानेश्वरीत आपले स्वतंत्र तत्त्वज्ञान मांडले आहे. निर्गुण, निराकाराचा ध्यास घेतला पण सगुण-साकाराला मागे टाकले नाही. भक्तीचा पुरस्कार केला पण ज्ञानाची प्रतिष्ठा ढळू दिली नाही. ''अहो ऐक्याचे मुद्दल न ढळे । आणि साजिरेपणाचा लाभ मिळे ।'' असे अमृतानुभवात सांगून टाकले. म्हणून त्यांनी आपल्या तत्त्वनिरूपणात सगुण-निर्गुणाची बेमालूम सांगड घातली. त्यात निर्गुणाची शुद्धता आहे पण रुक्षता नाही. सगुणाची सहृदयता आहे पण शबलता नाही. ज्ञानी जिला स्वसंवित्ती म्हणतात, योगी (शैव) जिला शक्ती म्हणतात, तिलाच आम्ही श्रेष्ठभक्ती म्हणतो (१८.११२७) असे ते स्वतःच सांगतात. याप्रमाणे वेगवेगळ्या पंथांतील उत्कृष्ट प्रवृत्तींचा योग्य समन्वय करून त्यांनी आपल्या अद्वैतनिष्ठ कर्मप्रधान भक्तिपंथाची उभारणी केली.

सगुणरूप हे निर्गुणाकडे जाण्यासाठी कारणीभूत ठरते हे ज्ञानेश्वरांचे म्हणणे होते. आत्मसाक्षात्कार झाला की, जगद्विवर्त नाहीसे होते आणि परब्रह्माची अनुभूती येते. ईश्वराच्या सगुण रूपाबरोबर निर्गुण परब्रह्माविषयी, ईश्वराच्या अव्यक्त रूपाविषयीची सखोल चर्चा गीतेप्रमाणे ज्ञानेश्वरीत सविस्तर केली आहे.

अशा या निर्गुण रूपाचेसुद्धा दर्शन मी घडवेन असे माऊली म्हणते.

माऊलींनी वर्णन केलेल्या ईश्वराचे रूप दुसऱ्या ओवीत (६.३७) आले आहे. हा ईश्वरभक्तांसाठी अवतार धारण करणारा आहे. जेवढे म्हणून धर्म आहेत तेवढ्या सर्वांचे प्रत्येक युगात रक्षण करावे हाच ईश्वराचा धर्म आहे. म्हणून ज्या वेळी अधर्म धर्माचा पराभव करतो, त्या वेळी आपले अव्यय, निर्गुण, निराकार, जन्मरहितपणा बाजूला ठेवून परमेश्वर साकार स्वरूपात अवतार घेतो. सज्जनांच्या रक्षणासाठी व धर्माच्या प्रतिष्ठापनेसाठी युगायुगातून तो असा जन्म घेतो. गीतेच्या दहाव्या अध्यायात 'शस्त्रधाऱ्यांमध्ये मी राम आहे,' असे भगवान श्रीकृष्ण म्हणतात. ज्या वेळी असे अवतार प्रकट होतात तेव्हा जगात असुरी शक्तीचा पराभव होऊन दैवीगुणांची प्रतिष्ठापना होते. सात्त्विकता, आनंद, नीती, दया असे गुण प्रकर्षाने दिसतात.

ज्ञानेशांच्या मते, अशा ईश्वराच्या ठायी सहा गुण असतात. म्हणून त्या ईश्वराला षड्वैश्वर्यसंपन्न, 'षड्गुणाधिकरणु' असे म्हटले आहे. यश, लक्ष्मी, उदारता, ज्ञान, वैराग्य आणि ऐश्वर्य असे सहा अलौकिक गुण त्याच्या ठायी आहेत. असा हा ईश्वर सच्चिदानंदस्वरूप असल्यामुळे सर्वांना आनंद देणारा आहे. जिथे त्याचे वास्तव्य असते तेथे यश, विजय, नीती, औदार्य ही ठेवलेलीच असतात. तो भक्तांसाठी दयाळू, वत्सल आहे. भक्ताच्या एकनिष्ठ, अनन्य भक्तीला साद घालणारा आहे. ईश्वराचे औदार्य असे आहे की, पात्रापात्र विचार न करता मोक्षासारखी पवित्र वस्तू ईश्वराने आपल्या शत्रूंनाही दिली. ईश्वराला मारण्यासाठी आलेल्या पूतनेला सनकादिकांच्या बरोबरीने मोक्ष दिला. राजसूय यज्ञाच्या प्रसंगी प्रत्यक्ष ईश्वराचा पाणउतारा करणाऱ्या शिशुपालाला त्याने मुक्त केले. प्रत्यक्ष भगवंताला लाथ मारणाऱ्या भृगूंच्या पावलाची खूण त्याने छातीवर धारण केली. बळीचा तो द्वारपाल झाला. असा हा परमेश्वर

ॐ

दयेचा सागर आहे. भक्तवत्सल आहे. संकटातून भक्तांना तारणारा आहे. स्वतः सर्व जगाचे तोच मूळ आहे. चराचर सृष्टीला व्यापून दशांगुळे उरला आहे. सर्वशक्तिमान, सर्वज्ञ असूनही, कर्मे करून अलिप्त आहे. वैभवाच्या राशीवर बसूनही वैराग्यसंपन्न आहे. त्रैलोक्याचा अधिपती असूनसुद्धा, तितकाच विनम्र आहे. सुदाम्याच्या मूठभर पोह्यासाठी त्याने त्याला सोन्याची नगरी दिली. राजसूय यज्ञाच्या वेळी हलकी कामे करणारा कृष्ण एवढा उदार की त्याने मिळविलेली राज्येसुद्धा परत केली.

असे सहा गुण ज्या ठिकाणी दिसतात ते ईश्वराचे रूप असते. त्यालाच भगवंत असे म्हणतात. असा भगवंत भक्तांच्या हाकेला साद देतो. सर्वसंगपरित्याग करून, शुद्ध भावनेने हाक घालणाऱ्या भक्तांना तो आपल्या ठिकाणी स्थान देतो. त्यांना ईश्वररूप करून सोडतो.

**दिनांक २ व ३ ऑक्टोबर**

**असो रूपक हे तो ईश्वरु । सकल भूतांचा अहंकारु ।**
**पांघरोनि निरंतरु । उल्हासत असे ।।१८.१३०२।।**
**स्वमायेचे आडवस्त्र । लावूनि एकला खेळवी सूत्र ।**
**बाहेरी नटी¹ छाया चित्र । चौऱ्यांशी² लक्ष ।। १८.१३०३।।**

*शब्दार्थ - १) नाचवितो, नटवितो २) चौऱ्यांशी लक्ष योनी*

**अर्थ** - हे रूपक राहू दे. सर्व प्राणिमात्राच्या ठिकाणी "मी अमुक आहे" अशा रीतीने स्फुरणारा जो (समष्टी) अहंकार, तो पांघरून तो ईश्वर अखंड प्रकट आहे. ।।१८.१३०२।।

तो ईश्वर आपल्या मायेचा पडदा पुढे लावून आतून एकटाच दोरी हलवितो व पडद्याच्या बाजूला चौऱ्यांशी लक्ष (योनीरूपी) छायाचित्रे नाचवितो. ।।१८.१३०३।।

## ईश्वर सर्वांच्या हृदयात आहे

हे सर्व ईश्वराचे वर्णन आहे. माया विशिष्ट चेतनाला ईश्वर म्हणतात. तो नित्यमुक्त, शुद्धसत्त्व, सगुण व निराकार आहे. श्रीरामादी अवतार त्याचे असतात. सर्व जगावर त्याची सत्ता चालते. त्यामुळे तो सर्वज्ञ, सर्वसाक्षी, सापेक्षव्यापक व सर्वशक्तिमान आहे. ह्या गुणांना ब्रह्माची तटस्थ लक्षणे म्हणतात. तो नियामक असून जडचेतनात्मक सृष्टीनियम्य आहे. ब्रह्माची उपासना करता येत नसल्यामुळे (केनोपनिषद) ईश्वराच्या अवतारांच्या उपासना करून त्याला प्रसन्न करता येते.

सर्व जीवसृष्टीचा समाविष्ट अहंकार हे त्याचे स्वरूप असून तो सतत आनंदी असतो. स्वतःच्या मायेच्या पडद्याआड राहून तो एकटाच पडद्यापलीकडील ब्रह्मांडाचे सूत्र खेळवितो. चौऱ्यांशी लक्ष जीवांची कळसूत्री बाहुली नाचवितो.

नारायणरूप ईश्वरामुळे जगाची उत्पत्ती, स्थिती व प्रलय होतात. त्रिभुवनांचा तो शास्ता आहे. सर्व संत उपासनेच्या संदर्भात ईश्वराचाच उल्लेख करतात. तसेच सर्व जीवन त्याच्या विधी-निषेधात्मक आज्ञांनुसार असावे असेही सांगतात. म्हणून सोळाव्या अध्यायात माऊली म्हणते -

**तरी विश्व हा अनादि ठावो । येथ नियंता ईश्वर रावो ।**
**चावडिये न्यावो अन्यावो । निवडी वेदु ।।१६.२९५।।**



ॐ

**अर्थ** - तरी विश्व हे ठिकाण अनादि चालत आलेले आहे व याचे नियमन करणारा राजा ईश्वर आहे व न्याय-अन्याय यांचा निवाडा वेद चावडीवर (उघडपणे) करतात.

अशी ही विश्वव्यवस्था आहे. या विश्वावर सर्वेसर्वा तो ईश्वर आहे. अशा ईश्वरावाचून या जगात काहीही नाही. तोच एक सर्वत्र भरून उरला आहे.

पहिल्या ओवीत 'असो रूपक हे' असे म्हटले आहे. हे रूपक आधीच्या म्हणजे १३०१ व्या ओवीत आहे. ते असे - "दृश्य जगत्‌रूपी पाण्याच्या सरोवरात विषयरूपी कमळे उमलली असता, पंचज्ञानेंद्रिये व सहावे मन हे सहा पाय असलेल्या जीवरूपी भ्रमराकडून त्या कमळाचे सेवन तो ईश्वररूपी सूर्य करवितो."

आता हे रूपक वर्णन तसेच ठेवून असे म्हणून पुढील ओवीत ईश्वराचे स्वरूप वर्णन केले आहे. मी अमुक आहे असे जे सतत स्फुरण चाललेले असते ती बुद्धी म्हणजेच तो ईश्वर होय. पंधराव्या अध्यायात यास 'वस्तु' म्हटले आहे. तोच आपल्या दैवीमायेच्या आधाराने सर्व भूतमात्रांना कळसूत्री बाहुल्याप्रमाणे नाचवितो. सर्वांचा सूत्रधार तोच आहे. ब्रह्मदेवापासून तो किड्यापर्यंत सर्व प्राणिमात्रांना त्यांची योग्यता पाहून शरीराकार दाखवितो. वारा जसा गवताच्या काड्यांना आकाशात फिरवितो त्याप्रमाणे ईश्वर या प्राण्यांना स्वर्गसंसारामध्ये फिरवितो. तो ईश्वर हा मालक आहे. तो ह्या प्रकृतीवर अधिकार चालवितो व ती प्रकृती प्राण्यांच्या इंद्रियांकडून ज्यांची त्यांची कामे सहज करून घेते. तोच सर्व प्राण्यांमध्ये हृदयरूपी मोठ्या आकाशात ज्ञानवृत्तीच्या सहस्र किरणांनी युक्त असा हा ईश्वररूपी सूर्य उगवलेला आहे. असे भाष्य माऊली गीतेतील ६१ व्या महान श्लोकावर करते.

**ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशेऽर्जुन तिष्ठति ।**
**भ्रामयन् सर्वभूतानि यंत्रारुढानि मायया ।।१८.६१।।**

**अर्थ** - हे अर्जुना, (शरीररूपी) यंत्रावर (जणू काय) आरूढ झालेल्या सर्व भूतांना (आपल्या) मायेच्या योगाने फिरविणारा ईश्वर, सर्व भूतांच्या हृदयात स्थित आहे.

म्हणूनच सर्व प्राणी हालचाल करतात. मृण्मय शरीरात जोपर्यंत तो चिन्मय असतो तोपर्यंत हे शरीर सर्व हालचाल करते. पण जेव्हा तो या शरीरातून निघून जातो तेव्हा हे शरीर म्हणजे पालापाचोळाच होते. त्या ईश्वराचाच अंश आपल्या आत्मरूपाने शरीरात राहतो. म्हणून एका ईश्वरावाचून या जगात काहीही नाही. "ममैवांशो जीवलोके जीवभूतः सनातनः ।" हे भगवंतांनी स्वतःच सांगितले आहे.

या ईश्वराची व्याप्ती मोठी आहे. विभूतियोगात भगवंतांनी आपल्या विभूती सांगताना व्यापकत्वही स्पष्ट कले आहे. या सर्व विभूती भगवंताच्या एकाच अंशाने विस्तारल्या आहेत. म्हणजे ईश्वराचे संपूर्ण स्वरूप केवढे असेल याची मानवी बुद्धीला कल्पनाही करता येणार नाही. "अंतःकरणातला आत्मा मी आहे, देवात इंद्र, इंद्रियात मन, भूतांच्या ठायी चेतना, रुद्रात शंकर, यक्षात कुबेर, वाणीत ओंकार, वसूंमध्ये अग्नी, यज्ञात जपयज्ञ, स्थावरात हिमालय, आयुधात व्रज, विद्यात अध्यात्मविद्या, पक्ष्यात गरुड, देवर्षीमध्ये नारद, पर्वतात मेरू, महर्षीत भृगु, वेगवान वस्तूंमध्ये वायू, शस्त्राधाऱ्यात राम, नियमन करणारांमध्ये यम, ज्ञानी माणसाचे ज्ञान... अशा ७५ विभूती भगवंतांनी सांगितल्या. तो एकच देव सर्व प्राण्यांत आहे. तोच सर्व कर्मांचा अधिष्ठाता आहे. या विश्वात सर्व ठिकाणी, ईश्वराशिवाय दुसरे काहीही नाही.

अशा या परमेश्वराच्या रूपाचे वर्णन वेदांनाही करता आले नाही म्हणून त्याचे सत्यस्वरूप जाणणे केवळ अशक्य आहे.

असे असले तरी, अशा अगम्य, अतर्क्य, अनिर्वचनीय, अव्यय, अरूप, अगोचर, अविनाशी, परमेश्वराला प्राप्त करता येऊ शकते असे माऊली आत्मविश्वासाने सांगतात.

ॐ

**दिनांक ४ व ५ ऑक्टोबर**

**तरि व्यक्त[१] आणि अव्यक्त[२] । हे तूचि एक निभ्रांत ।**
**भक्ती[३] पाविजे व्यक्त । अव्यक्त योगे ।। १२.२३।।**
**या दोनी जी वाटा । तूते पावावया वैकुंठा ।**
**व्यक्ताव्यक्त दारवंठा[४] । रिगिजे येथ ।।१२.२४।।**

*शब्दार्थ - १) साकार २) निराकार ३) भक्तीने ४) दरवाजाने*

**अर्थ** - तर व्यक्त रूपाने अथवा अव्यक्त रूपाने तूच एक आहेस. याविषयी (माझ्या मनात) संशय नाही. भक्तीने व्यक्त स्वरूपाची व योगाने अव्यक्त स्वरूपाची प्राप्ती होते ।।१२.२३।।

हे वैकुंठा, व्यक्त व अव्यक्त असा जो तू, ज्या तुझ्या प्राप्तीच्या उंबऱ्यात सोडणारे, भक्ती व योग हे दोन मार्ग आहेत. ।।१२.२४।।

## सगुण व निर्गुण यांचा निवाडा

गीतेत तसेच ज्ञानेश्वरीत एकदा निर्गुणाची तरफदारी तर एकदा सगुणाचे माहात्म्य असे दोन्हीही तेवढ्याच प्रभावाने वर्णिले आहेत.

पण याचा निवाडा बाराव्या अध्यायात भगवंताने केला आहे. सगुण-निर्गुण यात द्विधा मनःस्थिती न करता, निःशंक झाले पाहिजे. भगवंताने नेमकी ही वाट दाखविली आहे. भक्तियोग समजण्यासाठी आपली मनोभूमिका पक्की झाली पाहिजे. त्यामुळे भक्तीत आपली प्रगती अधिक वेगाने होऊ शकते.

अकराव्या अध्यायात श्रीकृष्णाने आपले विश्वरूप अर्जुनाला दाखविले. ते अलौकिक रूप पाहून अर्जुनाच्या मनात भीती निर्माण झाली. म्हणून श्रीकृष्णाच्या सगुण रूपाचाच अर्जुनाने ध्यास घेतला तेव्हा सगुण मूर्तीवर प्रेम न ठेवता भगवंताच्या श्रेष्ठतम रूपाचीच पूजा करण्याविषयी भगवंताने अर्जुनाला सांगितले. म्हणून अर्जुन बाराव्या अध्यायात यासंबंधीचा मौलिक प्रश्न विचारतो आहे. भक्तीने साकाराची पूजा व योगाने निराकाराची भक्ती करता येते याबद्दल अर्जुनाच्या मनात संशय नाही. भक्ती व योग या दोन्ही मार्गांनी भगवंत प्राप्त होतो याबद्दलही त्याला संदेह नाही. म्हणून तो विचारतो की, या दोन्हीत श्रेष्ठ मार्ग कोणता आहे?

यावर भगवंतांनी जे उत्तर दिले, तेच भक्तीचे खरे तत्त्व आहे. अर्जुनाच्या निमित्ताने सर्वांनाच हा मार्ग दाखवून, सगुण-निर्गुणाचा निवाडा केला आहे. भगवंत म्हणतात की, दोन्हीही मार्ग भगवंताजवळ नेणारे आहेत. रात्रंदिवस जे अनन्यभक्तीने, भगवंताला आत्मभाव अर्पण करतात त्यांना मी श्रेष्ठ प्रतीचे योगयुक्त समजतो, असे भगवंत स्पष्ट करतात. पण जे निर्गुण उपासक 'ते ब्रह्म मी आहे' या दृढभावनेने अवयवरहित व अविनाशी अशा ब्रह्माची भक्ती करतात. सर्वत्र समभाव ठेवून इंद्रियसमूहांचे नियमन करून निर्गुणाची पूजा करणारेसुद्धा मलाच येऊन मिळतात. पण निर्गुणाची ही वाट अधिक क्लेशकारक आहे असे भगवंत म्हणतात -

**म्हणौनि योगाचिया वाटा । जे निगाले गा सुभटा ।**
**तया दुःखाचिया वाटा । भागा आला ।। १२.६९ ।।**

''म्हणून अर्जुना, या योगाच्या वाटेने माझी प्राप्ती करून घेण्याकरिता जे निघाले त्यांच्या वाट्याला दुःखाचाच भाग आला,'' असा निर्वाळा भगवंताने अर्जुनाला दिला. सर्व कर्मे भगवंताला अर्पण करून, अनन्यभक्तीने जे भगवंताची उपासना करतात, त्यांना अल्पकाळातच मृत्युरूप संसारसागरातून भगवंत पार करतात. हे भगवंताचे आश्वासन आहे.



ॐ

गीतेत पुरुष आणि अव्यक्त अशा ईश्वराच्या सगुण आणि निर्गुण रूपांचे निरूपण आहे. सर्व कर्मांचा कर्ता ईश्वरच असला तरी परमार्थतः तो अकर्ता व अव्यय आहे. अव्यक्तरूपाने हे सर्व विश्व ईश्वराने व्यापले आहे. दोऱ्यामध्ये ज्याप्रमाणे मण्यांचा समुदाय गुंफावा, त्याप्रमाणे सर्व जग ईश्वरातच गुंफलेले आहे. ज्ञानेश्वर याला 'ईश्वरसत्तायोग' (१८.१३३१) असे म्हणतात. ईश्वराच्या सत्तेनेच प्रकृती प्राण्यांच्या इंद्रियांकडून ज्यांची त्यांची कामे करवून घेते. निर्गुण परब्रह्मातून, चैतन्यांतून सगुण, साकार सृष्टी व अचेतन निर्माण होते. दृश्य जगत् केवळ प्रातिभासिक सत्ता आहे. अंतिम, चिरंतन सत्य नव्हे.

जे काही आहे ते उत्तम पुरुषच आहे.

**ऐसे आथि जे काही । ते तो उत्तम पुरुष पाही**
**जे परमात्मा इही । बोलिजे नामी ।। १५.५३५।।**

असा हा ईश्वर अविनाशी, सम, कर्ता, अज, अक्षर शास्ता, प्रभू, माता-पिता, वेत्ता आणि गुरूंचा गुरू आहे. हा सगुण ईश्वर आहे. याप्रमाणे भगवंताच्या सगुण व निर्गुण या दोन्ही रूपांचे वर्णन गीतेत आले आहे.

अलंकार व सोन्याची लगड या दोन्हींचे होणे जसे एका आधारभूत सोन्यावर असते, त्याप्रमाणे आकार व निराकार यांचा विचार चैतन्याच्या ठिकाणी असतो. आकार व निराकार या दोन्हींना चैतन्यच आधार आहे. एकाच चैतन्याची सगुण व निर्गुण या दोन अभिव्यक्ती झाल्या.

या दोन्हीतून जनसामान्यांनी सगुणाचीच कास धरावी आणि त्यासाठी अनन्यभावाने भक्तियोग आचरावा हीच भगवान श्रीकृष्णांची आज्ञा आहे, असे बाराव्या अध्यायातील भक्तियोगावरून स्पष्ट होते.

म्हणून दोन्हींचे एकत्व दाखवून देताना श्री ज्ञानेश्वर महाराज म्हणतात,

**तुज सगुण म्हणो की निर्गुण रे ।**
**सगुण-निर्गुण (दोन्ही) एक गोविंद रे ।।**

पायरी पायरीनेच साधकाला सगुण भक्तीच्या अभ्यासाने, भगवंताचे सर्वज्ञत्व, सर्वशक्तिमत्व व सर्वसाक्षित्व समजून घ्यावयाचे असते. सगुणाच्या आधारानेच साधकाला निर्गुणाची प्राप्ती करून घ्यावयाची आहे. 'सगुण-निर्गुण दोन्ही विलक्षण' जरी असले तरी सगुण ही भक्ताची सोय आहे, व्यवस्था आहे, हे मात्र सतत ध्यानात असावयास हवे. निर्गुण, निराकार भगवंताने भक्तासाठी सगुणरूप धारण केले. तेही देहधारी मनुष्याला भक्ती सहजसाध्य व्हावी म्हणून. म्हणून अवताररूपाने स्वतः आचरण करून आदर्श भक्तीचा वस्तुपाठ दाखविला.

**दिनांक ६ ऑक्टोबर**

**पै अर्जुना माझा ठायी । आपणपेनवीण सौरसु[१] नाही ।**
**मी उपचारी कवणाही । नाकळे गा ।। ९.३६७।।**

*शब्दार्थ - १) गोडी*

**अर्थ** - अर्जुना, भक्ताने आपला जीवभाव अर्पण केल्याशिवाय मला आनंद होत नाही. अरे, मी (इतर दुसऱ्या) कोणत्याही उपचारांनी कोणालाही वश होत नाही.

## भक्तीत सर्वस्वाचे समर्पण

आतापर्यंत आपण भगवंताच्या स्वरूपाची चर्चा केली. भक्तियोगात भगवंत कसा आहे हे समजल्याशिवाय भक्तीला धार येत नाही. भगवंत - भक्त - भक्ती यांचे ज्ञान होणे म्हणजेच भक्तियोग यथार्थ समजणे होय.

चराचर व्यापणाऱ्या अशा ईश्वराला सगुण-साकार रूपात पाहण्यासाठी मनुष्यानेच पूजनप्रकार निर्माण केले. श्री ज्ञानेश्वरांनी अज्ञानमूलक भक्तीचे खंडन केले आहे. पण सगुण भक्ती म्हणजेच अज्ञानमूलक भक्ती असासुद्धा गैरसमज होण्याची शक्यता त्या वर्णनावरून आहे. म्हणून भक्तीचे स्वरूप समजून घेताना याचा परामर्श घेणे जरुरीचे आहे. परमात्मा देहरहित असतो म्हणून त्याच्यावर देहधर्माचा आरोप केल्यामुळे सगुणोपासना करू नये असा अर्थ निष्पन्न होत नाही. उलट ईश्वराचे यथार्थ स्वरूप समजावून घेऊन मगच सगुणोपासना करावी, असा ज्ञानेश्वरांचा आग्रह आहे. आपण ज्या मूर्तीची पूजा करतो ती स्थूलपूजा आहे. त्या मूर्तीतच केवळ ईश्वर आहे व इतरत्र नाही असा याचा अर्थ नाही. मूर्तीत पाहता पाहता मूर्ती एवढी विशाल करायची की, त्याचे दर्शन त्याच्या साऱ्या विश्वात व्हायला लागेल. अवघ्या विश्वाला व्यापून तो उरलेला असतो. असे हे त्याचे विश्वव्यापी स्वरूप समजून घेऊन नंतरच भक्ती करावी.

परमेश्वराचे हे सर्वव्यापकत्व समजल्यावर सगुणोपासनेला काही अर्थ प्राप्त होतो. म्हणून अज्ञानमूलक भक्तीचे खंडन करीत असताना माऊलींनी जी विशेषणे वापरली त्याचा अर्थ नीट समजून घेणे जरुरीचे आहे. भगवंताला 'अनाम्या' म्हटले आहे. कारण तो नामरूपात्मक संबंधाच्या पलीकडचा असतो. नामाचा संबंध रूपाशी असतो व जे जे नामरूपात्मक असते त्याला अंत असतो. परंतु ईश्वर हा अनादी असल्यामुळे अनंत आहे. त्याला प्रारंभ व शेवट नाही. तरीसुद्धा निर्गुण-निराकार ही संकल्पना सामान्य माणसाच्या बुद्धीपलीकडील असल्यामुळे भक्तांनीच परमात्म्याला अनेकविध नावे दिली आहेत. त्यामुळे हा भाव लक्षात ठेवून केलेल्या भक्तीला योग्य दिशा लाभते. माऊलींनी ईश्वराला 'अक्रिय' असे म्हटले आहे. म्हणजे जो कर्माच्या बाबतीत उदासीन, अनासक्त, अनहंकारी असल्यामुळे ज्याला कर्मे बाधत नाहीत असा. त्याला 'विदेही' असे म्हटले आहे. कारण त्याला जन्म नाही. म्हणून त्याला देहही नाही. त्यामुळे अस्ति, जायते, वर्धते, विपक्षीयते, विपरीणमते व क्षीयन्ते अशा मनुष्याच्या जीवनाच्या सहा अवस्था त्याला नाही आहेत. तो विकारी नसल्यामुळे विदेही आहे.

असा हा भगवंत भक्ताकडून केवळ त्याचा जीवभाव मागतो. तर कोणत्याही लौकिक उपचारांनी, साधनांनी त्याला वश करता येत नाही. कायिक, वाचिक, मानसिकदृष्ट्या ज्यांनी भगवंताला आपले सर्वस्व दिले त्याच्याच भक्तीने भगवंत प्रसन्न होतो. तो भक्त देहभाव विसरून आत्मभावातच रममाण झालेला असतो. भगवंतावर तो प्रेमभावाने भक्ती करतो. आपल्या जीवनाचे सर्वस्व त्या ईश्वरालाच मानून सर्वभावे त्याची पूजा करतो. भगवंत अशा समर्पित भावालाच प्रतिसाद देतो.

**दिनांक ७ ऑक्टोबर**

**जया भक्तीची येतुली[1] प्राप्ती । जे कैवल्यातें[2] परौतें[3] सर म्हणती ।**
**जयांचिये लीलेमाजी[4] नीति । जियाली[5] दिसे ।। ९.१९२।।**

*शब्दार्थ - १) इतकी २) मोक्षाला ३) दूर ४) वर्तनात ५) जगली*

**अर्थ** - ज्यांना भक्तीची एवढी प्राप्ती (झालेली) असते की ते मोक्षाला, 'पलीकडे हो' असे म्हणतात. ज्यांच्या सहज कर्माचरणांमध्ये नीती जगलेली दिसते.

## भक्तीपुढे मोक्षसुद्धा तुच्छ

दैवीप्रकृतीचा आश्रय करणारे महात्मे अनन्य होऊन भगवंताची भक्ती करतात. अशा भक्तांना सगुण भगवंताचे इतके प्रेम असते की, त्यापुढे ते मोक्षसुखालाही दूर सारतात. या त्यांच्या वृत्तीमध्येच धर्माचे व नीतीचे जगणे असते.





अशा लोकांचा सर्व व्यवहार, शुद्ध भावनेने होत असल्याने त्यात परकल्याणाचे स्वरूप अधिक असते.

आपल्या निर्गुणाचे वर्णन भगवंतांनी विस्ताराने केल्यावर अर्जुनाने आपला अभिप्राय दिला. 'भगवंत आपले म्हणणे यथार्थ आहे,' असे म्हटल्यावर भगवंतांनी त्याला आपल्या वाणीला विसावा वा सुख मिळावे म्हणून सत्पुरुषाची कथा सांगण्यास प्रारंभ केला – 'अशा सत्पुरुषांचे अंतःकरण निर्मळ असते. ते झोपी गेलेले असतानादेखील त्यांची निद्रा योगनिद्रा झालेली असते. त्यामुळे त्यांचे वागणे वैराग्यपूर्ण असते. त्यांना अधर्माचा स्पर्श होत नाही. त्यांचे आचरण शास्त्रमर्यादा सोडत नाही.

हे सत्पुरुष नित्य ज्ञानगंगेत स्नान करीत असतात. ब्रह्मस्थितीचे भोजन करून नित्य तृप्त होतात. असे पुरुष म्हणजे ब्रह्मशांतीला फुटलेले कोवळे पल्लवच होत. नवीन निघालेले हे कोंभ म्हणजे धैर्यमंडपाचे खांब होत किंवा ब्रह्मानंदसागरात बुडविलेले घडेच होत. इतके प्रेम सत्पुरुषांच्या मनात भगवंताविषयी असते. या प्रेमसुखापुढे त्यांना मुक्तीची चाड नसते. अशा महात्म्यांमुळे धर्म व नीती जगात विस्तारत असते.

अशा भक्तासाठी भगवंत आपले निर्गुण, निराकार रूप सोडून देहधारी होऊन, दोनांच्या ऐवजी चतुर्भुजरूप धारण करून भक्तांना आलिंगन देण्यासाठी प्रकट होतात.

अशा भक्तांच्या मनांतील द्वैत नाहीसे झालेले असते. उपास्य व उपासक हा भेद नाहीसा झालेला असतो. असे हे दैवीप्रकृतीचे महात्मे हे भगवंताचेच स्वरूप होत. ईश्वर होऊन ते ईश्वराची सेवा करतात.

**दिनांक ८ ऑक्टोबर**

**कही[1] एकाधेनि[2] वैकुंठा जावे । ते तिही[3] वैकुंठचि केले आघवे ।**
**ऐसे नामघोषगौरवें[4] । धवळलें[5] विश्व ।। ९.२०३।।**

*शब्दार्थ - १) कधीतरी २) एखाद्यानेच ३) त्यांनी ४) नामस्मरणाच्या घोषाने ५) प्रकाशित झाले*

**अर्थ** - (पूर्वी असे होते की) कधीतरी एखाद्याने वैकुंठाला जावे, ते त्यांनी सर्व वैकुंठच केले. याप्रमाणे माझ्या नामघोषाच्या माहात्म्याने संपूर्ण विश्व प्रकाशित केले.

## कीर्तन, नामस्मरण ही श्रेष्ठ भक्ती

गीतेतील १४ व्या श्लोकावर निरूपण करताना श्री ज्ञानेश्वरांनी भक्तीच्या या सर्वांत सोप्या; रसाळ अशा कीर्तन व नामस्मरण भक्तीचे अतिशय वेधक, रसमय व बहारदार वर्णन केले आहे.

दैवीप्रकृतीचे महात्मे ईश्वराशी एकरूप होऊन प्रेमभावाने त्याची भक्ती करतात. त्यांना मोक्षाचासुद्धा मोह राहत नाही. सगुण रूपाची सेवा करताना त्यांच्या अनन्यभक्तीने भगवंतालासुद्धा त्यांच्या भेटीची ओढ असते. अशा भक्तांचे कौतुक ज्ञानदेव मोठ्या प्रेमाने करीत आहेत.

असे हे भक्त भक्तीच्या कठीण मार्गाने न जाता फक्त अखंड नामस्मरण करीत असतात. भगवंताच्या कथा ऐकतात. भगवंताच्या अलौकिक गुणांचे कीर्तन ऐकतात. त्यामुळे अंतःकरणशुद्धी होऊन ते पापापासून दूरच राहतात. म्हणून प्रायश्चित्तांची गरजच उरत नाही.

यम-नियम, मनोनिग्रह, इंद्रियनिग्रह, तपस्या, ज्ञानपूर्ण ध्यानसाधना, यज्ञयागादी कर्मकांड असे जटिल मार्ग न चोखाळता भगवंताच्या केवळ नामस्मरणाने ते प्रेमसुखात रंगून गेलेले असतात. केवळ नामस्मरणाने विश्वातील दुःखे नाहीशी होतात. सर्व जग भगवंताच्या नामस्मरणाने दुमदुमून जाते. म्हणून माऊली म्हणते -

ॐ

**ऐसे माझेनि नामघोषे । नाही करिती विश्वाची दुःखे ।**
**अवघे जगचि महासुखे । दुमदुमित भरले ।।९.२००।।**

**अर्थ** - याप्रमाणे माझ्या नामघोषाने ते विश्वाची दुःखे नाहीशी करतात व सर्व जगच ब्रह्मसुखाने जिकडेतिकडे कोंदून भरतात.

असा हा नामस्मरणाचा, कीर्तनाचा महिमा आहे. हा भक्त आपल्या नामाच्या बळावर वैकुंठालाच पृथ्वीवर घेऊन येतो. यापूर्वी कधीकधी एखादाच मनुष्य पृथ्वी सोडून वैकुंठाला जायचा. पण नामाच्या बळावर या श्रेष्ठ भक्तांनी आपल्या स्थानालाच वैकुंठ बनविले.

कीर्तनभक्तीवर येथे सुंदर भाष्य आहे. सर्व संतांनी याचा उद्‌घोष केला आहे. सर्वसामान्यांना करता येणारी ही सहजभक्ती आहे. परमेश्वराला अनन्य चित्ताने भजणे हेच फक्त येथे साधायचे असते. खऱ्या अर्थाने भगवंताचे नाम मुखात येण्यासाठी हजारो जन्म घ्यावे लागतात. या माऊलींच्या वक्तव्यात अतिशयोक्ती वाटत असली तरी एकाग्र चित्ताने, मन-बुद्धी अर्पण करून, शुद्ध अंतःकरणाने एकरूप होऊन नामस्मरण करणे हे तेवढेच कठीण आहे. चित्तामध्ये भगवंताचे नाम भरले की तेथे काम, क्रोध, लोभ अशा विकारांना थारा मिळत नाही. म्हणून संत तुकारामही म्हणतात -

**तुका म्हणे देह भरला विठ्ठले ।**
**काम क्रोधे केले घर रीते ।।**

देहात विठ्ठलाचे नाम भरले की, विकारांनी आपले घर खाली केले म्हणून समजावे.

नामस्मरणाचा प्रभाव चित्तशुद्धीवर अवलंबून असतो. अनन्यता प्राप्त होण्यासाठी निर्मळ चित्त असावे लागते. शुद्ध अंतःकरण हाच भक्तीचा पाया आहे. अशी चित्तवृत्ती झाली की मग भेदाभेद गळून पडतो. ईश्वररूप होऊन ईश्वराची पूजा करणारे हे भक्त कीर्तन व नामस्मरणाने भगवंताला साकार रूप घेण्यास भाग पाडतात.

**तरी कीर्तनाचेनि नटनाचे । नाशिले व्यवसाय प्रायश्चित्तांचे ।**
**ते नामचि नाही पापाचे । ऐसे केले ।। ९.१९७।।**

**अर्थ** - अशा या महानुभाव व भक्तांनी कीर्तनाच्या उत्कर्षाने प्रायश्चित्तांची कामे नाहीशी केली, कारण या महानुभावांनी पापाचे नावच नाहीसे केले.

कीर्तनभक्तीची थोरवी या एका ओवीतच ज्ञानदेवांनी सांगितली. या कीर्तनाच्या प्रभावाने जगातील पाप नाहीसे करून पुण्याची प्रतिष्ठापना केली. अशी कीर्तनभक्ती भगवंतालाही आवडते. जेथे त्याच्या नावाचा घोष चाललेला असतो तेथे त्याचे वास्तव्य हमखास असते. एकवेळ तो वैकुंठात सापडणार नाही, पण या भूलोकीच्या वैकुंठात मात्र नक्की सापडेल, असे माऊली म्हणते.

नामस्मरणात, कीर्तनात ईश्वराच्या गुणांचे स्मरण व कीर्तन करायचे. श्रेष्ठ भक्तांच्या कथा सांगायच्या, भक्तांना अभय देणाऱ्या भगवंताच्या शक्तीचे वर्णन करायचे व त्यातून समाजात धर्म व नीतीचा प्रचार, प्रसार करणे हेच कीर्तनाचे प्रमुख उद्दिष्ट असते.

भक्तियोगातील या प्रमुख साधनांचा महिमा येथे श्री ज्ञानेश्वरांनी रसपूर्ण शैलीत कथन केला आहे.

**दिनांक ९, १० व ११ ऑक्टोबर**

**ऐसे हे गहन[१] । अर्जुना माझे भजन ।**
**आता ऐके सांगेन । जे करिती एक[२] ।।९.२१९।।**



ॐ

**तरी दोन्ही पालव वेरी[३] । जैसा एक तंतू अंबरी[४] ।**
**तैसा मीवाचूनि चराचरी । जाणती ना ।। ९.२२०।।**
**आदि ब्रह्मा करुनी । शेवटी मशक[५] धरूनी ।**
**माजी समस्त हे जाणोनी । स्वरूप माझे ।। ९.२२१।।**

*शब्दार्थ - १) अवघड २) इतर लोक ३) पदरापर्यंत ४) वस्त्रात ५) चिलट*

**अर्थ** - अर्जुना, याप्रमाणे हे माझे (अष्टांगयोगाद्वारा होणारे) भजन फार कठीण आहे. आता किती एक मला दुसऱ्या प्रकाराने (नमनरूप भक्तीने) भजतात, तो प्रकार सांगतो. ।।९.२१९।।

तर वस्त्रांमध्ये ज्याप्रमाणे एका पदरापासून दुसऱ्या पदरापर्यंत एक सूतच असते, त्याप्रमाणे सजीव व निर्जीव पदार्थात, माझ्यावाचून दुसऱ्यास ते ओळखत नाहीत. ।।९.२२०।।

ब्रह्मदेवापासून आरंभ करून, अखेर चिलटापर्यंत मध्ये जे काही आहे ते सर्व माझे स्वरूप आहे, हे जाणून. ।।९.२२१।।

## नमनरूप भक्ती ही ज्ञानयुक्त

ईश्वराचे भजन करणाऱ्यांचे व त्यांच्या मनोवृत्तीचे सूक्ष्म वर्णन ज्ञानेश्वरांनी केले आहे. ज्या ठिकाणी ईश्वराचे गुणवर्णन होते, त्या ठिकाणी भक्तांना देहकालाचे भान राहत नाही. ते कीर्तनरूपच होऊन जातात. अशा भक्तांचे वर्णन केल्यानंतर १४ व्या श्लोकावरील निरूपणात ज्ञानेश्वर योगी पुरुषाचे दर्शन भजनरूपाने घडवितात. त्यांची भक्ती कशी असते? तर हे योगी पुरुष अंतःकरणातील परमात्म्याला जतन करण्यासाठी पंचप्राण व मन यांना मार्गदर्शन करतात. इंद्रियांची ओढ विषयाकडे जाऊ नये म्हणून ते शरीराच्या आतबाहेर यमनियमांचे काटेरी कुंपण करतात. मूळबंधाचा परकोट तयार करून त्यावर जागृत झाल्यावर ते ऊर्ध्वमुखी होऊन सतराव्या कलेचे अमृत प्राशन करतात. त्यांच्या मनात विकाराला स्थानही राहत नाही. प्रत्याहार, धारणा, पंचमहाभूतांची आटणी इ. सैन्याने मन, बुद्धी, चित्त, अहंकार यांचे व्यवहार बंद पाडतात. मग आम्ही जिंकले रे जिंकले म्हणून ध्यानाचे आवाज निघतात. तन्मयतेचे एकछत्र फडकू लागते. समाधीजलाने आत्मानुभवाच्या राज्यसुखावर त्याला अभिषेक होतो.

अर्जुना, अशा रीतीने योगमार्गाने होणारे माझे भजन अत्यंत अवघड व कष्टकारक आहे. या अष्टांगमार्गाकडे जनसामान्यांनी वळू नये असे ज्ञानेश्वरांना वाटते. हटयोगाच्या किंवा अष्टांगयोगाच्या मार्गाने जे परब्रह्माची अनुभूती घेऊ इच्छितात त्यांची वाट खडतर व दुःखमय असते याचा उच्चार त्यांनी बाराव्या अध्यायातही केला आहे. (१२.६९)

म्हणूनच दुसरी एक सोपी वाट माऊलींनी दाखविली आहे. ती म्हणजे ज्ञानयुक्त अशी नमनभक्ती होय.

ज्याप्रमाणे एखाद्या वस्त्रामध्ये दोन्ही पदरापर्यंत एकच तंतू किंवा एकच धागा उभा-आडवा विणलेला असतो, त्याप्रमाणे स्थावर जंगम पदार्थात अवघ्या चराचरात ईश्वरावाचून दुसरे काहीही नाही असे हे श्रेष्ठ भक्त ओळखतात. अगदी ब्रह्मदेवापासून सामान्यातल्या सामान्य चिलटापर्यंत सर्वत्र केवळ भगवंत भरून राहिला आहे, अशी ज्ञानी भक्तांची दृढ भावना असते. प्रत्येक वस्तूत तीच वस्तू, तोच ईश्वर आहे असे समजून त्यालाच साष्टांग दंडवत घालतात. अशी नम्रता या नमनभक्तीत असते. याचे वर्णन या ओव्यातून ज्ञानेश्वरांनी केले आहे.

आत्मज्ञान झाले की भेदाभेद संपतो. संपूर्ण जग जरी विविधतेने व भेदाभेदाने नटलेले असले तरी ते ईश्वरमयच आहे याची प्रचिती त्याला येते. याचा उच्चार माऊलींनी चौदाव्या अध्यायातही केला आहे.

ॐ

**तरी वस्त्रासी पाठी पोटी । नाही सुतावाचून किरीटी ।**
**ऐसे सुये दिठी । चराचर मद्रुपे ।। १४.३४९।।**

**अर्थ -** तर अर्जुना, वस्त्राच्या आतबाहेर जसे सुताशिवाय काही नसते, त्याप्रमाणे हे चराचर सर्व विश्व मद्रूप आहे असे तो मानतो.

त्यामुळे अशा भक्ताच्या मनातील द्वैतभाव निघून जातो. असा भक्त 'विश्व होऊनि विचरे विश्वामाजी ।' अशा भावस्थितीत वावरतो. एकाच चित् तत्त्वाचा हा सारा विलास आहे अशी त्याची मनोभूमिका दृढ होते. अशा समरस दृष्टीने ज्या वेळी दृष्टी उल्हसित होते तेव्हा तिला आपण खरी भक्ती मानतो, असे ज्ञानेश्वर म्हणतात. ''पृथ्वीमध्ये जितुकी शरीरे । तितुकी भगवंताची घरे ।'' असे संत रामदाससुद्धा म्हणतात. 'जे जे भेटे भूत । ते ते मानिजे भगवंत ।।' हाच भाव त्यात आहे. संत तुकारामांना हीच अनुभूती आली. 'विठ्ठल जळी स्थळी भरला । रीता ठाव नाही उरला । अजी म्यां दृष्टीने देखिला । विठ्ठलचि विठ्ठलचि ।।', 'जेथे देखे । तु तेथे तुझीच पाऊले ।' सर्व सृष्टीमध्ये भगवंताचा वास आहे असे ज्ञान या भक्तीत दृढ होते.

अशा ज्ञानी भक्ताच्या नम्रतेची प्रशंसा याच्या पुढील ओव्यांत (९.२२३ ते २२७) ज्ञानेश्वरांनी केली आहे. अशा भक्तास श्रेष्ठपणाची जाणीव नसते. समोर येणाऱ्या सर्व वस्तुमात्रांना नमस्कार करणेच त्याला आवडते. जसे फळांनी बहरलेले झाड स्वभावतःच वाकत असते तसा हा भक्त ज्ञानाने अहंकारी न होता नम्रतेने निरभिमानी होऊन अत्यंत प्रेमभावाने वागत असतो. अंतःकरणात विकार नसल्यामुळे शुद्ध भावाने सर्वत्र भगवंताचीच तो उपासना करीत असतो. भगवंताशी एकरूप होऊन त्याचे भजन करीत असतो. मी निराळा, ईश्वर निराळा व भजन निराळे असा त्रिपुटीचा व्यवहार त्यात नसतो. 'रामो रामे रमते' - मी रामाहून वेगळा अशी भावनाच नसते. 'देवो भूत्वा देवं यजेत्' 'रामो भूत्वा रामं यजेत' अशी त्याची या नमन भक्तीत भूमिका असते. 'देव पाहावया गेलो । तेथे देव होवोनिया ठेलो' अशी अवस्था भक्ताची होते. कोणत्याही प्रकारचा अभिमान नाही. देहात्मकता निघून गेलेली आहे. अहंकाराचा लवलेश नाही. अशी अवस्था होऊन तो भजन करीत असतो. त्यामुळे तदाकार होऊन नामस्मरण करताना नामाचा नामी होतो. जोपर्यंत नाम घेताना मी वेगळा आहे अशी भावना असते तोपर्यंत द्वैत असते. पण भगवंताशी एकरूप झाल्यामुळे राम होऊन रामाचे तो भजन करतो.

अशी तद्रूप, कृतार्थ व श्रेष्ठ अवस्था या भक्तास प्राप्त होते. याच भावाला ज्ञानेश्वरांनी नमनभक्ती किंवा गुरवीभक्ती असे म्हटले आहे. गुरवी म्हणजे श्रेष्ठ, व्यापक. या गुरवीभक्तीत परमात्म्यांशी एकरूप होऊन, सर्व ठिकाणी त्या परमात्म्याचे दर्शन घेणे व त्याच समदृष्टीने जगतातील समस्त भूतमात्रांकडे पाहणे व त्यांना नमस्कार करणे अभिप्रेत आहे. म्हणून माऊलींनी या भक्तीला श्रेष्ठ भक्ती म्हटले आहे.

**दिनांक १२ ऑक्टोबर**

**मग तो जीवु[१] हे भाष[२] सरे । आब्रह्म[३] परमात्मबोधे[४] भरे ।**
**एसे भजती ज्ञानाध्वरे[५] । एकत्वे[६] येणे ।।९.२४८।।**

*शब्दार्थ - १) जीवभाव २) भाषा ३) सर्वत्र, ओतप्रोत ४) माझ्या ज्ञानाने ५) ज्ञानयज्ञाने ६) एक भावाने*

## ज्ञानयुक्त भक्तीचा महिमा

योगयज्ञ, भजनयज्ञ यांचे वर्णन केल्यानंतर आता ज्ञानेश्वर ज्ञानयज्ञ करून परमेश्वराचे भजन कसे केले जाते याचे वर्णन करीत आहेत. त्या ज्ञानयज्ञामध्ये महामूळ संकल्प हा पशू बांधावयाचा खांब आहे. पंचमहाभूते हा मांडव



ॐ

आहे व द्वैत हा पशू आहे. नंतर पंचमहाभूतांचे जे शब्दस्पर्शादि विशेष गुण अथवा इंद्रिये व प्राण हीच यज्ञाची साहित्यसामग्री असून अज्ञान हे तूप आहे. तेथे मन व बुद्धी या कुंडात प्रज्वलित ज्ञानरूपी अग्नी असून, हे अर्जुना, सुखदुःखादि द्वंद्वाविषयी जी चित्ताची समता, ती वेदी (यज्ञाचा ओटा) होय. आत्मानात्मविचार करण्याविषयीची जी बुद्धीची कुशलता, तीच मंत्रविद्येची शोभा आहे. शांती ही यज्ञपात्रे असून जीव हा यज्ञ करणारा आहे. आत्मरूपाच्या मंत्राने या अग्निहोत्राचे अनुष्ठान करून यजमान सर्व भेदांचा नाश करतो.

या अग्निहोत्राचे अनुष्ठान पूर्ण झाले की, अज्ञानाचा नाश होतो. यज्ञ व यज्ञकर्ता यातील भेद नाहीसा होतो. परमात्म्याशी जीव मिळून जातो. संपूर्ण विश्वात मीच एक भरून राहिलो आहे याचा अनुभव आल्यामुळे 'मी जीव आहे' हेच तो विसरून जातो. ब्रह्मदेवापासून मुंगीपर्यंत, सर्व ब्रह्मरूपच आहे. अशा ज्ञानाने तो परिपूर्ण होतो. याप्रमाणे ज्ञानयज्ञाद्वारा ते या ऐक्य भावनेने माझे भजन करतात. अनेक अवयव असतात पण ते एकाच देहाचे असतात, तसे नानाविध रूपे जरी दिसली तरी त्यात मीच एक आहे असे अभिन्नतेचे ज्ञान त्यांना होते. माझ्या स्वरूपावाचून दुसरे काही नाही, असाच त्यांचा बोध असतो. त्यामुळे अशा ज्ञानाने मद्रूप होऊन अनेक आकारांनी ते जगात वावरत असतात. तृणापासून ब्रह्मदेवापर्यंत त्याला सर्व सृष्टी परमात्मस्वरूप भासते.

अशा ज्ञानमय भक्तीचा ज्ञानेश्वरांनी गौरव केला आहे. पराभक्तीच्या या स्थितीला पोहोचण्यासाठी अनंत जन्म मात्र उपासना करावी लागते. या ज्ञानमय भक्तीत विश्वात्मक देवाचे पूजन होत असते. अज्ञानाचा नाश झाला की आत्मबुद्धी स्थिरावून अद्वैताचा साक्षात्कार होतो. अशा भक्ताच्या सर्व क्रिया हे भगवंताचे पूजन असते. यालाच ज्ञानमय किंवा पराभक्ती असे म्हणतात.

**दिनांक १३ ऑक्टोबर**

**जो मज होय अनन्य शरण । त्याचे निवारी मी जन्म-मरण ।**
**यालागी शरणागता शरण्य[१] । मीचि एकु ।।९.२८८।।**

*शब्दार्थ - १) शरण जाण्यास योग्य, आश्रयस्थान*

**अर्थ -** जो मला एकनिष्ठपणाने शरण येतो, त्याचे जन्म व मरण मी दूर करतो. एवढ्याकरिता शरण आलेल्यांना शरण येण्यास योग्य असा मीच एक आहे.

## शरणागतता - अनन्यभक्ती

भगवंत भावाचा भुकेला आहे. जो भक्त काया, वाचा, मने केवळ भगवंताचाच विचार करतो व ज्याने आपल्या जगण्याचे उद्दिष्ट केवळ भगवंतप्राप्ती ठेवले आहे, त्याची भक्ती ही अव्यभिचारी असते. अनन्यभक्तीत हाच अव्यभिचारी भाव भक्ताच्या ठिकाणी असतो. अशा भक्ताला ईश्वराशिवाय, कोणत्याही सांसारिक वस्तूमध्ये रस नसतो. रात्रंदिवस भगवंताच्या ठिकाणी त्याचे अनुसंधान असते. सामान्य भक्त जसा सकाम भक्तीने काही मिळविण्यासाठी भगवंताचा धावा करतो तसा हा अनन्यभक्त नसतो. त्याला भगवंताशिवाय काहीही मिळवायचे नसते. पुढे २२ व्या श्लोकावरील निरूपणात या अनन्यभक्ताचे वर्णन आले आहे, 'अनन्याश्चिन्तयन्तो मी... योगक्षेमं वहाम्यहम् ।।'या मंगल श्लोकावरील हे भाष्य आहे.

**तैसा मीवाचूनि काही । आणिक गोमटेचि नाही ।**
**मजचि नाम पाही । जिणेया ठेविले ।।९.३३६।।**
**ऐसे अनन्यगतिके चित्ते । चिंतितसाते माते ।**
**जे उपासिती तयांते । मीचि सेवी ।।९.३३७।।**

ॐ

ते एकवटुनि जिये क्षणी । अनुसरले गा माझिये वाहणी ।
तेव्हांचि तयांची चिंतवणी । मजचि पडली ।।९.३३८।।

अर्थ - याप्रमाणे एकनिष्ठ चित्ताने माझे चिंतन करीत असताना जे माझी उपासना करतात, त्यांची सेवा मीच करतो. ते ज्या क्षणी एकनिष्ठ होऊन माझ्या मार्गाला लागले त्याच वेळेला त्याच्या संबंधाच्या काळजीचा भार माझ्यावर येऊन पडला.

मग जे जे म्हणून त्यास करावयाचे असते, ते सर्व मलाच करावे लागते. जसे पंख न फुटलेल्या पिल्लांच्या जगण्याने पक्षीण जगते.

अनन्यभावाने शरण आलेल्या भक्तांचा योगक्षेम मी चालवितो, हे भगवंताचे आश्वासन आहे. अशा भक्तांची सेवा मीच करतो. त्या भक्तांची सर्व काळजी मीच घेतो हे भगवंतांनी स्पष्ट म्हटले आहे.

अशा शरणागत झालेल्या भक्तांच्या इच्छेप्रमाणे, त्यांना द्वैत किंवा अद्वैतात ठेवून त्यांची इच्छा फलद्रूप करतो. एखाद्या एकनिष्ठ भक्ताला एकरूपच होऊन जायचे असेल तर तो अद्वैत भक्तीने ईश्वररूप होऊन जातो. पण भगवंत व भक्त हे द्वैत ठेवून जर भक्ती करायची इच्छा असेल तर, तो परमप्रेमाचा भाव ठेवून अंतर ठेवतो. अशा भक्ताच्या सर्व वृत्तींचे आश्रयस्थान तोच ईश्वर असतो.

अशा एकनिष्ठ भक्तांना जन्म-मरणाचा फेरा घ्यावा लागत नाही. अशा शरण आलेल्या भक्ताचा मी सर्वस्वी आधार होतो. स्वतः भगवंताला अनन्यभक्तीचे, शरणागतीचे अत्यंत कोतुक आहे. म्हणूनच अशा भक्ताची सेवा करण्यासाठी तो धावून येतो.

आपल्या सर्व वृत्ती एकनिष्ठतेने भगवंताला अर्पण करणे व आपल्या चित्तात भगवंताशिवाय दुसरा कोणताही लौकिक विषय न येणे याला अनन्यशरण असे म्हणतात. अशा अनन्यभक्तीत भक्ताला मुक्तीचे, मोक्षाचेसुद्धा आकर्षण राहत नाही.

'तुजवाचूनि काही व्हावे । ऐसे नको माझ्या जीवे ।' असे तुकारामांनी निष्काम बुद्धीने मागणे मागितले. अशा अनन्यभक्तीत भक्त भगवंताला शरण जातो. विश्वासकट सर्व परमेश्वरच आहे अशी अनुभूती घेऊन तोही ईश्वररूप बनून जातो.

**दिनांक १४ ऑक्टोबर**

म्हणोनि माझा स्वरूपी । मनबुद्धी इये निक्षेपी[1] ।
येतुलेनि[2] सर्वव्यापी । मीचि होसी ।।१२.१०२।।

*शब्दार्थ - १) ठेव २) एवढ्याने*

अर्थ - म्हणून माझ्या स्वरूपी मन व बुद्धी ही दोन्ही ठेव. एवढ्याने सर्वव्यापी जो मी, तोच तू होशील.

## तू मन व बुद्धी दे
(पहिल्या प्रकारची भक्ती)

बाराव्या अध्यायात माऊलींनी भक्तियोगावर साररूपाने भाष्य केले आहे. बाराव्या अध्यायाला गीतेत भगवान श्रीकृष्णांनी अमृतधारा असे म्हटले आहे. भक्तिशास्त्राचे मौलिक सिद्धान्त विशद करून भक्तीचे चार प्रकार, भक्ताच्या ठायी आवश्यक असणाऱ्या ३६ गुणांचे वर्णन तसेच सगुण-निर्गुण श्रेष्ठत्व असे भक्तीचे अत्यंत महत्त्वाचे विषय साररूपाने कथन केले आहेत.



ॐ

भगवंताची श्रेष्ठ भक्ती पहिल्या प्रकारात येते. भगवंत यात भक्ताचे मन व बुद्धी मागतो आहे. आपण भगवंताला सर्व काही देत असतो. प्रसाद म्हणून धनदौलत, नाना प्रकारच्या वस्तू अर्पण करतोच पण त्याचबरोबर व्रत-वैकल्ये, यज्ञयाग, पूजाअर्चा, तपदान, स्वाध्याय अशा अनेक मार्गांनी भगवंताची भक्ती दृढ करण्याचा प्रयत्न करतो. पण दोन गोष्टी मात्र आपल्याजवळच राहतात. मन प्रपंचात गुंतलेले असते व बुद्धी भोग-विषयात रमलेली असते. या दोन गोष्टींशिवाय अर्पण केलेली भक्ती भगवंतापर्यंत पोहोचत नाही. भगवंतानेच निर्माण केलेल्या वस्तू आपण भगवंताला अर्पण करत असतो. पण भगवंताची मन ही जी विभूती आहे ती आपल्याजवळच आपण ठेवतो. शरीररूपी रथाचा सारथी बुद्धी आहे. बुद्धीच्या हातात मनरूपी लगाम आहे. इंद्रियरूपी घोड्यांना विषयरूपी रस्त्यांवरून हा रथ घेऊन जायचा आहे. मन व बुद्धी ही दोन्ही शरीररूपी रथात सर्वश्रेष्ठ आहेत. ह्या दोन्ही गोष्टीं जो भगवंताला अर्पण करतो तो श्रेष्ठ भक्त होय.

भक्तियोगात 'मय्यावेश्य मनो ये मां' हा भक्तीचा कणा आहे. 'नित्ययुक्ता उपासते' हा आग्रह आहे. म्हणून या अध्यायाच्या दुसऱ्या पवित्र श्लोकात भगवंतांनी सर्वांत उत्तम भक्ताचे वर्णन केले आहे. ''माझ्या ठिकाणी मन ठेवून नेहमी युक्तचित्त होत्साते, परमश्रद्धेने जे माझी उपासना करतात, ते माझ्या मते सर्वांत उत्तम युक्त म्हणजे योगी होत,'' (१२.२) असे भगवंत आपले मत सांगतात.

भगवंताशी सतत जोडले जाणे म्हणजे नित्ययुक्त. भक्ती ही काही काळापुरती, विशिष्ट वेळेपुरती करायची नसून सतत अनुसंधान ठेवून भगवंताचे स्मरण होणे म्हणजे भक्ती होय. सकाळी अर्धा तास भगवंताची पूजा व बाकीचा काळ मन-बुद्धीला प्रपंचाचा ध्यास यात आपण आत्मसंतुष्टसुद्धा होऊ पण भगवंताला अभिप्रेत असणाऱ्या भक्तीला इथे कुठे स्थान आहे?

मन व बुद्धी मागत असताना भगवंत भक्ताचे सर्वस्व होऊ पाहतात. आधी मनाचे समर्पण व हळूहळू संपूर्ण जीवनाचे समर्पण यात मागितले आहे. जिथे गुण व आकार आहे तेथे, मन एकाग्रचित्त होऊ शकते म्हणून साकार, सगुणाच्या पूजेचेही महत्त्व सांगितले.

ज्ञानेश्वरीत भगवंताच्या या मागणीचा आग्रह श्री ज्ञानेशांनी तेवढ्याच प्रभावाने मांडला आहे. भगवंतांनी श्रेष्ठ भक्तीसाठी याच मनाची पुनःपुन्हा मागणी केली आहे. नवव्या अध्यायाचे सार सांगताना ३४ व्या श्लोकात माऊली म्हणते, ''तू मन हे मीचि करी । माझ्या भजनी प्रेम धरी ।।'' तुझ्या मनात केवळ मीच असलो पाहिजे. माझेच चिंतन, भजन झाले पाहिजे. तुझा प्रेमभाव मलाच अर्पण केला पाहिजेस. ही भक्तीत भगवंताची मागणी आहे.

उदबत्ती, अत्तर, फुले, प्रसाद ही सर्व साधने वातावरण निर्मितीसाठी व भक्तिरसाच्या उद्दिपनासाठी आहेत. या सर्वांत मन व बुद्धी नसेल तर हे सर्व केवळ उपचार ठरतील. ''मनो वा संकल्पः'' मन म्हणजे सतत संकल्प व विकल्प. आपले सर्व संकल्प हे भगवंताकरिता जेव्हा होतात तेव्हा मन भगवंताच्या चरणी रुजू होते

बुद्धीत विचारांना स्थान आहे. बुद्धी पिता तर हृदय माता आहे. या दोन्हींचा समतोल झाला तर जीवन सुस्थिर होते. बुद्धीने ज्ञान ग्रहण करायचे व हृदयामध्ये प्रेम, भक्ती यांचा विकास करायचा. ज्ञानाची जेवढी आवश्यकता तेवढा भावही विकसित झाला पाहिजे. श्रद्धा हा विषय अंतःकरणाचा आहे, पण बुद्धीने श्रद्धेचे स्थान पक्के करायचे असते. बुद्धी ही सुकाणू आहे.

अशी बुद्धी व मन भगवंताला अर्पण केल्यानंतर ती शुद्ध होतात व अशा शुद्ध मन-बुद्धीने भगवंत दूर राहत नाहीत.

दिनांक १५ ऑक्टोबर

**म्हणोनि अभ्यासासी काही । सर्वथा दुष्कर[1] नाही ।**
**यालागी माझा ठायीं । अभ्यासे मिळ ।। १२.११३।।**

*शब्दार्थ - १) कठीण*

**अर्थ** - म्हणून अभ्यासाला कोणतीही गोष्ट मुळीच कठीण नाही, याकरिता माझ्या स्वरूपी तू अभ्यासाने एकरूप हो.

## मन-बुद्धी देता येत नसेल तर अभ्यास कर

(दुसऱ्या प्रकारची भक्ती)

मन-बुद्धीसहित हे चित्त जर भगवंताला देता येत नसेल तर अभ्यासयोगाचा स्वीकार कर. ह्या अभ्यासयोगानेसुद्धा भगवंतप्राप्ती शक्य आहे. दिवसाच्या २४ तासांमध्ये म्हणजे आठ प्रहरांमध्ये निदान एक निमिषभर तरी मला समर्पित हो. निमिष म्हणजे डोळ्याची पापणी वरून खाली यायला जेवढा वेळ लागतो तो क्षण. असे एक एक क्षण वाढवीत जा. जितके क्षण तुझे चित्त भगवंताचे सुख अनुभवील तितके तितके तुझे मन विषयांच्या ठिकाणी अरुची घेईल. अशा तऱ्हेने हळूहळू भोगातून तुझे मन भगवंताच्या ठिकाणी स्थिर व्हायला लागेल. ते मन हळूहळू मद्रूप होऊन जाईल, असे भगवंत म्हणतात. अभ्यासयोग म्हणतात तो हाच. अशा अभ्यासयोगाने कोणतीही गोष्ट प्राप्त होणार नाही असे नाही. विष खाण्याचा अभ्यास केला असता विषदेखील पचनी पडते. अभ्यासाला कोणतीही गोष्ट असाध्य नाही. माऊलींनी आठव्या अध्यायातही हेच सांगितले -

**येणेचि अभ्यासेसि योगु । चित्तासी करी पा चांगु ।**
**अगा उपायबळे पंगु । पहाड ठाकी ।। ८.८१।।**

**अर्थ** - याच अभ्यासाबरोबर चित्ताची सांगड चांगल्या प्रकारे घाल. अरे, प्रयत्नांच्या बळावर पांगळादेखील पर्वत चढून जातो.

सदभ्यासाने निरंतर आपल्या चित्ताला परमपुरुषाचे ध्यान लावले की, हळूहळू ते चित्त चिद्रूप व्हायला लागते. कारण या मनाला ज्याची गोडी लागते त्या ठिकाणी ते स्थिर व्हायला लागते. भगवंताच्या सुखाची गोडी या मनाला एकदा लागली की, त्याला इतर विषयांत रस वाटत नाही. मग प्रपंचात व विषयभोगात अडकलेले मन ईश्वराच्या ठिकाणी स्थिर व्हायला लागते.

जन्म-जन्मांतरीचे संस्कार, वासना या मनात खोलवर रुजलेल्या असतात. वासनांची ही जाळी क्षणभरात क्षीण होत नाही. विकार मिटण्यासाठी या अभ्यासयोगाची गरज आहे. वासनाक्षय होण्यासाठी या मनाचे उदात्तीकरण, विभूतीकरण व्हावे लागते. मन-बुद्धी जोपर्यंत शुद्ध होत नाहीत तोपर्यंत भगवंत तेथे राहत नाही. या शुद्धीकरणासाठी सतत अभ्यास पाहिजे.

अशा अभ्यासयोगाने जेव्हा मन निर्विषय व्हायला लागते तेव्हा तो अभ्यास दृढ झाला असे समजावे. "तैसे भोगाआतुनि निगता । चित्त मजमाजी रिगता । हळूहळू पांडुसुता । मीचि होईल ।। १२.१०९ ।। - निर्विषय झालेले मन हळूहळू भोगातून बाहेर पडून ते मद्रूप होईल असे भगवंत म्हणतात.

हा अभ्यासयोग भक्तीचा दुसरा प्रकार आहे.





दिनांक १६ ऑक्टोबर

**परि मने वाचा देहे । जैसा जो व्यापारु होये ।**
**तो मी करितु आहे । ऐसे न म्हणे ।। १२.११७ ।।**

**अर्थ** - परंतु मनाने, वाचेने व देहाने, जसे जे कर्म होईल, ते कर्म मी करत आहे, असे म्हणू नकोस.

## भगवंताला कर्मे अर्पण कर

(भक्तीचा तिसरा मार्ग)

भगवंतांनी प्रथम मन व बुद्धीची मागणी केली. ते देता येत नसेल तर अभ्यासयोगाने, आपले एक एक निमिष माझ्या भक्तीत व्यतीत कर म्हणून दुसरा भक्तीचा मार्ग सांगितला.

आता तिसऱ्या प्रकारच्या भक्तीत सर्व कर्मे मलाच अर्पण कर म्हणून भगवंत सांगतात. अभ्यासयोग कठीण असल्यामुळे जर माझ्या ठिकाणी चित्त एकाग्र करणे जमत नसेल तर हा सोपा मार्ग स्वीकारणे श्रेयस्कर आहे, असे त्यांचे मत आहे.

इंद्रियांचा निग्रह न करता, विषयभोगांना कमी न करता, शास्त्राने निषिद्ध ठरविलेली कर्मे सोडून, सर्व कर्मे भगवंतासाठी करून तू मोकळा हो. भगवंताकरिता काया, वाचा, मने कर्मे करूनसुद्धा सिद्धी प्राप्त करता येते. ही कर्मे करताना फक्त भोक्तृत्व व कर्तृत्व यांचा अहंभाव सोडून द्यायचा. कारण हे सर्व विश्व परमेश्वराच्या सत्तेने चालले आहे. त्या भगवंताच्या ठिकाणी, या कर्मांचे सर्व होणे व न होणे हे अवलंबून आहे. त्यामुळे त्या कर्मात काही न्यूनत्व राहिले अथवा पूर्णत्व आले याचे सुखदुःख काहीही न स्वीकारता अनासक्त बुद्धीने कर्मे करायची व ती भगवंताला अर्पण करायची. हा शुद्ध भाव ठेवायचा. माऊलींनी येथे फार सुंदर दृष्टान्त सांगितला आहे -

**माळिये जेऊते नेले । तेउते निवांतचि गेले ।**
**तया पाणिया ऐसे केले । हो आवे गा ।। ।।१२.१२०।।**

**अर्थ** - अरे, माळ्याने जिकडे नेले, तिकडे काही एक तक्रार न करता जाणाऱ्या पाण्याप्रमाणे तुझे जीवित निरभिमान होऊन कर्म करणारे होऊ दे.

या जगाचा माळी तो भगवंत आहे. पाणी जसे माळी नेईल त्या ठिकाणी काहीही तक्रार न करता जाते तसे या विश्वाच्या माळ्याने आपल्याला जसे व ज्या परिस्थितीत ठेवले आहे त्याविषयी त्याच्याजवळ काहीही तक्रार न करता निमूटपणे आपल्या वाट्याला आलेले कर्म करीत जावे व झालेले कर्म योग्य की अयोग्य, प्रवृत्तीपर की निवृत्तीपर, कमी अथवा जास्त यांचा विचार न करता त्या सर्वेश्वराला अर्पण करावे.

**अगा, जया जे विहीत । ते ईश्वराचे मनोगत ।**
**म्हणोनि केलिया निभ्रांत । सांपडेचि तो ।।१८.९११।।**

ज्याला जे विहित, नियत कर्म मिळाले आहे ती ईश्वराची आज्ञा आहे असे म्हणून पार पडले असता ते ईश्वराला आवडते. तीच खरी पूजा ठरते.

असे कर्म भगवंताला अर्पण करणे ही तिसऱ्या प्रकारची भक्ती आहे. भगवंताकरिता केलेल्या कर्माचा विधिनिषेध व त्याची योग्यायोग्यता याचा बुद्धीनेसुद्धा फारसा विचार करायचा नाही, अशी समर्पित वृत्ती भक्तियोगात श्रेष्ठ समजली जाते. यात अभिमान नाही, अहंकार नाही, मी-माझेपण नाही. जे काही आहे ते सर्वस्वी तुझेच आहे, तुझ्यासाठीच आहे व तुझ्यामुळे आहे असा समर्पित भाव ठेवायचा.

ॐ

दिनांक १७ ऑक्टोबर

अर्जुना हा फलत्यागु । आवडे[1] कीर असलगु[1] ।
परि योगामाजी योगु । धुरेचा[2] हा ।। १२.१३४ ।।

*शब्दार्थ - १) निश्चयेकरून सोपा वाटतो २) श्रेष्ठ*

**अर्थ** - अर्जुना, हा फलत्याग सोपा वाटतो खरा, पण सर्व योगांमध्ये हा योग श्रेष्ठ आहे.

## फलत्याग हा सर्वश्रेष्ठ योग

(भक्तीचा चौथा मार्ग)

भगवंतांनी आता भक्तीचा चौथा मार्ग दाखविला आहे. भगवंताप्रीत्यर्थ कर्म करणे शक्य नसेल तर नियतचित्त होऊन सर्वकर्मफलांचा त्याग करण्याचा हा मार्ग आहे. हा मार्ग दिसावयास जरी सोपा वाटत असला तरी आचरावयास हा कठीण आहे, असे भगवंत म्हणतात.

कर्मफल भगवंताला अर्पण करण्याने भक्त कर्मबंधनातून सुटतो. निग्रहयुक्त होऊन बुद्धीनेच कर्तृत्वभाव व फलास्वाद यांचा त्याग करावयाचा. कर्माच्या आरंभापासून शेवटापर्यंत केलेल्या कर्मांतून जी जी फळे प्राप्त झाली असतील ती ती मनाने व बुद्धीने पूर्ण समर्पित करायची. झाडास किंवा वेलीस आलेली फळे, जशी ती झाडे किंवा वेली टाकून देतात, त्याप्रमाणे पूर्ण झालेली कर्मे टाकून द्यायची. खडकावर पडलेला पाऊस अथवा अग्नीत पेरलेले बी अथवा पाहिलेले स्वप्न हे जसे व्यर्थ असते त्याप्रमाणे सर्व कर्मे व्यर्थ मानायची. मुलीविषयी जसा आपला जीव निष्काम असतो त्याप्रमाणे सर्व कर्मांच्या फलाविषयी तू निष्काम हो, असे भगवंत अर्जुनाला सांगतात.

हा योग सर्व योगांमध्ये श्रेष्ठ आहे. फलत्याग सोपा वाटतो खरा पण प्रत्यक्ष आचरण करण्यासाठी अत्यंत कठीण आहे.

जसे वेळूचे झाड एकदा व्याले म्हणजे पुन्हा वीत नाही, त्याप्रमाणे या फलत्यागाने जे जे कर्म टाकले जाते त्या त्या कर्मास पुन्हा अंकुर फुटत नाही. पुनर्जन्मामध्ये त्या कर्मापासून कोणताही परिणाम संभवत नाही.

फळाला उत्पन्न करणारे जे कर्म, ते जेव्हा दूर होते, तेव्हा फलत्याग संभवतो. आणि अशा या त्यागामुळे पूर्ण शांती प्राप्त होते.

अभ्यासापेक्षा ज्ञान गहन आहे. ज्ञानापेक्षा ध्यान श्रेष्ठ आहे. ध्यानापेक्षा कर्मफलत्याग व कर्मफलत्यागापेक्षाही शांती श्रेष्ठ आहे. हा ब्रह्मसुखाचाच अनुभव आहे.

फलाची अभिलाषा न धरता निष्काम होऊन कर्म करावे हा गीतेचा आग्रह आहे. ''कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन'' (२.४७) या सुप्रसिद्ध श्लोकामध्ये हा भाव पूर्ण प्रकट झाला आहे. ''परी कर्मफळी आस न करावी । आणि कुकर्मी संगती न व्हावी । हे सत्क्रियाचि आचरावी । हेतुवीण ।।'' हा माऊलींचा उपदेश आहे. अशा कर्मामध्ये मग सुखदुःखांचे हिंदोळे राहत नाहीत. समत्व भावाने असे कर्म केल्याने त्याला योगाचीच अवस्था प्राप्त होते.

बाराव्या अध्यायात भक्तीचे हे सर्वांग दर्शन ज्ञानेश्वरांनी घडविले आहे. भक्ताला सर्वपरीने उत्तम भक्ती करायची असते, पण प्रत्येक मनुष्याची आंतरिक प्रकृती ही वेगवेगळी असल्याने व सत्त्वानुरूप प्रत्येकाची श्रद्धा वेगवेगळी असल्यामुळे जो तो आपल्याला आवडेल असा मार्ग निवडीत असतो. भगवंतांनी सर्वांना आचरता येणारे चार मार्ग यात दाखविले आहेत. भक्तियोग समजण्यासाठी भक्तीच्या या वेगवेगळ्या वाटासुद्धा समजणे आवश्यक आहे.



ॐ

दिनांक १८ व १९ ऑक्टोबर

ऐसियालागी सर्व प्रकारी । जैसा कल्लोळु[1] अनन्यु सागरी ।
तैसा माते अवधारी । भजिन्नला जो ।। १५.५६८ ।।
सूर्या आणि प्रभे । एकवंकी[2] जेणे लोभे ।
तो पाडू मानू लाभे । भजना तया ।। १५.५६९ ।।

*शब्दार्थ - १) लाटा २) ऐक्य*

**अर्थ** - एवढ्याकरता जशी लाट सर्व रीतीनी समुद्राशी अभिन्न असते, त्याप्रमाणे जो मला (तद्रूप होऊन) भजला, ऐक. ।।१५.५६८।।

सूर्याला व प्रभेला ज्या मानाने (जशी) एकरूपता असते, ती योग्यता या भजनाला मानता येईल. ।।१५.५६९।।

## 'पराभक्ती' ही श्रेष्ठ भक्ती

श्री ज्ञानेश्वरांनी पराभक्तीला श्रेष्ठ भक्ती म्हणून गौरविले आहे. अनन्यभक्ती, गुरवीभक्ती, कीर्तनभक्ती, नामस्मरण, अद्वैतभक्ती, अज्ञानी व अव्यभिचारी भक्ती असे भक्तीचे प्रकार सांगितले. जो तो आपापल्या प्रकृतिधर्मानुसार व श्रद्धेनुसार भक्तीचा प्रकार निवडत असतो. अखिल मानवजात ही स्वभावतःच जरी भजनशील असली तरी, ज्याचा त्याचा आंतरिक सत्त्वानुरूप स्वभाव वेगवेगळा असल्यामुळे भक्तीच्या पद्धतीसुद्धा वेगवेगळ्या होतात. सर्वांचे ध्येय मात्र एकच - ईश्वरप्राप्ती.

भक्ती मुख्यतः दोन प्रकारांत विभागली आहे - गौणीभक्ती किंवा अपराभक्ती व दुसरी पराभक्ती. ''सा द्विधा गौणी पराच'' असे म्हटले आहे. साधन दशागत ही गौणी व सिद्धी दशागत ही पराभक्ती.

ईश्वराच्या प्राप्तीसाठी केलेली जी भक्ती त्या भक्तीला साधनभक्ती किंवा अपराभक्ती असे म्हणतात व ज्ञानयुक्त उपासनेने ज्या वेळी स्वतः भक्तच ईश्वररूप होतो व ईश्वर होऊन ईश्वराचे भजन करतो त्या वेळी त्या भक्तीला पराभक्ती असे म्हणतात. भगवंताच्या नामसंकीर्तनाने मनात उदय पावणारे निरपेक्ष प्रेम ही गौणीभक्ती आणि ईश्वराच्या प्रत्यक्ष अनुभवाने निर्माण होणारे प्रेम म्हणजे पराभक्ती. गौणीभक्ती साधनस्वरूपाची आहे. त्यायोगे ईश्वर साक्षात्कार करून घ्यावयाचा असतो. पण पराभक्ती ही स्वयं फलरूपा आहे, असे नारद भक्तिसूत्रात म्हटले आहे. पराभक्ती म्हणजे आत्मसाक्षात्कार. पराभक्ती साक्षात्कारात अंतर्भूत आहे, असे माऊली म्हणते.

अपराभक्तीचे वैधीभक्ती आणि रागात्मिका भक्ती असे दोन प्रकार होतात. आपल्या स्वकर्माद्वारे भगवंताची केलेली पूजा हे वैधीभक्तीचे लक्षण आहे व अनुरागजनित अशी जी नवविधाभक्ती तिला रागात्मिका भक्ती असे म्हणतात.

पण पराभक्ती म्हणजे भक्तीचा कळस आहे. निर्हेतुक, निरपेक्ष, कामनारहित प्रेमालाच नारदांनी पराभक्ती असे म्हटले आहे.

'गुणरहितं कामनारहितं प्रतिक्षणं वर्धमानं अविच्छिन्नं सूक्ष्मतरं अनुभवरूपम्' (सूत्र ५४) असे नारदीय भक्तिसूत्रात म्हटले आहे. अशा प्रेमाचा अनुभवसुद्धा घेता येतो. असे प्रेम हीच खरी भक्ती. 'साऽत्वास्मिन परमप्रेमरुपा अमृतस्वरुपा च ।' असे या प्रेमाचे वर्णन केले आहे. आपण स्वतः परमेश्वरस्वरूप आहोत याचा बोध झाल्यानंतर त्याच स्वरूपाचे दर्शन साऱ्या विश्वात घेणे या स्थितीला ज्ञानेश्वरांनी पराभक्ती म्हटले आहे. 'रामो भूत्वा रामं यजेत्' 'देवो भूत्वा देवं यजेत्' 'कृष्णो भूत्वा कृष्णं यजेत्' परमेश्वर होऊन परमेश्वराचे दर्शन सर्वत्र घेणे म्हणजे 'जे जे भेटे भूत । ते ते मानिजे भगवंत' अशी दृष्टी प्राप्त होणे होय. 'विठ्ठल जळी स्थळी भरला' हे जाणून त्याला सर्वत्र पाहणे यात अभिप्रेत आहे.

ॐ

अशा भक्ताच्या ठायी द्वैत सरते. एकत्वाची, अभेदाची अनुभूती येते. या स्थितीचे वर्णन पंधराव्या अध्यायातील १९ व्या मंगल श्लोकावरील भाष्यात श्री ज्ञानदेवांनी केले आहे. हे वर्णन म्हणजे माऊलींच्या प्रतिभेचा उत्कट आविष्कार आहे. ते म्हणतात -

असा हा ज्ञानी भक्त, भगवंताला, त्याच्यासारखेच होऊन जाणतो व सर्व प्रकारे त्याची भक्ती करतो. असे ज्ञान झाले असता त्याला आपल्या आत्मस्वरूपाच्या ज्ञानाने जगाचे मिथ्यत्व समजते. असा ज्ञानी भक्त आपणासह भेद न जाणता ईश्वराला जाणतो व त्यामुळे मीच एक स्वतः सिद्ध सच्चिदानंद सर्वत्र आहे असे म्हणतो. सर्वत्र ब्रह्माचे दर्शन झाल्यामुळे त्याच्या मनात द्वैतभाव राहत नाही. असा भक्तच माझ्या भजनाला योग्य आहे. आकाश जसे आकाशाच्या आलिंगनास योग्य आहे, अमृत होऊन जसे अमृतात मिसळावे त्यामुळे मद्रूप होऊनच तो माझी भक्ती करतो. तद्रूपता जशी सजातीय पदार्थात होते तसा तो व मी एकच होतो.

वरील दोन ओवींत याच्यापुढील वर्णन आहे. जशी लाट व पाणी, दोन जरी दिसले तरी एकच आहेत. लाट ही समुद्राशी अभिन्नच असते, त्याप्रमाणे असा भक्त मद्रूप होऊन माझी भक्ती करतो. सूर्य व सूर्याची प्रभा एकच असते तशी त्याची भक्ती एकरूप होते.

देव व भक्त या दोघांच्या एकत्वाचे वर्णन करताना माऊली सहाव्या अध्यायात म्हणते -

**दीपा आणि प्रकाशा । एकवंचीचा पाडु जैसा ।**
**तो माझा ठायी तैसा । मी तयामाजी ।।६.३९६ ।।**
**जैसा उदकाचे नि आयुष्ये रसु । का गगनाचेनि माने अवकाशु ।**
**तैसा माझेनि रुपे रुपसु । पुरुष तो गा ।।६.३९७ ।।**

अर्थ - दिवा व त्याचा प्रकाश, हे जसे दोन्ही एकच आहेत, त्याप्रमाणे तो माझ्या ठिकाणी व मी त्याच्या ठिकाणी ऐक्यतेने पाहतो. ।।६.३९६।।

ज्याप्रमाणे जेथपर्यंत पाणी आहे, तेथपर्यंत ओलावा आहे. अथवा आकाशाच्या बरोबरीने पोकळी आहे, त्याप्रमाणे माझ्या रूपाने तो पुरुष रूपवान आहे. ।।६.३९७।।

अद्वैतबोधाने असा भक्त सर्वत्र त्या ईश्वराचेच दर्शन घेतो. स्वतः ईश्वररूप होऊन सर्व चराचरात आपणांसारखेच सर्वांना पाहतो.

ही भक्ती कशी असते यावर भाष्य करताना ज्ञानदेव म्हणतात -

**एऱ्हवी तिजी ना चौथी । हे पहिलि ना सरती ।**
**पै माझिये सहजस्थिती । भक्ति नांव ।। १८.१११३ ।।**

सहज विचार करून पाहिले तर ही भक्ती तिसरी नाही किंवा चौथी नाही. पहिली नाही आणि शेवटचीही नाही. तर ईश्वराच्या सहज स्वरूपस्थितीलाच भक्ती हे यथार्थ नाव आहे. आपणासकट सर्वांतच परमात्मा पाहणे हा अन्वयबोध म्हणजेच सहजस्थिती.

केवळ ज्ञानी भक्तालाच ही स्थिती प्राप्त होते. अद्वैताचा अनुभव आला की द्वैताचा पूर्ण नाश होतो. मग भेदाभेद राहतच नाही. या सहजभक्तीच्या योगाने ज्ञानी भक्त परमेश्वराचे नेमके स्वरूप जाणतो. ईश्वराला तत्त्वतः जाणून तो ईश्वराशी तद्रूप होतो. ईश्वरमय होऊन ईश्वराची भक्ती करतो. असा ईश्वर तत्त्वतः कसा आहे याचे वर्णन माऊलींनी ५५ व्या श्लोकावरील भाष्यात केले आहे. माऊली म्हणतात -

**या ज्ञानभक्ति सहज । भक्तु एकवटला मज ।**
**तो मीचि केवळ हे तुज । श्रुतही आहे ।।१८.११३० ।।**



ॐ

**जे उभऊभियां भुजा । ज्ञानिया आत्मा माझा ।**
**हे बोलिलो कपिध्वजा । सप्तमाध्यायी ।।१८.११३१ ।।**
**ते हे कल्पादी भक्ति मियां । भागवतीमिषे ब्रह्मया ।**
**उत्तम म्हणोनि धनंजया । उपदेशिली ।।१८.११३२ ।।**
**ज्ञानी इयेते स्वसंवित्ती । शैव म्हणती शक्ती ।**
**आम्ही परमभक्ती । आपुली म्हणो ।।१८.११३३ ।।**

अर्थ - या ज्ञानभक्तीने जो भक्त माझ्याशी सहज ऐक्याला पावला आहे तो केवळ मीच आहे, हे तू ऐकलेही आहेस. ।।१८.११३०।।

कारण की, मागे सातव्या अध्यायात ज्ञानी माझा आत्मा आहे, हे मी अर्जुना हात वर करून बोललो आहे. ।।१८.११३१।।

अर्जुना, ती भक्ती उत्तम म्हणून मी कल्पाच्या आरंभी भागवताद्वारे ब्रह्मदेवाला सांगितली. ।।१८.११३२।।

ज्ञानी हिला (चौथ्या भक्तीला) स्वसंवित्ती म्हणतात, शैव हिला शक्ती म्हणतात आणि आम्ही आपली 'श्रेष्ठ भक्ती' असे म्हणतो. ।।१८.११३३।।

भगवंताने ज्ञानी पुरुषाच्या या अद्वैत भक्तीला सर्वश्रेष्ठ मानले आहे. ज्ञानेश्वरांनी या पराभक्तीला, या ज्ञानयुक्त भक्तीला उच्चतम भक्ती म्हणून गौरविले आहे. पराभक्तीत भक्त विश्वरूप होऊन जातो.

'हे असो विश्व पाही । जयासी आपणपेवाचूनि नाही ।। ।।४.११२।। त्याला विश्व आपल्यापासून वेगळे दिसत नाही. अशा भक्तीलाच ज्ञानेश्वरांनी खरे अध्यात्म म्हटले आहे.

**ऐशिया आपुलियेची सहज स्थिती । जया ब्रह्माची नित्यता असती ।**
**तया नाम सुभद्रापती । अध्यात्म गा ।। ।।८.१९।।**

आपल्या स्थितीने असणाऱ्या ब्रह्माचे जे अखंडत्व त्या अखंडत्वास अध्यात्म हे नाव आहे असे माऊली म्हणते.

अद्वैताचा अनुभव आणि पराभक्ती याची अनुभूती घेतल्यानंतरसुद्धा तो देवाची भक्ती करतो. असा हा ज्ञानी भक्त भक्तीसुख अनुभवण्यासाठी द्वैतातच राहतो.

**की भक्तिसुखालागी । आपणपेंचि दोही भागी ।**
**वाटूनिया आंगी । सेवकै बाणे ।।१२.१८६ ।।**
**येरा नाम मी ठेवी । मग भजती बोज बरवी ।**
**न भजतया दावी । योगिया जो ।।१२.१८७ ।।**

अर्थ - किंवा भक्तिसुख भोगण्याकरिता जो आपणच आपल्याला दोन भागांत वाटून घेऊन एका अंगाने सेवक वा भक्त होतो. ।।१२.१८६।।

दुसऱ्या भागाला मी म्हणजे देव, हे नाव ठेवतो व मग माझ्या सगुण स्वरूपाचे भजन न करणाऱ्या ज्ञानादी योगियांना, अद्वैतातही होणाऱ्या सगुण भक्तीचे श्रेष्ठस्वरूप दाखवितो. ।।१२.१८७।।

आत्मसाक्षात्कारानंतरसुद्धा भक्ती शक्य आहे, पराभक्तीत, अद्वैतभक्तीतसुद्धा हे द्वैत राखणे शक्य आहे हे ज्ञानदेवांनी समजावले आहे.

हीच भूमिका अमृतानुभवात, एका सुंदर ओवीत ज्ञानेश्वरांनी मांडली आहे -

**देव देऊळ परिवारू । कीजे कोरुनि डोंगरु ।**
**तैसा भक्तीचा व्यवहारु । की न व्हावा ।। ९.४३ ।।**

ॐ

एकाच डोंगराच्या विशाल दगडातून देव, देऊळ, परिवार कोरता येणे शक्य असते. मग भक्तीचासुद्धा व्यवहार असाच का होऊ नये? भजन करणाराही राम, ज्याचे भजन करावयाचे तोही राम, मुखातही राम अशी त्रिपुटी एकाच ठिकाणी का होऊ नये. ध्याता, ध्यान व ध्येय हे एकाच ठिकाणी होऊन भक्तीचा व्यवहार होऊ शकतो.

याप्रमाणे अद्वैत स्थितीतही म्हणजे परब्रह्माचा अनुभव घेतानाही, ज्ञानोत्तर भक्तीचा व्यवहार करता येणे शक्य आहे, हे ज्ञानदेवांनी ज्ञानेश्वरीत अनेक ओव्यांतून समजावले आहे.

म्हणून पराभक्तीत अद्वैताचा अत्युच्च अनुभव घेत असताना भक्तिसुखाचाही आनंद उपभोगणे शक्य असते. पराभक्तीत रमणारा भक्त भक्तिरसाचे सेवन एकटा करीत नाही "तर आनंदाचे आवारु मांडू जगा" या माऊलींच्याच उक्तीप्रमाणे जगाला आनंद देण्याचे कार्य करीत असतो. 'विश्व होऊनि विचरे । विश्वामाजी' अशी ज्ञानी भक्ताची भूमिका असते. विश्वकल्याणाची आस त्याच्या मनात असते. ज्ञानभक्तीच्या योगाने तो भक्त ईश्वराशी सहज ऐक्याला पावतो. तेही ईश्वररूप होऊन.

परब्रह्माच्या अनुभूतीनंतरसुद्धा ज्या ज्ञानी भक्ताला परमेश्वराच्या भजनी आस्था असते त्या भक्ताविषयी ईश्वराला अधिक प्रेम असते. वास्तविक ज्ञानयोग श्रेष्ठ की भक्तियोग श्रेष्ठ हा वाद अनाठायी आहे. ज्ञान हा भक्तीचा डोळा आहे.

**हे विश्वचि माझे घर । ऐसी मती जयाची स्थिर ।**
**किंबहुना चराचर । आपण जाहला ।।**
**मग याहीवरी पार्था । माझा भजनी आस्था ।**
**तरी तयाते मी माथा । मुकुट करी ।।१२.२१३-१४ ।।**

**अर्थ -** या संपूर्ण चराचरात 'मी, मी' म्हणून स्फुरणारा मीच एक आहे असे केवळ व्यतिरेकज्ञानच नाही तर सर्व चराचर रूपाने मीच एक भासतो असे अन्वयज्ञानही ज्याच्या बुद्धीत दृढ झाले आहे.

अर्जुना! मग मी यावरीही माझ्या सगुणरूपाचे प्रेमाने भजन करण्याची ज्याला गोडी व श्रद्धा आहे त्याला मी आपल्या शिरावरील मुकुटच करतो.

सर्व संतांना अशी ज्ञानोत्तर प्रेममय भक्ती, अधिक गोड वाटली.

ज्ञानेश्वरांच्या भक्तियोगात या पराभक्तीला श्रेष्ठ स्थान आहे.

**दिनांक २० ऑक्टोबर**

**तो पहिला आर्त[१] म्हणिजे । दुसरा जिज्ञासु[२] बोलिजे ।**
**तिजा अर्थार्थी[३] जाणिजे । ज्ञानिया[४] चौथा ।। ७.१०९ ।।**

*शब्दार्थ - १) संसारपीडित, रोगी २) ज्ञानप्राप्ती इच्छिणारा ३) धनादिकांची इच्छा करणारा ४) ज्ञानी, जाणता*

**अर्थ -** त्यातील जो पहिला, त्याला आर्त (भक्त) म्हणावे. दुसऱ्याला जिज्ञासू या नावाने ओळखावे. तिसरा, अर्थार्थी आणि चौथा तो ज्ञानी होय असे समजावे.

## चार प्रकारचे भक्त

भक्तियोगाचा विचार करताना, भगवंत, भक्ती व भक्त ह्या तीन घटकांना पूर्णपणे समजून घेतले पाहिजे. आपण



ॐ

ईश्वराचे स्वरूप पाहिले, विविध प्रकारे माऊलींनी सांगितलेले भक्तीचे सर्व सोपान पाहिले. आता 'भक्त' या सर्वांत महत्त्वाच्या घटकाचा सर्वांगाने विचार केला पाहिजे.

श्री ज्ञानेश्वरांनी भगवान श्रीकृष्णांनी सांगितलेल्या भक्ताच्या सर्व पैलूंना विचारात घेतलेले असले तरी संत व तत्त्वज्ञानी म्हणून या दोन्ही भूमिका त्यांनी परिपूर्ण केल्या आहेत व यात मौलिक भर घातली आहे.

सातव्या अध्यायात चार प्रकारच्या भक्तांचे वर्णन आहे. गीतेत म्हटले आहे -

**चतुर्विधा भजन्ते मां सुकृतीनोऽर्जुन ।**
**आर्तो, जिज्ञासुरर्थार्थी ज्ञानी च भरतर्षभ ।।७.१६।।**

**अर्थ -** हे अर्जुना, चार प्रकारचे पुण्यवान लोक माझी भक्ती करतात. भरतश्रेष्ठा, (ते चार प्रकार हे असे) दुःखाने ग्रस्त झालेला, जाणण्याची इच्छा करणारा, द्रव्याची इच्छा करणारा आणि ब्रह्मज्ञान प्राप्त झालेला.

ईश्वराची भक्ती करणारे व न करणारे असे दोनच वर्ग या प्रांतात आहेत. माझ्या भक्तीशिवाय "जळो ते जियालेपण" असे भगवंतांनी स्वतः म्हटले आहे. आत्मस्वरूपाचे अज्ञान असल्यामुळे अहंकार व विकार यात गुरफटून गेलेल्यांना व मायेच्या मोहात अडकलेल्यांना भगवंत आठवत नाही. पण बाकीचे भक्त या चार प्रकारांत मोडतात.

यातील जो आर्त आहे तो पीडा, व्याधी याच्या निमित्ताने भक्ती करतो. सर्व बाजूंनी अपयश, निराशा, दुःख, विवंचना झाल्यानंतर असहाय्य होऊन भगवंताची त्यांना आठवण होते. आशा-आकांक्षांची असंख्य गाठोडी घेऊन आपण जगत असतो. ध्येयपूर्ती कमी व इच्छा अधिक. यातून सुख जवापाडे व दुःख पर्वताएवढे असल्यामुळे पदरी वैफल्य येते. कुठेच मार्ग दिसत नसला की, शेवटी आशेचा किरण म्हणून भगवंताचा धावा करणे एवढेच हाती असते. अशा आर्त भक्तांची संख्या अधिक आहे. आज सर्वत्र भक्तीला पूर आलेला दिसतो. नवसाला पावणाऱ्या जागृत देवस्थानांच्या ठिकाणी अशा भक्तांची अलोट गर्दी दिसून येते. आर्तता, याचना, मागण्या यांना मर्यादा राहिलेली नाही.

दुसरा वर्ग जिज्ञासूंचा. थोडा उन्नत वर्ग. या भक्तांना अनेक गूढ, कूट, अनाकलनीय, रहस्यांचा, विश्वातील अव्यक्त शक्तीचा वेध घ्यायचा असतो. ही त्यांच्या बुद्धीची भूक असते. मी कोण? जगताचे स्वरूप काय? जगदीश्वराचे स्वरूप कसे आहे? या जगात भगवंतांनी दुःख का निर्माण केले? मृत्यूनंतरची अवस्था काय? या जगात इतके भेदाभेद भगवंतांनी का निर्माण केले?... अशा अनेक प्रश्नांचे उत्तर जिज्ञासूंना हवे असते.

अर्थार्थी भक्तांना द्रव्य, साधनसामग्री, कीर्ती, सत्ता, प्रतिष्ठा या गोष्टींचा हव्यास असतो. हे सर्व त्यांना स्वतःसाठीही हवे असते व जगताच्या कल्याणासाठीसुद्धा त्याचा ते विनियोग करीत असतात. "आत्मनो मोक्षार्थं जगत् हिताय च" या भावनेने ईश्वरच सर्वसत्ताधीश, एकमेवाद्वितीयम् कर्तुमकर्तुम... असा भाव ठेवून ते भक्ती करत असतात.

चौथ्या प्रकारचे ज्ञानी भक्त मात्र पूर्ण, श्रेष्ठ भक्त होत. भगवंतांनी ज्ञानी भक्तांना आपला आत्माच मानले आहे. असे भक्त ईश्वरस्वरूपच असतात. ब्रह्मज्ञान, प्राप्त करूनसुद्धा भगवंताचे भजन अव्याहत चालूच असते. अखिल विश्वाच्या कल्याणाची आस त्यांच्या मनात असते. त्याप्रमाणे ते सदैव कार्यरत असतात. अशा भक्तांना सर्वत्र ईश्वरीसत्तेचाच अनुभव येतो. अनन्यभावाने एकचित्त होऊन भगवंताला सर्वस्व अर्पण करणारा असा भक्त भगवंताला आवडतो. "नर नारी बाळे अवघा नारायण । ऐसे माझे मन करी देवा", "विष्णुमय जग । वैष्णवांचा धर्म", किंवा "ईशावास्यमिदं सर्वं" याची प्रत्यक्ष अनुभूती असे भक्त घेत असतात. ब्रह्मांडात एकच परमेश्वर विविध रूपांनी नटलेला आहे असे अनुभवतच एक दिवस तेच ईश्वररूप होऊन जातात. अद्वैत भक्तीचा हा कळस असतो. ब्रह्मैक्य भावाने असा ज्ञानी भक्त तद्रूप होऊन जातो.

आर्त, जिज्ञासू, अर्थार्थी हे सर्वच उदार, सत्प्रवृत्त, सात्त्विक, महान आहेत; पण ज्ञानी भक्त भगवंताचे चैतन्य आहेत. अनेक जन्म घेतल्यानंतर असा ज्ञानी भक्त निर्माण होतो.

**हे समस्तही श्री वासुदेवो । ऐसा प्रतीतिरसाचा बोतला भावो ।**
**म्हणोनि भक्तांमाजी रावो । आणि ज्ञानिया तोचि ।।७.१३६।।**

**अर्थ** - हे संपूर्ण विश्व श्री वासुदेव आहे अशा अनुभवरूपी रसाचा त्याचा भाव ओतलेला असतो. म्हणून सर्व भक्तांमध्ये तो राजा आहे आणि ज्ञानीही तोच आहे.

पहिल्या तिघांची एकभक्ती नसते. ज्ञानी मात्र सर्वस्वी ईश्वरावर एकचित्त निष्ठा ठेवून असतात. हे सर्वच निष्काम असले तरी ज्ञानी सोडून इतर भक्त, आपले सर्वस्व सांभाळून ईश्वराला भजत असतात. ''उदाराः सर्व एवैते'' असे इतरांना संबोधून ज्ञानी भक्त मात्र आपला आत्माच आहे असे भगवंत म्हणतात.

**दिनांक २१ ऑक्टोबर**

**नाना हे संपत्ति दैवी । या गुणतीर्थांची नीच नवी ।**
**निर्विण्णसगरांची[1] दैवी । गंगाचि आली ।।१६.२०८।।**

*शब्दार्थ - १) विरक्त हेच कोणी सगर राजे त्यांच्या*

**अर्थ** - अथवा या सव्वीस गुणरूप तीर्थांनी नित्य नवी भरलेली अशी ही दैवी, संपत्तीरूपी गंगा, विरक्त पुरुषरूपी सगरांच्या दैवाने प्राप्त झाली आहे.

## दैवीगुणसंपत्तीने युक्त असणारा भक्त

सोळाव्या अध्यायात ज्ञानेश्वर गीतेच्या आधाराने दैव व आसुरी संपत्तीचे वर्णन करीत आहेत. संपत्ती कशाला म्हणतात, हेही माऊलींनी स्पष्ट केले आहे - एकमेकास पोसणारे असे अनेक पदार्थ एकत्र आले की, त्याला संपत्ती म्हणतात. दैवीसंपत्ती सुखाला उत्पन्न करणारी आहे. सोळाव्या अध्यायात अशा सव्वीस दैवीगुणांचे वर्णन आले आहे. निर्भयता, सत्त्वसंशुद्धी, मान, योग यातील तत्परता, दान, दम, यज्ञ, स्वाध्याय, तप, सौजन्य, अहिंसा, सत्य, दया, अनासक्ती, मृदुता, लज्जा, तेज, क्षमा, धैर्य, अद्रोह इत्यादी गुणांचे वर्णन आले आहे.

दुसऱ्या अध्यायात स्थितप्रज्ञाची लक्षणे सांगितली. तेराव्या अध्यायात ज्ञानाची एकूण अठरा लक्षणे सांगितली. चौदाव्या अध्यायात गुणातीताचे वर्णन आहे.

या सर्व अध्यायांतून सांगितलेले हे दैवीगुण आहेत. भक्ताच्या अंगी जेवढे हे दैवीगुण असतील तेवढा तो श्रेष्ठ. हे गुण अंगी बाणवणे हीच खरी भक्ती. असा दैवीगुणसंपन्न भक्त देवाला आवडतो.

केवळ दैनंदिन भजनपूजन, नामस्मरण, व्रतवैकल्ये यालाच भक्ती म्हणता येत नाही. हे सर्व कर्मकांड जरी भक्तीत आवश्यक असले तरी जोपर्यंत आपले अंतःकरणचतुष्टय बदलत नाही तोपर्यंत भक्ती दृढ होत नाही. ही दृढ होण्यासाठी या सद्गुणांची जोपासना व्हायला पाहिजे. जसजसा एक एक गुण अंगी बाणेल तसतसा मनुष्याचा स्वभाव घडत जाईल. वृत्ती म्हणजे भक्ती. ही वृत्ती उदात्त, दिव्य, भव्य बनवायची असेल तर हे गुण अंगी बाणले पाहिजेत. असे हे दैवीगुण पूर्णत्वाला नेणे हेच भक्तीचे शिखर आहे. ईश्वररूप होण्यासाठी भगवंताचे षड्वैश्वर्य आपल्यात वृत्तीरूपाने यावे लागते. ''देवो भूत्वा देवं यजेत्'' म्हणजे देवासारखे होऊन देवाची पूजा करायची हा भाव येथे अभिप्रेत आहे.

सोळाव्या अध्यायाची योजना गीतेत किंवा ज्ञानेश्वरीत जी झाली आहे ती भक्ताच्या आत्मपरीक्षणासाठीच आहे. भक्तीच्या प्रत्येक सोपानावर उभे असता भक्ताने स्वतःच आपले परीक्षण करायचे की यातील किती गुण आपल्या अंगी





बाणले आहेत. भक्तीत इतर कोणीही आपले परीक्षण करू शकत नाही. एक भगवंत व दुसरे आपणच या दोघांशिवाय भक्ताच्या भक्तीचे मूल्यमापन कोणी करू शकत नाही. भक्ताचे श्रेष्ठत्व त्याच्या दैवीगुणसंपत्तीवर आधारलेले आहे. हीच संपत्ती त्याच्या मोक्षाला कारणीभूत होते. याच्या उलट आसुरी संपत्ती बंधनाला कारणीभूत होते. या दैवीसंपत्तीची पूर्णता जेथे होते तो ज्ञानी भक्त होय. तीच पराभक्ती. सर्व थोर भक्तांच्या ठिकाणी हे गुण सर्वार्थाने प्रकट झाले होते.

दुसऱ्या अध्यायात स्थितप्रज्ञाचे गुण सूत्ररूपाने सांगितले तेच सोळाव्या अध्यायात विस्ताराने सांगितले. तेराव्या अध्यायात ''अमानित्वं ...'' या सातव्या श्लोकापासून अकराव्या श्लोकापर्यंत ज्ञानाची एकूण २० लक्षणे ज्ञानेश्वरांनी सांगितली. हे गुण जेव्हा भक्ताच्या ठिकाणी दृढ होतात तेव्हा त्याला ज्ञान प्राप्त होते. चौदाव्या अध्यायात अर्जुनाने गुणातीताची लक्षणे जेव्हा विचारली तेव्हा भगवंतांनी, २२ व्या श्लोकापासून २६ व्या श्लोकापर्यंत गुणातीत पुरुषाची लक्षणे व आचार कसा असतो याचे वर्णन केले.

संपूर्ण गीतेत या दैवीगुणांचे वर्णन अनेक ठिकाणी आले आहे. भक्ताच्या अंगी कोणते गुण असावेत यासाठी ही योजना आहे. श्री ज्ञानेश्वरांनी उपमा-दृष्टान्त देऊन, या गुणांचे बहारदार वर्णन केले आहे.

वरील ओवीत या दैवीगुणांना पवित्र तीर्थांची उपमा दिली आहे. हे मोक्षरूपी सार्वभौम राजाचे २६ गुण आहेत असे गौरविले आहे. २६ गुणांच्या रूपाने ब्रह्मैश्वर्य वास्तव्य करीत आहे असे वर्णन केले आहे.

हे सर्वश्रेष्ठ भक्तांचे गुण आहेत.

**दिनांक २२ ऑक्टोबर**

**अगा अभय येणे नावे । बोलिजे ते हे जाणावे ।**
**सम्यग्ज्ञानाचे[1] आघवे । धावणे[2] हे ।। १६.७३ ।।**

*शब्दार्थ - १) यथार्थ ज्ञानाचे २) धाव, सीमा*

**अर्थ** - अरे अर्जुना, अभय या नावाने ज्याचा उल्लेख केला जातो, ते हे समजावे. हे अभय म्हणजे यथार्थ ज्ञानाच्या बरोबर असणारा व त्याचे सर्व प्रकारे रक्षण करणारा शिपाई आहे.

## 'निर्भयता' हा भक्ताचा सर्वश्रेष्ठ गुण

दैवीगुणांत सर्वश्रेष्ठ गुण म्हणून 'अभय' या गुणाला पहिले स्थान दिले आहे. जसे महापुरात उडीच घातली नाही म्हणजे बुडण्याचे भय धरण्याचे कारण नाही किंवा पथ्य पाळले असता रोगाचे भय असण्याचे कारण नाही, त्याप्रमाणे विहित व निषिद्ध कर्म यांच्या संबंधाने अहंकाराला उत्पन्न न होऊ देणे व अशा रीतीने संसाराचा धाक टाकणे याला अभय असे म्हटले आहे.

निर्भयता आली तरच इतर गुणांची वाढ होते. भीतीच्या छायेत सतत वावरणाऱ्या दुबळ्या माणसाच्या अंगी सद्गुणांची वाढ होत नाही. अशी माणसे सत्याला सामोरी जाऊ शकत नाहीत. प्रखर ईश्वरनिष्ठा व शरणागतता असेल तरच निर्भयता येते. भीतीने परमेश्वराजवळ न जाता प्रेमाने गेले तरच ती भक्ती सार्थ होते. ईश्वरावर प्रेममय भक्ती करून, सर्व कर्मे त्यालाच अर्पण करणाऱ्यांना भय कशाचे?

जो निर्भय आहे तोच निश्चिंत, स्वस्थ व शांत होतो. जेथे शांती आहे तेथेच प्रसन्नता, सुख असते. भयभीत मनुष्य शांत, स्थिर, प्रसन्न राहू शकत नाही. भय चिंता निर्माण करते. चिंता ही चितेसारखी आहे. ती सतत जाळीत असते. त्यामुळे तणाव, निराशा, मानसिक असंतुलन येते. सत्ता, संपत्ती, पद, प्रतिष्ठा, देहाबद्दलची आसक्ती या सर्वांमुळे

ॐ

मनुष्याच्या अंतःकरणात भीती निर्माण होत असते. हे सर्व मिळाले तरी ते कोणी हिरावून घेणार नाही ना, यामुळे मनुष्य भयग्रस्त होतो व त्याचा परिणाम दुःख व अशांती!

भयाच्या छायेखाली जगणे म्हणजे प्रत्येक क्षणी मरणे व भयमुक्त होऊन जगणे म्हणजे जगण्यातला आनंद घेणे. जोपर्यंत आसक्ती आहे तोपर्यंत भय आहे. ज्या ज्या वस्तूवर आपला प्राण जडला आहे त्या त्या वस्तूच्या वियोगाची भीती आपल्याला सतत छळत असते. मग ते घर असो, घरातील व्यक्ती असोत, आपले धन असो किंवा आपला देह असो. जेवढी आसक्ती तेवढे भय व तेवढीच अशांतता. ज्याच्या मनातून मोह, आसक्ती गेली तो भयमुक्त झाला. वस्तूवरचे प्रेम मनुष्याला अभय देत नाही. म्हणून जास्त वस्तुसंग्रह करू नये. ज्या वस्तूंच्या चोरीबद्दल भय निर्माण होते त्याचा संग्रह कराच का?

म्हणून निवांत, निश्चिंत, शांत, प्रसन्न राहण्यासाठी अभयता जीवनात आली पाहिजे. हा गुण आला की बाकीचे गुण यायला अवधी लागत नाही. म्हणून त्याचे स्थान सर्वोच्च ठेवले आहे.

निर्भयता ही खरी दैवीसंपत्ती आहे. म्हणून भक्तिमार्गातसुद्धा त्याचे स्थान श्रेष्ठ आहे. शक्तिशाली विचार, ज्ञान, सत्संग, गुरुकृपा व भगवंताच्या ठिकाणी संपूर्ण शरणागतता होऊन केलेली भक्ती हीच मनुष्याच्या जीवनात निर्भयता निर्माण करते.

**दिनांक २३ ऑक्टोबर**

**तैसे पुढिलाचेनि तापे[१] । कळवळलिये कृपे ।**
**सर्वस्वेसी दिधले[२] आपणपे । तरी थोडेचि गमे[३] ।।१६.१६७ ।।**

*शब्दार्थ - १) दुःखाने २) दिले ३) वाटते*

**अर्थ** - त्याप्रमाणे दुसऱ्याच्या दुःखाने जो दयेने कळवळतो व त्याचे दुःख निवारणार्थ त्याला आपले सर्वस्व देऊनही ते थोडेच मानतो.

## भक्त दयावान असला पाहिजे

भक्ताच्या अंगी कोणते गुण असावेत याचा परामर्श आपण मागील ओवीत घेतला. हे दैवीगुण ज्याच्या ठिकाणी वसतात तो भगवंताचा आवडता भक्त व असे गुण पूर्णत्वाला नेणे हीच खरी भक्ती. याच गुणांच्या उत्कर्षाने मनुष्याचे अंतःकरण शुद्ध होते. चित्तशुद्धी झाली की त्या ठिकाणी ज्ञान प्रतिष्ठित होते. ज्ञानाने भक्ती दृढ होते.

२६ गुणांपैकी 'अभय' याप्रमाणेच 'दया' हा अलौकिक गुण आहे. सर्वभूतमात्राच्या ठिकाणी दया असणे हेच खरे पारमार्थिक जीवन आहे.

स्वकेंद्रित व स्वार्थप्रेरित जीवन हे पशुजीवन. मीही जगावे व दुसऱ्यास जगू द्यावे ही मनुष्यता आहे. जो केवळ स्वतःसाठी जगतो त्याच्या जीवनाला कधीही सुगंध प्राप्त होत नाही. पण जो निःस्वार्थबुद्धीने दुःखितांच्या, पीडितांच्या जीवनात आनंदाची पेरणी करतो त्याचे जीवन कृतार्थ होते. संत-महात्म्यांच्या ठिकाणी शुद्ध, निर्मल दया-भाव असतो. दुसऱ्यांच्या सुखासाठी कसलाही त्याग करण्याची त्याची तयारी असते.

असा मनोभाव भक्ताच्या ठिकाणी असावा लागतो. "दुसऱ्याचे दुःखे दुखावे । दुसऱ्याचे सुखे सुखावे । अवघेचि सुखी असावे । ऐसी वासना ।।" असे संत रामदासांनी एका ओवीत या गुणाचे वर्णन केले आहे. सर्व संतांची भाषा एक असते. हृदयाचे बोल तेच असतात, अभिव्यक्ती थोडी वेगळी असते एवढेच.



ॐ

ज्ञानेश्वरांनी पाण्याची सुंदर उपमा यासाठी दिली आहे. पाणी जसे समोरील खड्डा भरल्याशिवाय पुढे जात नाही त्याप्रमाणे पुढे आलेल्या दुःखितांचे दुःख दूर केल्याशिवाय दयावान पुरुष पुढे जात नाही. असा पुरुष दुसऱ्याच्या दुःखाने कळवळतो. जसे पायाला काटा लागला की ती वेदना हृदयात होते, त्याप्रमाणे दुसऱ्याच्या दुःखाने तो पोळला जातो.

एकवेळ दुसऱ्याच्या दुःखाने दुःख होईल पण दुसऱ्याच्या सुखाने सुख होणे, हाच खरा कसोटीचा क्षण असतो. वरवर हास्याचे नाटक करता येते किंवा शब्दांनी दुसऱ्याच्या सुखात सहभागी होता येते, पण त्या सुखाने अंतःकरणात खरा आनंद होणे हे मात्र दयावानालाच शक्य होते. असा दयावान पुरुष पाण्यासारखा असतो. तहानलेल्याकरिता जसे जगात पाणी राहिले आहे त्याप्रमाणे दुःखितांच्या दुःख निवारणार्थ त्याचे जीवन खर्च होते.

ज्याप्रमाणे पौर्णिमेच्या चंद्राचे चांदणे गारवा देत असता लहान-थोर अशी निवड करीत नाही, त्याप्रमाणे दुःखितांच्या दुःखाचे निवारण करीत असता तो पुरुष श्रेष्ठ-कनिष्ठ असा भेदाभेद करीत नाही.

दया, क्षमा, शांती जेथे असते तेथे देवाची वसती, असे यासाठीच म्हटले आहे. अशा दयावान पुरुषांच्या बाबतीत मी ऋणी आहे, असे भगवंत येथे म्हणतात.

ज्ञानदेवांनी या सर्व गुणांचे असेच रसभरीत काव्यात्मक वर्णन केले आहे. ज्ञानदेवांची भक्ताची संकल्पना ही अशी सद्गुणसंपन्नाची आहे. भक्ताची वृत्ती, स्वभाव तसा असला पाहिजे हा त्यांचा आग्रह आहे.

**दिनांक २४ व २५ ऑक्टोबर**

**जे पुरुषार्थ सिद्धी[१] चौथी[१] । घेऊनी आपुला हाती ।**
**रिगाला भक्तिपंथी । जगा देतु ।। १२.२१९ ।।**
**म्हणोनि गा नमस्कारु । तयाते आम्ही माथा[२] मुगुट करू ।**
**तयांचि टाच धरूं । हृदयी आम्ही ।। १२.२२१ ।।**

*शब्दार्थ - १) मोक्ष २) डोक्यावर*

**अर्थ** - कारण की, तो भक्त चौथी पुरुषार्थसिद्धी जो मोक्ष, तो आपल्या हातात देऊन भक्तीच्या मार्गाने जगाला मोक्ष देण्यास निघाला. ।।१२.२१९।।

म्हणून आम्ही त्याला नमस्कार करू. त्याला आम्ही डोक्यावरचा मुकुट करू व त्याची टांच आम्ही हृदयावर धरू. ।।१२.२२१।।

## ज्ञानेश्वरांच्या ज्ञानी भक्ताची महती

सोळाव्या अध्यायातील २६ दैवीगुणांपैकी केवळ दोन (अभय व दया) गुणांचे आपण वर्णन पाहिले. आता बाराव्या या, भक्तियोगावरील अध्यायात माऊलींनी आपले हृदय ज्याच्यात ओतले आहे, त्या ३६ गुणांपैकी काही गुणांचा परामर्श घेऊ.

बाराव्या अध्यायातील १३ ते २० या आठ श्लोकांत भगवंतांनी हे ३६ गुण सांगून भक्त व भगवंताची कुंडली मांडली आहे. हे आध्यात्मिक लग्न आहे. भगवंताशी लग्न होण्यासाठी भक्ताला या गुणांची आवश्यकता आहे. मधुराभक्तीत भगवंताला पती, स्वामी मानले जाते. नवव्या अध्यायात भगवंताची जी विविध रूपे सांगितली आहेत, त्यात 'भर्ता' हे एक रूप आहे. अकराव्या अध्यायातसुद्धा या वेगवेगळ्या संबंधांचा निर्देश झाला आहे. 'पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम' पुत्र, सखा व शेवटी प्रियतमा इथपर्यंत भक्ताने जायचे आहे. हा संबंध प्रस्थापित व्हायचा असेल तर भक्ताच्या ठायी हे दैवीगुण आले पाहिजेत.

हे सर्व दैवीगुण आहेत. यातील एक गुण जरी जीवनात आला तरी जीवन कृतार्थ होईल अशी या गुणांची महती आहे. भगवंताच्या लाडक्या भक्ताचे हे गुण आहेत. दुसऱ्या, तेराव्या, चौदाव्या, सोळाव्या व येथे बाराव्या अशा अध्यायात वेगवेगळ्या स्वरूपात या दैवीगुणांची मांडणी झाली आहे. हा पुनरुक्तीचा दोष नाही. भगवंताला हे गुण इतके महत्त्वाचे वाटतात की, या गुणांशिवाय त्याच्याजवळ जाणे केवळ अशक्य आहे. भक्ती म्हणजे वृत्ती व ही वृत्ती, हे गुण अंगी बाणल्याशिवाय निर्माण होत नाहीत. खरा पंडित तोच की, ज्याने मणभर ज्ञानापेक्षा कणभर ज्ञान आचरणात आणले. एखाद्या पुरुषाच्या जिभेवर सकळ शास्त्रे जरी नाचत असली तरी, जोपर्यंत त्याच्या चित्तात अहंता, आसक्ती आहे तोपर्यंत कितीही जन्म घेतले तरी, आपण त्यास प्राप्त होत नाही, असे भगवंतांचे म्हणणे आहे. म्हणूनच या गुणांचे माहात्म्य मनावर बिंबविण्यासाठी यांचा पुनःपुन्हा उच्चार भगवंतांनी केला आहे.

"अद्वेष्टा सर्वभूतानां'पासून सुरुवात करून 'संतुष्टो येन केनचित्'पर्यंत जीवन विकास होणाऱ्या लाडक्या भक्तांच्या जीवनाचे हे तत्त्वज्ञान आहे. हे वैश्विक गुण आहेत. जगाच्या पाठीवर, कोठेही असणाऱ्या मानवी जीवनात सर्वांगीण विकासासाठी ह्या गुणांची आवश्यकता आहे.

ही छत्तीस लक्षणे, ज्ञानी भक्ताची आहेत. ज्ञानेश्वरांनी या एक एक गुणाचे वर्णन करताना आपल्या उत्तुंग काव्यप्रतिभेचे विलक्षण दर्शन घडविले आहे. कारण ज्ञानी भक्त हा माऊलींचा सर्वांत आवडता भक्त आहे. या अध्यायाच्या १४४ ते २२९ या ओव्यांमध्ये हा उत्कट आविष्कार प्रकट झाला आहे.

आपण तरोनि विश्व तारण्यास निघालेल्या संतांचा आणि देवाचा संबंध कसा असतो याच्याविषयी माऊली म्हणते, "हे विश्वचि माझे घर." म्हणून आत्मा, परमात्मास्वरूप झाल्याचा अनुभव ज्यांना आला आहे अशांच्या पुढच्या कर्तव्याबद्दल सांगताना ज्ञानेश्वर म्हणतात -

**मग यावरीही पार्था । माझा भजनी आस्था ।**
**तरी तयांते मी माथा । मुकुट करी ।।१२.२१४।।**

आपण ज्ञानी झालो, साधनाची आवश्यकता नाही असे म्हणणारे आणि मानणारे कच्चे साधू - भक्त ज्ञानेश्वरांच्या काळीही होते. म्हणून हे विश्वचि माझे घर, अशा स्थितीला पोहोचले तरी साधन चुकविता कामा नये, असा वरील ओवीतील गर्भितार्थ आहे. जीवात्मा, विश्वात्म्याच्या स्थितीला पोहोचला तरी आस्थेने, प्रेमाने जो भक्ती करतो त्याला भगवंत श्रेष्ठ पदवी देतो.

म्हणून देवाचे अशा भक्तावर किती प्रेम असते ते २१९ व २२१ या ओव्यांतून श्री ज्ञानेश्वरांनी कथन केले आहे.

धर्म, अर्थ, काम, मोक्ष हे चार पुरुषार्थ समजले जातात. चौथा पुरुषार्थ केवळ आत्मसाक्षात्कारासाठीच आहे. त्याला ज्ञानी म्हटले आहे. असा चौथा ज्ञानी भक्त जगाच्या कल्याणासाठी 'रिगाला भक्तिपंथी । जगा देत ।' असे माऊली म्हणते. भक्तीचा प्रचार करून, भगवंताच्या विचारांचा संदेश जे आत्मज्ञानी भक्त साऱ्या विश्वाला देण्यासाठी देह झिजवितात अशा भक्तांना आपण आपल्या शिरावर धारण करतो, असे भगवंतांनी म्हटले आहे. भक्तीचा प्रचार व प्रसार केल्याखेरीज अशा ज्ञानी भक्तांचे कार्य संपत नाही.

'देव श्रेष्ठ की भक्त श्रेष्ठ?' या प्रश्नाला ज्ञानेश्वरांनी उत्तर दिले, 'म्हणोनि आम्ही नमस्कारु । तयाची टांच धरू हृदयी ।।' आणि वरील ओवीत म्हटले की, आम्ही त्याला केवळ नमस्कार करणार नाही तर आम्ही त्याला डोक्यावरचा मुकुट करू.

भक्तांच्या गुणांचा गौरव भगवंतच करतो, त्याची कीर्ती आपणहून ऐकतो. निर्गुण, निराकार असूनसुद्धा अशा भक्तांसाठी देह धारण करतो. भक्ताच्या सगुणरूपात त्याचाच अंश प्रकटतो. अशा भक्ताची तो पूजादेखील करतो. 'घेऊनी पूजेचा संभार, ब्रह्मा येतसे समोर' असे नामदेवांनी म्हटल्याचा अर्थही तोच आहे. पूजा, पूजक व पूज्य एकच





होतात असा हा देव, ज्ञानी भक्त यांचा संबंध आहे.

**आम्ही तयाचे करू ध्यान । तो आमचे देवतार्चन ।**
**ते वाचूनि आन । गोमटे न मानू ।।१२.२३६ ।।**
**तयाचे आम्हा व्यसन । तो आमुचे निधिनिधान ।**
**किंबहुना समाधान । तो मिळे तै ।।१२.२३७ ।।**

**अर्थ** - आम्ही त्याचे ध्यान करू, ते आमची पूजन करण्याची देवता आहेत, त्यांच्यावाचून दुसरे काही चांगले आम्ही मानत नाही. ।।१२.२३६।।

त्यांचा आम्हांस छंद असतो व तेच आमच्या ठेव्याची खाण आहेत. फार काय सांगावे ते आम्हाला भेटतात तेव्हाच आम्हास समाधान वाटते. ।।१२.२३७।।

अशा भक्तांची भगवंताला उत्कंठा लागलेली असते. तेच तीर्थ, तेच क्षेत्र, तेच पवित्र व जगामध्ये भक्त व योगी तेच आहेत. असे या भक्तांचे माहात्म्य बाराव्या अध्यायाच्या शेवटी माऊलींनी वर्णन केले आहे.

**दिनांक २६ ऑक्टोबर**

**तयालागी मज रूपा येणे । तयाचेनि मज येथे असणे ।**
**तया लोण[1] कीजे जीवे प्राणे । ऐसा पढिये[2] ।।१२.१८९ ।।**

*शब्दार्थ - १) कुरवंडी २) आवडता असतो*

**अर्थ** - त्याच्याकरिता मला सगुण मूर्ती धारण करावी लागते आणि त्याच्याकरिताच (मला सगुण विग्रहाने) या जगात राहावे लागते, तो मला इतका आवडतो की, त्यावरून जीव व प्राण ओवाळून टाकावेत.

## भगवंताला ज्ञानी भक्त सर्वांत प्रिय

ज्या भक्तात हे दैवीगुण एकवटलेले असतात ते ज्ञानी भक्त भगवंताला सर्वांत प्रिय असतात, याचा पुनःपुन्हा उच्चार ज्ञानेश्वरीत झाला आहे. कारण ज्ञानेश्वरांना हाच भक्त प्रिय आहे. बाराव्या अध्यायात ज्ञानी भक्ताची ३६ लक्षणे विस्ताराने सांगितली आहेत. १४४ ते २२९ या ओव्यांमध्ये हे वर्णन आहे.

सर्व भूतांच्या ठायी द्वेष न करणारा, मैत्रीने वागणारा, अनहंकारी, मी-माझेपण विसरलेला, सुख व दुःख यात समत्व राखणारा, क्षमाशील, सदोदित संतुष्ट, नियतचित्त, मला मन व बुद्धी अर्पण केलेला, ज्याला लोकांचा कंटाळा येत नाही व लोक ज्याला कंटाळत नाहीत, हर्ष, क्रोध, लोभ, भय, उद्वेग यांच्यापासून सुटलेला, निरपेक्ष, अंतर्बाह्य शुद्ध, अनासक्त, जो हर्ष पावत नाही व द्वेषही करत नाही, शोकही करत नाही, ज्याला आत्मलाभाशिवाय दुसऱ्या कशातही गोडी वाटत नाही. म्हणून विशेष भोगानेसुद्धा जो आनंदित होत नाही, आपणच विश्व झाल्यामुळे ज्याच्या मनातील भेदभाव मिटून गेलेला आहे, ज्याला आपले खरे त्रिकालाबाधित आत्मस्वरूप समजले आहे म्हणून कशाचाही जो शोक करीत नाही, स्वतःतच सुखाचा आनंदाचा ठेवा आहे याची पूर्ण खात्री झाल्यामुळे जो कशाचीही आशा-आकांक्षा करीत नाही, बरे-वाईट याच्यात जो भेद करीत नाही व त्या दोहोंचाही ज्याने सर्वस्वी त्याग केलेला आहे, शत्रू आणि मित्र, मान व अपमान, स्तुती वा निंदा, शीत आणि उष्ण, सुख व दुःख अशा सर्व द्वंद्वात जो समत्व भावनेने पाहतो, अंतर्बाह्य अनासक्त, शुद्ध, हे विश्वचि माझे घर म्हणून राहिल्यामुळे कोठेच आश्रय धरून न राहणारा, स्थिर बुद्धी व श्रद्धायुक्त अंतःकरण असलेला भक्तिमान ज्ञानी भक्त भगवंताला आवडतो.

ॐ

स्थूलमानाने ही ज्ञानी भक्ताची लक्षणे, ज्ञानेश्वरांनी सविस्तर सांगितली आहेत.

असा हा ज्ञानी भक्त अद्वैताच्या साक्षात्कारामुळे सर्व ठिकाणी व सर्व भूतमात्रात आपल्यासह एकच परमात्मा पाहतो म्हणून 'जे जे भेटे भूत । ते ते मानिजे भगवंत' अशी व्यापक दृष्टी त्याला येते. कुठेही कोणाचाही द्वेष राहत नाही. त्याचे अंतःकरण शुद्ध, निर्मळ, पवित्र झाल्यामुळे त्याच्यात दया, करुणा, वात्सल्य, प्रेम याचा पराकोटीचा आविष्कार झालेला असतो. तो 'स्वान्तःकरणजिता' झाल्यामुळे मन, बुद्धी, इंद्रिये यांचा पूर्ण निग्रह करून तो शांत, तृप्त, निवांत असतो. अशा ज्ञानी भक्ताला ज्ञानेश्वर योगी म्हणतात. असा हा मनोनिग्रह योगसामर्थ्यामुळे येतो. ''आणि ज्ञानाचे चांगावे । इयेचि दृष्टि नावे । योगांचेही आघवे । सर्वस्व हे ।।'' (१४.३८८). जसे परमाणू पृथ्वीवरच असतात, बर्फाचे कण हिमालय पर्वतावर असतात त्याप्रमाणे 'अहं' हा मज परमात्म्याच्याच ठिकाणी आहे. असा त्याचा दृढ भाव असतो. समुद्रावर उठलेला तरंग हा लहान असला तरी तो समुद्राहून भिन्न नाही, तसा मी परमात्म्याहून भिन्न नाही. अशा प्रकारची अभेद प्रेमदृष्टी या भक्ताची होते. श्री ज्ञानेश्वर या अभेद प्रेमदृष्टीलाच भक्ती म्हणतात आणि या दृष्टीने ज्ञानमार्गाचे उत्तमत्व मानले जाते. योगाचेही सारसर्वस्व हेच आहे.

ज्याप्रमाणे समुद्रावर पाऊस पडत असताना समुद्र व मेघ यांच्यामध्ये अखंड पाण्याची धार लागलेली असते, त्याप्रमाणे अर्जुना, मज परमात्म्याच्या ठिकाणी अखंड प्रेमवृत्ती लागणे ही भक्ती होय.

**आंत बाहेरि चोखाळू । सूर्य तैसा उजाळु ।**
**आणि तत्वार्थी पायाळू । देखणा जो ।। १२.१७९ ।।**

**अर्थ -** सूर्य जसा आतबाहेर निर्मळ असतो, त्याप्रमाणे तो आत अंतःकरणाने व बाहेर शरीराने पवित्र असतो. असा तो ब्रह्मरूपी धनाला पाहणारा पायाळूही आहे.

आपणच अद्वैत ब्रह्म आहोत याचा पूर्ण बोध झाल्यामुळे सर्वत्र आत्मौपम्य दृष्टीने तो पाहतो. असा त्रिगुणातीत झालेला भक्त श्रद्धेने, सेवेने, प्रेमाने भक्ती करून विश्वकल्याणासाठी धडपडत असतो. तेच त्याचे जीवनकार्य असते. पराभक्तीने आत्मसाक्षात्कार झालेला असा ज्ञानी भक्त केवळ लोकोपकारापुरताच वावरतो.

**स्वकर्माचा चोखौळी । मज पूजा करुनी भली ।**
**तेणे प्रसादे आकाळी । ज्ञाननिष्ठेते ।।**
**ते ज्ञाननिष्ठा जेथ हातवसे । तेथ भक्ति माझी उल्लासे ।**
**तिया मजसी समरसे । सुखिया होय ।।**

**अर्थ -** स्वकर्मरूप चांगल्या पुष्पांनी माझी सुंदर पूजा करून माझ्या प्रेमरूप कृपाप्रसादाने, ज्ञाननिष्ठा तो प्राप्त करून घेतो.

तो ज्ञानमार्ग जेव्हा हस्तगत होतो, तेव्हा माझ्या भक्तीचा आविर्भाव होतो व तिच्या योगाने माझ्याशी समरस होऊन तो सुखी होतो.

ज्ञानप्राप्तीनंतरच परमप्रेम होऊ शकते. या ओवीत माऊलींनी ज्ञान व भक्ती यांचा जनक व जन्य हा संबंध दाखविला आहे. म्हणून श्री ज्ञानेश्वरांनी या ओवीत अद्वैत ज्ञाननिष्ठा ही प्रथम दाखविली. त्यानंतर परमप्रेमाचा सगुण भगवंताच्या ठिकाणी आविष्कार व नंतर समरसतेचा अनुभव व शेवटी परमानंदता असा क्रम दाखविला आहे.

**दिनांक २७ ऑक्टोबर**

**मग सांवळा[1] सकंकणु[2] । बाहु[3] पसरोनि दक्षिणु[4] ।**
**अलिंगिला स्वशरणु[5] । भक्तराजु तो ।।१८.१४१८ ।।**



ॐ

*शब्दार्थ - १) काळसर २) कंकणयुक्त ३) हात ४) उजवा ५) स्वतःला शरण आलेल्या*

**अर्थ -** मग श्यामसुंदर श्रीकृष्णाने आपला कंकणयुक्त उजवा बाहू पसरून, आपल्याला शरण आलेला, भक्तश्रेष्ठ जो अर्जुन, त्याला आलिंगन दिले.

## शरणागतांना मी अभय देतो

(भगवंताचे आश्वासन)

''सर्वधर्मान परित्यज्य मामेकं शरणं व्रज...'' या मंगल, पवित्र श्लोकावरील माऊलींचे निरूपण म्हणजे भक्तियोगावरील उत्कृष्ट भाष्य आहे. यात माऊलींनी भक्तीचा कळस गाठला आहे. १३९० ते १४८५ एवढ्या ओव्या या एका महन्मंगल श्लोकावर माऊलींनी सांगितल्या आहेत. भगवंत व भक्त अर्जुन यांच्या संबंधाचा मधुर भाव येथे प्रकट केला आहे. तसेच भक्ताने भगवंताला सर्वभावाने कसे शरण यावे, याचा उपदेश भगवंतांनी स्वतः केला आहे. संपूर्ण शरणागत झालेल्या भक्ताच्या रक्षणाची जबाबदारी मी स्वतः घेतो, असे भगवंताचे वचन आहे.

सोऽहं भावाने कसे शरण यावे याचा उत्तम मार्ग भगवंतांनी सांगितला आहे. पुन्हा एकदा अद्वैत भक्तीचे माहात्म्य वर्णन केले आहे. सर्व अध्यायाचा संक्षिप्त परामर्श घेऊन भगवंताने त्या सर्वांचा समारोप या ओव्यांतून केला आहे.

''सर्व धर्मांचा त्याग करून तू मला एकट्यालाच शरण ये. मी तुला सर्व दोषांतून मुक्त करीन. तू शोक बिलकुल करू नकोस. अरे अर्जुना, दिवस मावळल्यावर मृगजळ नाहीसे होते, त्याप्रमाणे व्यर्थ धर्माधर्माचे अज्ञान नाहीसे करून तू मला येऊन प्राप्त हो. अज्ञान नाहीसे झाल्यावर आपोआप आपण एकटे राहतो. मग माझ्यावाचून दुसरे भिन्न भिन्न काहीच नाही. असे हे माझे स्वरूप ध्यानी घेऊन तू सुद्धा 'सोऽहं', तोच मी आहे या भावाने माझ्याशी अनन्य हो. अर्जुना, आपल्याला माझ्याहून भिन्न न मानता जे माझे एकपण जाणावयाचे, त्याचेच नाव मला शरण येणे होय. म्हणून घट फुटल्यानंतर घटाकाश जसे महाकाशात ऐक्याने प्रवेश करते, अशा ऐक्याने मला शरण ये. सोन्याचा मणी जसा सोन्याला शरण येतो व त्याच्याशी ऐक्य साधतो, समुद्राची लाट जशी समुद्राच्या पाण्याशी ऐक्य पावलेली असते तेवढ्याच ऐक्याने तू मला शरण ये. माझ्याहून भिन्न राहून, शरण येण्याच्या त्या गोष्टी टाकून दे.

म्हणून मद्रूप होऊन माझी भक्ती करणे ही माझी सहज भक्ती आहे. अशी भक्ती करून जेव्हा तू मला शरण येशील त्या वेळी पुन्हा जीवभाव किंवा कसलेही बंधन तुला राहणार नाही. अशा अद्वैत भावाने मला शरण आल्यावर तुला धर्माधर्मबाधक होणार नाहीत. माझ्याशी ऐक्य पावल्यावर मी जो सर्वरूप त्या माझ्याशिवाय दुसरे काही करण्याला काही उरेल काय?

म्हणून तू कशाचीही काळजी करू नकोस. तुझे पुण्य व पाप मीच होईन. तुझ्या चित्तात, तू कसलीच चिंता बाळगू नकोस.

इतके आश्वासन देऊन भगवंतांनी आपल्या प्रिय भक्ताला, अर्जुनाला, कंकणयुक्त उजवा बाहू पसरून आलिंगन दिले. अर्जुन हा भक्तश्रेष्ठ होता. त्याला सर्वस्व अर्पण करण्यासाठी हे आलिंगन होते. या आलिंगनामुळे

**हृदया हृदय एक जाले । ये हृदयीचे ते हृदयी घातले ।**
**द्वैत न मोडता केले । आपणां ऐसे अर्जुन ।।१८.१४२१।।**

**अर्थ -** तेव्हा आलिंगनाच्या वेळी देवाचे व अर्जुनाचे हृदय एक झाले. देवांनी आपल्या हृदयात असलेला बोध अर्जुनाच्या हृदयात घातला व देव व भक्त असे द्वैत न मोडता, देवांनी अर्जुनाला आपल्यासारखे केले. एका दिव्याने दुसरा दिवा लावला की दोन्हीही सारखे होतात. कोणी कुणाला बोध दिला हे द्वैत जसे राहत नाही तसे कृष्ण-अर्जुनाचे, देव-भक्ताचे झाले.

ईश्वरभक्त अद्वैत नात्याची अत्यंत व्यापक आणि विश्वात्मक अशी कल्पना ज्ञानेशांनी मांडली आहे. ज्ञानेश्वरांचा भक्त अर्जुनाच्या रूपाने व्यक्त झाला आहे. हा ज्ञानी भक्त विश्वरूप होऊन अवघ्या विश्वात संचार करतो. पराभक्ती करणाऱ्या भक्ताला परमेश्वर जणू आपल्या डोक्यावर धारण करतो. भक्ताचा एकही क्षण ईश्वरावाचून जात नाही आणि ईश्वरही अशा भक्तापासून दूर राहत नाही. कृष्ण व अर्जुन हे या ईश्वरभक्त नात्याचे सर्वोत्तम आदर्श आहेत. दुसऱ्या अध्यायात अर्जुन म्हणतो -

**तू गुरु बंधु पिता । तू आमची इष्टदेवता ।**
**तूचि सदा रक्षिता । आपदी आमुते ।। ।।२.५१ ।।**

भगवंताला भक्ताने आपल्या हृदयात कोणत्या नात्याने ठेवावे याचा हा परिपाठ आहे. ईश्वर हाच सखा, गुरू, बंधू, पिता, माता, इष्टदेवता असे सर्वस्व तोच, अशी भक्ताची धारणा झाली पाहिजे.

भक्ताच्या अशा अनन्यभावाने भगवंत प्रसन्न होतो. भक्ताचे केवळ प्रेम, त्याचा भाव भगवंताला पाहिजे असतो. म्हणूनच श्रीकृष्णांनी अर्जुनाच्या रथाचे सारथ्य केले.

**देखा नवल तया प्रभूचे । अद्भुत प्रेम भक्तांचे ।**
**जे सारथ्य पार्थाचे । करितु असे ।। १.१४२ ।।**

**अर्थ -** पाहा त्या प्रभूचे नवल! त्याचे भक्ताविषयीचे प्रेम विलक्षण आहे. कारण तो सर्वशक्तिमान श्रीकृष्ण अर्जुनाच्या रथाचे सारथ्य करीत होता.

अठराव्या अध्यायात श्रेष्ठ भक्ताचे वर्णन आहे म्हणूनच भगवंतांनी शरणागत आलेल्या अर्जुनाला आलिंगन दिले.

**दिनांक २८ ऑक्टोबर**

**आपुली तहानभूक नेणे[1] । तान्ह्या निके[2] ते माऊलीसीचि करणे ।**
**तैसे अनुसरले[3] जे मज प्राणे । तयांचेन काईसेनेहि न लजे मी ।। ९.३४० ।।**

*शब्दार्थ - १) जाणत नाही २) योग्य ३) भजले*

**अर्थ -** आपली तहानभूक (ज्याला) काही कळत नाही त्या लहान मुलाला जे हितकारक असेल ते आईलाच करणे भाग पडते. त्या (मुला)प्रमाणे जे मला अंतःकरणपूर्वक भजले त्यांचे काहीही करण्यास मी लाजत नाही.

## अंतःकरणपूर्वक प्रेम करणे हीच भक्ती

संपूर्ण शरणागती हीच ईश्वराजवळ नेते. शरणागतीच्या लक्षणांपैकी आणि दोन लक्षणे महत्त्वाची आहेत. अशा लक्षणांनी युक्त असलेला भक्त भगवंताला आवडतो.

नवव्या अध्यायाच्या ''अनन्याश्चेन्तयन्तो मां...'' या २२ व्या श्लोकावरील ही ओवी आहे. त्यातील पहिले लक्षण हे की, 'तैसा मी वांचुनि काही । आणीक गोमटेचि नाही' असे भक्ताला वाटले पाहिजे. ज्यांनी आपल्या जगण्यास माझेच नाव ठेवले आहे अशा एकनिष्ठ चित्ताने माझे चिंतन करीत जे माझी उपासना करतात त्या भक्तांचा भार माझ्यावर येऊन पडतो. शरणागत होणे म्हणजे त्याचेच होणे.

अनन्यभाव हे पहिले लक्षण व दुसरे लक्षण म्हणजे, देवाशिवाय दुसरी कसलीही प्रेमाची वस्तू असता कामा नये. चांगले वाटण्यात प्रेमाचा भाव मुख्य आहे. ज्याच्यावर आपले प्रेम असते तेच आपणास चांगले वाटते. तेच आपणास आवडते, हा सहज मनुष्यस्वभाव आहे. 'प्रेम हेच भक्तीचे मूळ आहे.' या आत्यंतिक आणि अनन्य प्रेमाने देवाचे नाम भक्ताचे जीवन ठरते. ''नाम हाचि देव, नाम तेचि रुप'' अशी अवस्था भक्ताची होते.





देह, मन, बुद्धी या सर्वांना एकवटून अनन्य चित्ताने, शरीरातील रोमारोमात देवाचीच आठवण करणारे व त्याचीच उपासना करणारे जे भक्त आहेत अशांचा देवच दास बनतो.

ज्ञानेश्वरांच्या भक्तियोगात जसे ज्ञानाला महत्त्व आहे तसेच प्रेमाला श्रीकृष्णाला-विठ्ठलाला भक्ताचे प्रेम आवडते. म्हणूनच भक्ती प्रेममय असते. प्रेमाविना भक्ती म्हणजे वात्सल्याविना हृदय. भक्ती ही प्रेमस्वरूपच असते, ''साऽत्वास्मिन् परमप्रेम स्वरूपा, अमृतस्वरूपा च' हे नारदीय भक्तिसूत्रात सांगितले आहेच. ज्ञानेशांनी या प्रेमभक्तीचा गोडवा गायिला आहे. हरिपाठाच्या अभंगात ज्ञानेशांनी याचा उच्चार केला आहे. 'भावबळे आकळे एऱ्हवी नाकळे' - 'भावेवीण भक्ती...', 'ज्ञानदेवा फळ नारायण पाठ । सर्वत्र वैकुंठ केले असे'', 'एकतत्त्व नाम दृढ धरी मना' अशा अनेक वचनांतून भावमय, प्रेममय भक्तीचे माहात्म्य ज्ञानदेवांनी सांगितले आहे.

कोरडे नाम देवाला कधीही वश करीत नाही. प्रेमाने घेतलेल्या नामाचेच देवाला आकर्षण असते.

विठ्ठलाला माऊली म्हणूनच हाक मारले आहे. पंढरपूरचा विठ्ठल हाच यशोदेचे बाळ होऊन ''करनाटकु'' झाला, अशी सर्व संतांची श्रद्धा आहे. जसे परब्रह्मच गोकुळात कृष्णाच्या रूपाने अवतरले तसेच ते विठ्ठलाच्या रूपाने पंढरपुरात साकारले.

अशा विठ्ठलाच्या चरणी सर्व वृत्ती तदाकार झाल्या की, भक्ताचे रक्षण तो विठ्ठल करतो, ही सर्वांची श्रद्धा आहे.

देह, मन, बुद्धी आणि अहंकार चित्तात एकवटून देवाच्या चिंतनाकडे लावल्यावर कार्याला प्रवृत्त करणारी सर्व शक्ती देवस्वरूप बनते. या भक्ताला देवपण प्राप्त होते. ब्रह्मस्वरूप बनलेल्या भक्ताचा भाव ब्रह्मस्वरूप होतो. अशी अवस्था देवाच्या कृपेमुळेच मिळते.

अनन्य प्रेमामुळे भगवंताला आई व्हावे लागते. आई जशी आपल्या तान्ह्याची, छकुल्याची सर्वस्वी काळजी घेते तसे भगवंत अशा भक्ताची सर्वस्वी काळजी घेतो. अंतःकरणपूर्वक सर्वभावे शरणागत होऊन, अनन्य प्रेमाने भजणाऱ्या भक्ताचे सर्व प्रकारे रक्षण करताना भगवंत कशाचीही तमा बाळगत नाहीत. ''मला कशाचीही लाज वाटत नाही,'' असे धन्योद्गार भगवंत स्वतः या वरील ओवीत व्यक्त करतात. भगवंताला 'माऊली' हे नाव सार्थ करायचे असते.

श्री ज्ञानदेवांच्या भक्तियोगाचे हे सार आहे.

।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।

ॐ

## प्रकरण दुसरे

# श्री ज्ञानेश्वरांचा कर्मयोग

कर्ममार्ग, ज्ञानमार्ग आणि योगमार्ग हे तीन मार्ग ज्ञानेश्वरांच्या भक्तिपंथाला येऊन मिळाले आहेत. या तीन मतांचे भक्तियोगात सामरस्य झाले आहे. भक्तीचे शास्त्र हे "साच बोलाचे नोहे शास्त्र" असा ते इशाराही देतात.

पहिल्या प्रकरणात भक्तियोगाच्या अनेक पैलूंचे दर्शन घेतले. ज्ञानेश्वरप्रणीत भक्तिकल्पना ही ज्ञानोत्तर भक्तीची कल्पना आहे. ज्ञान म्हणजे आत्मज्ञान. ज्ञान हे भक्तीचे डोळे आहेत. ज्ञानेश्वरांनी गौणीभक्ती व पराभक्ती यांच्या सर्वच प्रकारांना भक्तीत महत्त्वाचे स्थान दिले आहे.

ज्ञान व योग यांच्या बरोबरीने ज्ञानेशांनी कर्ममार्गाचेही मार्मिक विवेचन केले आहे. गीतेच्या कर्मसिद्धान्ताला अनुसरून जसे हे विवेचन आहे तसेच काही क्रांतिकारक पण समाजाला धारण, पोषण करणारे स्वतंत्र विवेचनसुद्धा माऊलींनी केले आहे. त्यामुळे ज्ञानेश्वरांचा कर्ममार्ग हा भक्तियोगाची संकल्पना परिपूर्ण करणारा आहे.

दुसऱ्या प्रकरणात एकूण २५ ओव्यांतून या कर्ममार्गाचे परिपूर्ण दर्शन घेण्याचा प्रयत्न आपण करणार आहोत. पहिल्या खंडातील कर्मयोगावरील खालील ओव्या संदर्भासाठी एकत्र दिलेल्या आहेत. एकूण ४१ ओव्यांचा तपशील असा -

| अध्याय | ओवी क्रमांक | अध्याय | ओवी क्रमांक |
|---|---|---|---|
| २ | १८२,२६६,२७३,२७७ | ६ | ४३ |
| ३ | ७८, ८१, ८२, ११०, | ९ | ३९८, ४००, ४०१ |
| | ११२, १५५, १५६, १५८, | ११ | ६९६ ते ६९९ |
| | १५९, १७१, १८६, १८८ | १२ | १२०, १२१, १२३, १२४ |
| ४ | ९८, ९९, १०३, १०४, १०५ | १८ | ९११, ९१७, ९१८, |
| ५ | ४९, ५० | | ९१९, १२४७, १२४८ |

**दिनांक २९ ऑक्टोबर**

**जैसी भ्रतारेहीन[1] वनिता[2] । उपहति[3] पावे[3] सर्वथा ।**
**तैशी दशा[4] जीविता । स्वधर्मेवीण ।।२.१९१।।**

*शब्दार्थ - १) पतीशिवाय २) पत्नी ३) उपमानीत होते ४) स्थिती, गती*

**अर्थ** - ज्याप्रमाणे पतिविरहित स्त्री सर्व प्रकारे अनादराला प्राप्त होते, त्याप्रमाणे स्वधर्मत्यागाने जीविताची तशी दशा होते.

## ज्ञानेश्वरांचा 'स्वधर्म'

कुरुक्षेत्रावर अर्जुनासमोर त्याचे गुरुजन व आप्तस्वकीय युद्धासाठी उभे ठाकले होते. त्यांच्याबरोबर लढून मिळालेले वैभव, राज्य, करायचे की नाही अशा संभ्रम अवस्थेत अर्जुन होता. विषादाने गोंधळून गेलेल्या अर्जुनाला भगवंतांनी स्वधर्माचा उपदेश केला आहे.



ॐ

दुसऱ्या व तिसऱ्या अध्यायातील ही स्वधर्मकल्पना समजल्याशिवाय ज्ञानेश्वरांचा कर्मयोग यथार्थपणे समजणार नाही. म्हणून पहिल्या काही ओव्यांतून हे स्वधर्माचे तत्त्वज्ञान आपण समजून घ्यायचे आहे.

दुसऱ्या अध्यायात देह व आत्मा यांचे स्वरूप सांगून झाल्यानंतर स्वधर्माचा विचार मांडला आहे. स्वधर्म म्हणजे जे नीतिनियमांना अनुकूल आहे व त्याचबरोबर आपल्या प्रकृतीला, स्वभावाला अनुसरून आहे तो स्वधर्म. स्वधर्म जन्मावरून नव्हे तर गुणकर्मावरूनच ठरावा. या अध्यायात सूत्ररूपाने स्वधर्माचा विचार सांगून त्याचा विस्तार तिसऱ्या व अठराव्या अध्यायात केला आहे. अर्जुन गुणकर्मावरून क्षत्रिय आहे. क्षात्रधर्म त्याचा स्वधर्म आहे. वेदकाळात धर्म हा यज्ञस्वरूप होता. ज्ञानेश्वरांनी स्वधर्म हाच यज्ञ आहे, असे ठासून सांगितले. यज्ञातील अवडंबर, कर्मकांड यांना फाटा देऊन स्वधर्मरूपी यज्ञाची कल्पना त्यांनी मांडली. विहित कर्म हा स्वधर्माला पर्यायी शब्द. म्हणून अठराव्या अध्यायात माऊली म्हणतात -

**अगा जया जे विहित । ते ईश्वराचे मनोगत ।।**

ज्याच्या वाट्याला जे कर्म आले आहे ती ईश्वराची इच्छा आहे म्हणून निवांतपणे आपले विहित कर्म करावे. स्वधर्माप्रमाणे आचरण करूनच ही ईश्वराची पूजा करावी. स्वधर्माचा विचार करता धर्म्ययुद्धापेक्षा अधिक मोठे कर्तव्य क्षत्रियाला दुसरे काहीही नाही.

स्वधर्म टाकणारा पापाला कारणीभूत होईलच पण त्याच्या अपकीर्तीचा डाग कल्पांतापर्यंतही जाणार नाही व अशी अपकीर्ती ही सज्जनांना मरणापेक्षा अधिक दुःखदायक असते. म्हणून स्वधर्माचे आचरण करताना त्यात कुठल्याही पातकाचा शिरकाव होत नाही.

**स्वधर्मु जो बापा । तोचिनित्ययज्ञु जाण पां ।**
**म्हणोनि वर्तता तेथ पापा । संचारु नाही ।। ३.८१।।**

स्वधर्म म्हणजे आपले विहित कर्म करणे हाच अखंड यज्ञ असतो. म्हणून आपले कर्तव्य चोख पार पाडणे म्हणजेच आपल्यासाठी नेमून दिलेला धर्म पाळणे होय. याचेच नाव यज्ञ व हाच खरा स्वधर्म.

दिव्याच्या उजेडाने व्यवहार करणाऱ्या माणसास कसलीही अडचण येत नाही, त्याप्रमाणे स्वधर्माने आचरण करणाऱ्यास काहीही संकट येत नाही.

पतिहीन स्त्रीचा जसा पदोपदी अपमान होतो त्याप्रमाणे अर्जुनाच्या क्षात्रधर्माची गती होईल, युद्ध न केल्यामुळे कुळाची कीर्ती नाहीशी होईल, स्वधर्माच्या त्यागाचे पाप लागेल व जगसुद्धा तुलाच दोषी धरेल, असे भगवंतांनी समजावले.

**म्हणोनि यालागी पाही । तुम्हां क्षत्रिया आणिक काही ।**
**संग्रामावाचूनि नाही । उचित जाणे ।।२.१८१।।**

**अर्थ** - यासाठी अर्जुना, तुम्हां क्षत्रियांना दुसरा धर्मच उचित नाही म्हणून युद्ध अपरिहार्य आहे. असे युद्ध धर्माला धरूनच आहे.

**दिनांक ३० ऑक्टोबर**

**आपणया[1] उचिता[2] । स्वधर्मतेचि रहाटता[3] ।**
**जे पावे ते निवांता[4] । साहोनि जावे ।।२.२२८।।**

*शब्दार्थ - १) आपल्याला २) योग्य ३) व्यवहार करीत असता, चालत असता ४) निमूटपणे, स्वस्थपणे*

ॐ

अर्थ - आपल्याला योग्य असे जे स्वधर्माचे आचरण, तेच करीत असताना, जो प्रसंग येईल, तो निमूटपणे सहन करावा.

## सुखदुःखात समत्व मानावे

अर्जुनाने शोक सोडून स्वधर्माच्या पालनासाठी युद्धास तयार व्हावे, असे भगवंत सांगतात. युद्धरूपी स्वधर्म सोडला तर तो कलंक कधीही दूर होणार नाही. अर्जुनाने युद्ध केले आणि जर तो रणांगणावर मृत्यू पावला तर त्याला अनायासेच स्वर्ग-सुखाची प्राप्ती होईल व युद्ध जिंकले तर पृथ्वीचे राज्य मिळेल.म्हणून माऊली म्हणते -

**म्हणोनि इये गोठी । विचार करी किरीटी ।**
**आता धनुष्य घेऊनि उठी । झुंझ वेगी ।। २.२२१ ।।**

अर्थ - एवढ्याकरिता अर्जुना, या गोष्टींचा विचार करीत बसू नकोस. आता हे धनुष्य घेऊन ऊठ आणि लवकर या युद्धाला आरंभ कर.

यशाची वा अपयशाची, हानी अथवा लाभाची, सुख अथवा दुःखाची कशीही परिस्थिती येवो, पण त्याची तू काळजी करू नकोस. सुखात व दुःखात तू समत्व ठेवून व्यवहार कर. स्वधर्माचे आचरण करीत असताना ते योग्य आहे याची खात्री झाल्यावर भविष्यातल्या परिणामांची काळजी करू नकोस. कोणताही प्रसंग येवो, तो निमूटपणे स्वीकार कर.

स्वधर्माचे आचरण केल्यावर तुझ्या हातून पाप कसे घडेल? क्षत्रियाचा धर्म समजून तू युद्ध केल्यामुळे तुझ्या हातून पाप बिलकुल घडणार नाही.

आपल्या मनाप्रमाणे घडले की, नेहमीच सुख होते व मनाविरुद्ध घडले की दुःख होते. पण 'लाभालाभ न धरावे। मनामाजी ।।' याप्रमाणे दोन्हींचा स्वीकार समत्व भावाने कर. मनाची अशी स्थिरता व सारखेपणाचा भाव म्हणजेच योग आहे. म्हणून तू योगी हो.

आपल्या स्वभावास अनुसरून असलेल्या उचित धर्माचे पालन केल्यावर जे सुख वा दुःख होईल ते निवांत मनाने सहन करावे.

अर्जुना, कोणतीही शंका मनात न घेता हे स्वधर्माचे आचरण कर.

**दिनांक ३१ ऑक्टोबर**

**तुम्ही व्रते नियमु[१] न करावे । शरीराते न पीडावे[२] ।**
**दुरी[३] केही न[४] वचावे[४] । तीर्थासी गा ।।३.८९।।**

*शब्दार्थ - १) सकाम व्रते २) ताप देऊ नये ३) लांबवर ४) जाऊ नये*

अर्थ - तुम्हाला आणखी व्रते व नियम करण्याची जरुरी नाही. शरीराला पीडा देण्याची जरुरी नाही व दूर कोठे तीर्थाला जाण्याचे कारण नाही.

## व्रते-नियम, तीर्थयात्रेची गरज नाही

आपला जो स्वधर्म आहे तोच नित्य यज्ञ होय. असे स्वधर्म जर सोडले तर, मात्र पापाचरणाकडे आसक्ती होते. म्हणून स्वधर्माचे आचरण करणे हेच नित्य यज्ञयाजन करण्यासारखे आहे. अशा आचरणांमुळे कर्मबंधनात मनुष्य अडकत नाही.



ॐ

ज्ञानेश्वरांनी वेदकालीन यज्ञयाग, धार्मिक अनुष्ठाने, पूजापाठ व इतर कर्मकांडे यांना पूर्ण फाटा दिला. वारकरी पंथातील भक्तांना त्यांनी साधा, सरळ, सोपा, सुटसुटीत व आचरणास सुलभ असा साधनमार्ग दिला. जटिल अशा यज्ञातील व्रत-वैकल्ये, कठोर नियम, शारीरिक तप इत्यादी गोष्टी सकामतेने लोक शतकानुशतके करत होते. या सर्व गुंतागुंतीच्या, चमत्काराच्या जंजाळातून सामान्य भक्तांना दूर काढले.

हे सर्व काहीही न करता केवळ भगवंतावर निस्सीम, एकनिष्ठ प्रेम करून त्याला प्रसन्न करावे असा सोपा भक्तिमार्ग दाखविला.

योग वगैरे साधने, कामनायुक्त आराधना, अथवा मंत्रतंत्र इत्यादिकांचे अनुष्ठान करण्याची जशी गरज नाही, तशी दूरवर तीर्थयात्रेलासुद्धा जाण्याची गरज नाही, असे अधिकारवाणीने ज्ञानेश्वरांनी सांगितले. एवढेच नव्हे तर स्वधर्म सोडून अन्य देव-देवतांस भजावयाचेही कारण नाही.

हा स्वधर्मरूपी यज्ञ जर कराल तर हा धर्म कामधेनुप्रमाणे इच्छा पुरविणारा होईल, असा दिलासाही त्यांनी दिला.

कर्म कोणते व कसे करावे याचा हा क्रांतिकारक मार्ग ज्ञानेश्वरांनी त्या वेळच्या समाजास दिला. यज्ञ म्हणजेच स्वधर्म असे सांगून धर्मातील परंपरेने आलेल्या अनिष्ट चालींना त्यांनी पूर्ण पायबंद घातला.

ब्रह्मदेवांनी सृष्टी निर्माण केली त्या वेळी यज्ञ उत्पन्न केले हे खरे, पण या यज्ञाचे खरे सूक्ष्म स्वरूप लोकांच्या ध्यानात आले नाही. म्हणून या धर्माच्या साध्यासाठी अथवा मनातील कामना पूर्ण करण्यासाठी वेगवेगळी साधने करण्याची जरुरी नाही. परमात्मा हा आपला पिता, माता असे सर्वस्व असल्यामुळे त्यास प्रेमाने हाक मारावी. जगाच्या माऊलीला 'आई' म्हणून आर्ततेने हाक मारावी. असा प्रेमभक्तीचा सोपा मार्ग ज्ञानेश्वरांनी दिला. हे समजावून सांगताना माऊलींनी व्यवहारातील एक दृष्टान्त दिला आहे. ते म्हणतात -

**अहेतुके चित्ते । अनुष्ठा पांययाते ।**
**पतिव्रता पतीते । जिया परी ।।**

अर्थ - एखादी पतिव्रता स्त्री पतीची जशी निष्काम भावनेने सेवा करते, त्याप्रमाणे कोणताही हेतू मनात न धरता स्वधर्माचे आचरण करावे.

ईश्वराच्या प्राप्तीसाठी माऊलींनी संकीर्तन, नामस्मरण, श्रवण अशी सोपी भक्ती समाजाला दिली. स्वधर्माचे श्रेष्ठत्व पटवून सांगितले.

**दिनांक १ नोव्हेंबर**

**म्हणोनि एके पांडवा[१] । हा स्वधर्मु करणे न[२] संडावा[२] ।**
**सर्वभावे भजावा हाचि एकु ।।३.१४३।।**

*शब्दार्थ - १) अर्जुना २) सोडू नये*

अर्थ - म्हणून अर्जुना, ऐक, आपला हा स्वधर्म कोणीही सोडू नये. कायावाचामने करून ह्या एकाचेच आचरण करावे.

## विहित कर्माचे आचरण हाच स्वधर्म

वैदिक काळात 'यज्ञाला' जे स्थान होते ते नंतरच्या काळात बदलत गेले. ज्ञानेश्वरांनी 'स्वधर्म' म्हणजे विहित कर्म हाच यज्ञ आहे असे प्रतिपादन केले.

मृत शरीरामध्ये जसे चैतन्य वास करीत नाही किंवा दुर्दैव्याच्या घरी लक्ष्मी राहत नाही, तसा स्वधर्मापासून वंचित राहणारा सर्व सुखांना पारखा होतो. हाच भाव खालील ओव्यांमध्ये माऊलींनी व्यक्त केला -

ॐ

**जैसे गतायुशी शरीरी । चैतन्य वासु न करी ।**
**का निदैवाच्या घरी । न राहे लक्ष्मी ।।३.१०९।।**
**तैसा स्वधर्मु जरी लोपला । तरी सर्व सुखांचा थारा मोडला ।**
**जैसा दीपासवे हरपला । प्रकाशु जाय ।।३.११०।।**

**अर्थ** - स्वधर्म जर लोपला तर दिवा विझल्यानंतर जसा प्रकाश नाहीसा होतो तसे सुख नाहीसे होते.

तिसऱ्या अध्यायातील ही यज्ञसंकल्पना म्हणजे ज्ञानेश्वरीचे वैभव आहे. कर्म तरी सतत केले पाहिजे. प्रकृतीच मनुष्याला सतत कर्म करायला लावते. प्रकृतीच्या गुणधर्मानुसार मनुष्याला कर्म करणे भाग आहे. त्यामुळे एक क्षणसुद्धा तो कर्माशिवाय राहत नाही. म्हणून हे कर्मच यज्ञस्वरूप झाले पाहिजे. कर्म जर यज्ञ झाले तरच आपले कल्याण होईल. मग असे कर्म यज्ञ कसे होईल?

पूर्वी राजे-महाराजे, ऋषी-मुनी यज्ञ करून अनेक वस्तूंचे हवन यज्ञात करीत असत. ही आहुती देताना ते म्हणायचे, ''अग्नये स्वाहाः'', ''इन्द्राय स्वाहाः'' ''इदं न मम'', ''प्रजापते स्वाहाः'' - ''हे मी अग्नीला अर्पण करतो,'' ''हे मी इंद्राला अर्पण करतो,'' ''हे माझे नाही,'' ''हे प्रजापतीला मी अर्पण करतो,'' असे याज्ञिकाला म्हणावे लागायचे.

परोपकार करण्यासाठी, अखिल विश्वाच्या कल्याणासाठी जे काही कर्म केले जायचे ते यज्ञस्वरूप समजायचे. ज्या कर्मात निःस्वार्थ भाव आहे व जे सेवास्वरूप आहे ते कर्म यज्ञच होय. अशा कर्मात कोणताही विधी-नियम पाळायची गरज नाही. अन्नसुद्धा भक्षण करायचे असेल तर यज्ञ केल्यानंतर जे शिल्लक राहते त्यावरच आपला खरा अधिकार आहे (अध्याय ३ श्लोक ११,१२). जे स्वतःसाठीच अन्न भक्षण करतात ते पापच ग्रहण करतात. पण इतरांना देय भाग अर्पण करून जे भोग भोगतात ते सर्व पापांपासून मुक्त होतात.

हवनात जे अर्पण करतो ते आपल्याला अनेक पटीने भगवंत परत देत असतो. ''यज्ञौ वै विष्णुः'' असे म्हटले आहे. विष्णू भगवानाचे नाव आहे यज्ञ. या नारायणाला प्रसन्न करण्यासाठी सतत कर्म केले पाहिजे व प्रत्येक कर्म ईश्वरार्पण बुद्धीने करून ते यज्ञस्वरूप केले पाहिजे. यज्ञात अर्पणाला महत्त्व आहे. हे माझे नाही, असे म्हणण्यात त्यातील ममत्व, आसक्ती सोडणे हाच भाव आहे. कर्म करीत असताना जी बुद्धी, शक्ती, मती मिळते ती भगवंतामुळें मिळते, हा भाव जर असेल तर त्यात अहंकाराचा वारा शिरत नाही. कर्तृत्वभाव व भोक्तृत्वभाव गेल्यानंतर केलेले कर्म हे यज्ञच ठरते.

म्हणून स्वधर्मरूपी यज्ञ काया, वाचा, मने करून करावे असे माऊली म्हणते.

**दिनांक २ नोव्हेंबर**

**अगा स्वधर्मु हा आपुला । जरी का कठिणु जाहला ।**
**तरी हाचि अनुष्ठिला[1] । भला[2] देखे ।।३.२१९।।**

*शब्दार्थ - १) आचरण केले २) कल्याणकारक*

**अर्थ** - पाहा, आपला स्वतःचा धर्म आचरण्यास कठीण जरी असला तरी त्याचेच आचरण केलेले चांगले.

## स्वधर्मात मरण आले तरी उत्तम

''..... स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः ।'' या ३५ व्या प्रसिद्ध श्लोकावरील निरूपणात वरील ओवी माऊलींनी सांगितली आहे. स्वधर्माचरण करीत असताना मरण आले तरी चांगले (पण) परधर्म हा भयावह आहे. आपला स्वधर्म आचरावयास कितीही कठीण असला तरी स्वधर्मच चांगला. याहून दुसरा जो परक्याचा आचार



ॐ

दिसावयास चांगला जरी असला तरी आचरण करणाऱ्याने विहित असलेल्या कर्माचेच आचरण करावे हा भगवंताचा आग्रह आहे. माऊलींनी व्यवहारातील दृष्टान्त दिले आहेत. आपली बायको जरी रूपाने वाईट असली तरी तिच्याच बरोबर संसार करावा हे चांगले. त्याप्रमाणे कितीही अडचणींचा प्रसंग आला अथवा आचरावयास त्रास पडला तरी आपला धर्मच परलोकी सुख देणार आहे.

म्हणून दुसऱ्यांना जे विहित पण आपणास जे अयोग्य म्हणून ठरले आहे, ते हिताचा विचार केला तर आचरू नये हेच बरे.

आपल्या धर्माचे आचरण करीत असता जरी प्राण खर्ची पडतील तरीही इहपरलोकाच्या दृष्टीने तो धर्म चांगलाच आहे.

गीतेमध्ये स्वधर्म हा शब्द स्वकर्तव्य या अर्थाने आलेला आहे. आणि हे कर्तव्य सर्व कर्मे ईश्वरार्पण बुद्धीने करून करावीत. आपले स्वकर्तव्य करीत असताना आंतरिक व बाह्य अशा कितीही अडचणी आल्या तरी डगमगू नये. आपली इंद्रिये ही स्वभावतःच बाह्य विषयांकडे ओढा घेणारी आहेत. अशा इंद्रियांचे दमन न करता ती इंद्रिये ईश्वराभिमुख करून, आचरण केले असता विषयात ती रमणार नाहीत.

दुसऱ्याचा धर्म वरवर कितीही चांगला दिसत असला तरी आपण आपल्याच स्वकर्तव्याचे पालन करावे. ज्ञानेशांनी आणखी एक दृष्टान्त दिला आहे. इतर लोकांची उंच उंच व वैभवशाली घरे पाहून आपण आपल्या झोपड्या मोडून टाकाव्यात का? जसे साखर किंवा गूळ कितीही गोड असले तरी मधुमेही रुग्णांना देणे योग्य नव्हे व हितकारकही नव्हे.

म्हणून अर्जुनाने आपल्या स्वधर्मानुसार म्हणजे क्षत्रिय धर्मानुसार प्रथम युद्ध करावे हेच त्याला कल्याणकारक आहे.

**दिनांक ३ नोव्हेंबर**

**हे विहीत कर्म पांडवा । आपुला अनन्य[1] वोलावा[2] ।**
**आणि हेचि परम सेवा । मज सर्वात्मकाची ।।१८.९०६।।**

*शब्दार्थ - १) एकच २) जिव्हाळा*

**अर्थ** - अर्जुना, हे विहित कर्म आपले केवळ एकच जीवन आहे व हे विहित कर्म करणे हीच, मी जो सर्वात्मक, त्या माझी श्रेष्ठ सेवा आहे.

## विहित कर्म करणे हीच सर्वात्मकाची श्रेष्ठ सेवा

''स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः .....'' या अठराव्या अध्यायातील मंगल श्लोकावरील माऊलींचे हे भाष्य आहे. ''आपापल्या कर्मामध्ये पूर्णपणे रत असलेल्या मनुष्याला सिद्धी प्राप्त होते.''

वर्णाश्रमधर्माप्रमाणे जे कर्तव्यकर्म ज्याच्या वाट्याला आले आहे ते त्यालाच शोभते. म्हणून शास्त्र प्रमाण मानून त्याप्रमाणे आपले स्वाभाविक विहित् कर्म पक्के करून घ्यावे. आपल्या वाट्यास आलेले कर्म आपल्या आंतरिक प्रकृतिधर्मानुसार असते.

वाट्याला आलेले व शिवाय शास्त्राने निश्चित केलेले जे आपले विहित कर्म जो निष्ठेने आचरण करतो तो मोक्षाच्या वाटेवर जाण्यासाठी लागणाऱ्या वैराग्याला प्राप्त करतो. हे वैराग्यरूपी दिव्यांजन तो आपल्या बुद्धीत धारण करतो. त्यामुळे त्याला सिद्धीची वाट प्राप्त होते.

आपल्या भाग्यानुसार आलेल्या विहित कर्माबद्दल काहीही किंतु मनात ठेवू नये. दूषण न ठेवता ते आनंदाने व

ॐ

सहज करावे. कारण ज्याला जे उचित कर्म सांगितलेले आहे तेच त्याने करावे, असे ईश्वराचे मनोगत आहे. माऊली म्हणते –

**अगा जया जे विहित । ते ईश्वराचे मनोगत ।**
**म्हणौनि केलिया निभ्रांत । सांपडेचि तो ।।१८.९११।।**

म्हणून ते विहित कर्म केले म्हणजे तो ईश्वर निःसंशय प्राप्त होतो.

कुठल्याही फळाची अपेक्षा न ठेवता मनुष्याने विहित कर्माचे म्हणजे स्वधर्माचे आचरण करावे.

**जे संपत्तिजात आघवे । हे हवनद्रव्य मानावे ।**

जेवढी आपली संपत्ती आहे, ती सगळी या स्वधर्मरूपी यज्ञामध्ये उपयोगी पडणारी सामग्री आहे असे समजावे. भगवंतांनी दिलेली संपत्ती ही 'इदं न मम' म्हणूनच स्वीकारावी. जे जे भोग परमेश्वरकृपेने प्राप्त झाले आहेत ते ते कृतज्ञतेने स्वीकारून, त्यातील काही वाटा पुन्हा भगवंताच्या कामासाठी अर्पण करणे हा खरा सेवाभाव. असे न करणारा हा चोर आहे असे भगवंतांनी स्वतः म्हटले आहे. यासाठी 'स्तेन' म्हणजे चोर असा कठोर शब्द भगवंतांनी वापरला आहे. (अध्याय ३, श्लोक १९)

आभाळात अवेळी येणारे ढग जसे निरुपयोगी असतात, तसाच विहित कर्म न सांभाळणाऱ्या माणसाचा धर्म निष्फळ होतो. जे कोणी कर्माचा कंटाळा करतात किंवा आपल्याला कर्म करावे लागते याची खंत बाळगतात त्यांना पुण्यप्राप्ती कशी होणार? कारण देहधारी मनुष्याला कर्म कधीही टाळता येत नाही.

म्हणून आपल्या वाट्याला आलेले विहित कर्म मनोभावे करणे हीच खरी भगवंताची सेवा आहे, असे ज्ञानेश्वर म्हणतात.

**दिनांक ४ नोव्हेंबर**

**म्हणोनि विहित क्रिया केली । नव्हे तयाची खूण[1] पाळिली ।**
**जयापासूनि का आली । आकारा भूते[2] ।।१८.९१४।।**

*शब्दार्थ - १) आज्ञा २) प्राणिमात्र*

**अर्थ -** म्हणून विहित कर्म केले असता ते कर्म केले असे नाही, तर ज्या ईश्वरापासून हे सर्व प्राणी आकाराला आले आहेत, त्या ईश्वराची आज्ञाच पाळली (असे होय).

## कर्मरूपी फुलांनी केलेल्या पूजेने भगवंत प्रसन्न

वरील ओवी ही ४६ व्या श्लोकावरील निरूपणातून घेतली आहे. ४५ व ४६ या दोन श्लोकांत भक्तियुक्त कर्मयोगाचे स्वरूप व त्याचे फळ भगवंतांनी सांगितले आहे. हे दोन श्लोक कर्मयोगाचा सारभूत सिद्धान्त सांगणारे श्लोक आहेत. या महनीय श्लोकांवर माऊलींचे निरूपणही रसाळ, वेधक, भावपूर्ण झाले आहे. कोणत्याही वर्णाचा कोणीही मनुष्य स्वधर्माचे पालन करून परमेश्वरप्राप्ती करून घेऊ शकतो. वाट्याला आलेले व शिवाय शास्त्राने निश्चित केलेले स्वाभाविक विहित कर्म जो निष्ठेने व प्रीतिपूर्वक करतो तो सिद्धीप्रत जाऊ शकतो, हे भगवंताचे वचन आहे.

४६ व्या श्लोकातील ''स्वकर्मणा तमभ्यर्च्य'' हा मंत्र आहे. कर्मयोगाचे हे सार आहे. भक्तीचा हा कणा आहे. ''ज्याच्यापासून भूतमात्राची उत्पत्ती होते व ज्याने हे सर्व विश्व व्यापले आहे, त्या ईश्वराची आपापल्या कर्माने आराधना (स्वकर्मणा तमभर्च्य) करून सिद्धी प्राप्त करून घेतो,'' असा श्लोकाचा अर्थ आहे.



ॐ

यावर माऊलींचे भाष्य सोपे व सुटसुटीत झाले आहे.

ज्या ईश्वराच्या योगाने हे सर्व जग आतबाहेर पूर्णपणे भरलेले आहे, त्या ईश्वराची आज्ञाच अशी आहे की, प्रत्येकाने आपले विहित कर्म करावे. त्या ईश्वरापासूनच हे प्राणिमात्रांचे सर्व आकार निर्माण झाल्यामुळे त्याची आज्ञा पाळणे हे क्रमप्राप्त आलेच. हे सांगून झाल्यावर ज्ञानेश्वर म्हणतात -

**तया सर्वात्मका ईश्वरा । स्वकर्मकुसुमांची वीरा ।**
**पूजा केली होय अपारा । तोषालागी ।।१८.९१७।।**
**म्हणौनि तिये पूजे । रिझलेनि आत्मराजे ।**
**वैराग्यसिद्धी देईजे । पसाय तया ।।१८.९१८।।**
**जिये वैराग्यदशे । ईश्वराचेनि वेधवशे ।**
**हे सर्वही नावडे । जैसे वांत होय ।।१८.९१९।।**

**अर्थ -** हे वीरा अर्जुना, त्या सर्वात्मक ईश्वराची स्वकर्मरूपी फुलांनी पूजा केली असता, ती पूजा त्याच्या अपार संतोषाला कारणीभूत होते. ।।१८.९१७।।

म्हणून त्या पूजेने संतुष्ट झालेल्या आत्मराजाकडून त्याला वैरागयसिद्धी हा प्रसाद दिला जातो. ।।१८.९१८।।

त्या वैराग्यावस्थेमध्ये ईश्वराचा वेध लागल्याकारणाने हे सर्व (प्रपंच, जग) ओकलेल्या पदार्थाप्रमाणे आवडेनासे होते. ।।१८.९१९।।

या सर्व ओव्यांतून कर्मयोगाचे सारभूत तत्त्वज्ञान माऊलींनी मांडले आहे. प्रथम विहित कर्म ही भगवंताची आज्ञा आहे, हे सांगितले. नंतर त्याची साधना सांगितली. स्वकर्मरूपी फुलांनी पूजा केल्यानंतर तो सर्वात्मक ईश्वर प्रसन्न होतो. ईश्वराचे चिंतन फलरूप होण्यासाठी, ज्या वैराग्याची नितांत आवश्यकता असते ते वैराग्य या आत्मराजाकडून मिळते व असे वैराग्य प्राप्त झाल्यानंतर केवळ आत्मलाभातच त्याचे मन रमते. म्हणून संसाराचे भोग्य विषय त्याला त्याज्य वाटतात. प्रपंच हा ओकलेल्या पदार्थाप्रमाणे किळसवाणा वाटतो. प्रपंचात वैराग्य येते. म्हणजे प्रपंच अलिप्त होऊन क्रीडास्वरूपात पाहण्याची बुद्धी निर्माण होते. केवळ कर्तव्य म्हणूनच तो करायचा. मन, बुद्धी मात्र ईश्वरचरणी ठेवायची.

असे झाले की, परमात्मा त्याला दूर राहतच नाही.

**दिनांक ५ व ६ नोव्हेंबर**

**जे जे काही व्यापार करिसी । का भोग हन भोगिसी ।**
**अथवा यज्ञी यजिसी । नानाविधी ।।९.३९८।।**
**नातरी पात्रविशेषे[1] दाने । का सेवका देसी जीवने[2] ।**
**तपादि साधने । व्रते करिसी ।। ९.३९९ ।।**

*शब्दार्थ - १) सत्पात्री २) वेतन, पगार*

**अर्थ -** हे अर्जुना, तू जे जे काही व्यवहार करशील किंवा शब्दादी विषयांचा भोग घेशील, अथवा अनेक प्रकारच्या यज्ञरूप कर्मांनी हवन करशील. ।।९.३९८।।

तप, व्रते किंवा विशिष्ट योग्यता पाहून जे जे दान देशील. ।।९.३९९।।

## सर्व कर्मे केवळ भगवंताकरिता कर

पहिल्या खंडात यापुढील दोन ओव्या (९.४०१ व ४०२) या घेतलेल्या असल्यामुळे त्याची पुनरुक्ती केली नाही. ३६५ ओव्या या पूर्णपणे स्वतंत्र आहेत.

या एकूण चार ओव्यांतून, माऊलींनी कर्मयोगावरील २७ व्या मंगल श्लोकावर भाष्य केले आहे.

**यत करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।**
**यत् तपस्यसि कौन्तेय तत् कुरुष्व मदर्पणम् ।।२७।।**

**अर्थ -** हे कौन्तेया, तू जे करतोस, जे भागतोस, जे हवन करतोस, जे दान करतोस, जे तप करतोस ते (सर्व) मला अर्पण कर.

या श्लोकाची रचना, शब्दांची योजना अतिशय सोपी असल्यामुळे हा पूर्ण श्लोक उद्धृत केला आहे. अर्थाच्या दृष्टीने मात्र हा श्लोक महान आहे.

थोडक्यात म्हणजे आपल्या हातून घडणारी सर्व कर्मे त्या भगवंताप्रीत्यर्थ करायची. भोग, यज्ञ, दान, तप हे सर्वच त्याच्यासाठी करायचे.

ही सर्व कर्मे भगवंताप्रीत्यर्थ करताना किंवा भगवंताला अर्पण करताना त्याचा साधनामार्ग मात्र ४०० व ४०१ या ओव्यांतून सांगितला. हे सर्वस्वी माऊलींचे विचार आहेत व कर्मयोगातील ते महत्त्वपूर्ण अंग आहे.

**ते क्रियाजात आघवे । जे जैसे निपजेल स्वभावे ।**
**ते भावना करोनि करावे । माझिया मोहरा ।।९.४००।।**
**परि सर्वथा आपुला जीवी । केलियाचि शंका काहीचि नुरवी ।**
**ऐसी धुवोनि कर्मे द्यावी । माझ्या हाती ।।९.४०१।।**

जे जे कर्म, जसे जसे तुझ्या हातून घडेल ते ते कर्म केवळ माझ्याप्रीत्यर्थ आहे अशा समजुतीने कर ही पहिली अट. व दुसरी अट अशी की, अमुक कर्म मी केले अशी कर्तृत्वाची आठवण आपल्या मनामध्ये तू मुळीच ठेवू नकोस. याप्रमाणे सर्व कर्मे शुद्ध करून मला अर्पण कर.

असे केल्यामुळे कर्माची जी शुभाशुभ फलरूप बंधने आहेत त्यापासून तू पूर्णपणे मुक्त होशील. ईश्वराप्रत जाण्याचा हा मार्ग आहे.

आपापले कर्म ईश्वरार्पण बुद्धीने केले तर मोक्षाची प्राप्ती होऊ शकते. अर्जुनाला युद्ध करण्यासाठी प्रवृत्त करताना, भगवंतांनी कर्म कसे करावे याचे रहस्यच येथे सांगितले आहे. अर्जुन हा निमित्तमात्र आहे. अर्जुनाच्या निमित्ताने हे सर्वांनाच सांगितले आहे. या चार ओव्यांतून चार महत्त्वाच्या गोष्टी साधन रूपाने मांडल्या आहेत -

१) सर्व चित्तवृत्ती, भाव भगवंताच्या ठिकाणी ठेवावा.
२) सर्व कर्मे भगवंताला अर्पण करावीत.
३) निराभिमानी व निरहंकारी तसेच निरिच्छ होऊन मी कर्मे करावीत. यात मी-माझे हा अहंकार मात्र नसावा.
४) अशी शुद्ध केलेली कर्मे संपूर्ण श्रद्धेने भगवंताला अर्पण करावीत.

कोणतेही कर्म करीत असताना त्या कर्मांना ज्ञानाचा डोळा, भक्तीचे हृदय व नीतिमत्तेचे अधिष्ठान असावे लागते. तरच अशी शुद्ध झालेली कर्मे भगवंताला आवडतात.

ज्ञानेश्वरांच्या काळात व्रतवैकल्ये, यज्ञयाग म्हणजेच भक्ती अशी परंपरागत भावना दृढ झाली होती. कर्मकांडाचा उच्छाद मांडला होता. सर्वसामान्यांच्या आवाक्याबाहेरच्या या गोष्टी होत्या. पण या सर्वांना छेद देऊन माऊलींनी हा सोपा, सरळ, सुटसुटीत मार्ग सामान्य लोकांना दिला. ज्ञानेश्वरांनी भक्तीचा खरा अर्थ लोकांना दिला.





**दिनांक ७ नोव्हेंबर**

**जे देहाभिमानबंधे । सांडूनि काम्यनिषिद्धे[1] ।**
**विहित परी अप्रमादे । अनुष्ठावे[2] ।।१८.१४३८।।**

*शब्दार्थ - १) काम्य व निषिद्ध कर्मे २) आचरण करावे*

**अर्थ -** कारण की, देहाहंकाररूपी बंधनाने बद्ध झालेल्या जीवांनी, काम्य व निषिद्ध कर्मांचा त्याग करून विहित कर्मांचे आचरण करावे. परंतु त्या विहित कर्माचरणात चुका करू नयेत.

## काम्य व निषिद्ध कर्मांचा त्याग करावा

अठराव्या अध्यायात ६६ व्या श्लोकावर निरूपण करीत असताना माऊलींनी सर्व अध्यायांचा परामर्श घेतला आहे. अज्ञान व अविद्या यामुळे बांधलेल्या जीवास मोक्षपदाची प्राप्ती होण्याकरिता तिसऱ्या अध्यायापासून प्रत्यक्ष साधनांची चर्चा सुरू झाली आहे. याच अध्यायात शुद्ध भावाने कर्मे कशी आचरावीत याचा उपदेश भगवंतांनी केला आहे.

चौथ्या अध्यायापासून अकराव्या अध्यायाच्या शेवटच्या श्लोकापर्यंत कर्माच्या योगाने ईश्वराची उपासना कशी करावी हे भगवंतांनी सांगितले आहे. या आठ अध्यायांत कर्मयोगाच्या उपासनेबद्दल माऊलींनीसुद्धा आपले स्पष्ट विचार मांडले आहेत.

वरील ओवीत माऊलींनी काम्य व निषिद्ध कर्मांचा त्याग करण्यास सांगितले आहे. नीतिमत्तेचे अधिष्ठान असलेली शुद्ध कर्मे भगवंताला आवडतात. भक्ती आणि नीती यांचे सामरस्य झाल्याशिवाय भगवंताजवळ जाणे केवळ अशक्य आहे. अंतःकरण शुद्धी हा परमार्थाचा पाया आहे. भक्ताने स्वतः सदाचरणी होऊन इतरांना मार्ग दाखवावा हे भक्तीत अभिप्रेत आहे. प्रत्यक्ष आचरण झाल्याशिवाय भक्ती फुलत नाही.

ज्ञानेश्वरांच्या काळात नीतिमत्तेचा प्रचंड ऱ्हास झाला होता. भक्तीचे विपरीत दर्शन घडविले जात होते. विवेक, विचार यापेक्षा कर्मकांडावर भर होता. भक्तीचे शुद्ध रूप लोप पावले होते. अशा विकृत भक्तीवर ज्ञानेश्वरांनी कडाडून टीका केली आहे. सात, नऊ व तेरा या अध्यायांत अशा अज्ञानी, विकृत भक्तीचा समाचार त्यांनी कठोर शब्दांत घेतला आहे.

आत्मकेंद्रित होऊन केवळ अधिकाधिक भोगप्राप्तीसाठी कनिष्ठ देवदेवतांचे पूजन केले जायचे. भोगाच्या फलाविषयी आत्यंतिक ओढ, लालसा असल्यामुळे ज्ञानार्जनाकडे पूर्ण दुर्लक्ष होत होते. विषयसुखाच्या अनिवार लालसेमुळे केवळ लौकिक यश, धनप्राप्ती व प्रतिष्ठा यासाठी वरवरचे वैराग्य लोकांना हवे होते. अमर्याद ऐश्वर्य लालसेमुळे भक्ती ही केवळ प्रदर्शनापुरती राहिली होती. विहित कर्माबद्दल उदासीन राहून, आपापली कर्तव्येसुद्धा नीटपणाने पार न पाडता, अव्यवहार्य अशा कर्मांमध्ये ते रस घेत असत.

म्हणून ज्ञानेश्वरांनी आग्रहाने प्रथम कर्म करावयास सांगितले. पण हे कर्म करताना देहात्मकता व त्यामुळे आलेला अहंकार सोडून निषिद्ध कर्मांचा त्याग करावा व विषयसुखांना आवरून, वैराग्य धारण करून, काम्य कर्मांनाही फाटा द्यावा हे सांगितले. विहित कर्मे करतानासुद्धा आचरणामध्ये दोष ठेवू नये. अशी जेव्हा कर्मे होतील तेव्हाच ती भगवंताला अर्पण करावीत. आपल्या वाट्याला आलेले कर्तव्य, अंतःकरणपूर्वक करून, ती शुद्ध झालेली कर्मे भगवंताला अर्पण करणे हीच खरी पूजा आहे. असे आपापले कर्म जेव्हा नीतिधर्माच्या चौकटीत राहून केले जाते तेव्हाच मोक्षाचा मार्ग दिसू लागतो.

म्हणून भगवंतानेसुद्धा ब्रह्मार्पणबुद्धीने कर्म करावयास सांगितले. शरीर, वाचा, मन ह्यांच्याकडून एकनिष्ठतेने जे जे विहित कर्म केले जाईल ते ते कर्म हे एका ईश्वराच्याच उद्देशाने करावे. असे ईश्वरार्पणबुद्धीने केलेले कर्म मोक्षप्राप्तीपर्यंत नेते.

ॐ

दिनांक ८ नोव्हेंबर

**परी तेचि कर्म आचरिजे । तरीच हा[1] योगु पाविजे ।**
**जे कर्मशेष[2] सहजे । योगस्थिति ।।२.२७५।।**

*शब्दार्थ - १) बुद्धियोग २) कर्माचा शेवट, कामोत्तरस्थिती*

**अर्थ** - परंतु तेच सकाम कर्म जेव्हा करावे तेव्हाच (पुढे) ह्या निष्काम कर्मयोगाची प्राप्ती होते. कारण असे करता करता सकाम कर्मांतून कर्तृत्वमद आणि फलास्वाद टाकून राहिलेले जे शेष कर्म ती सहजच योगस्थिती होय.

## निष्काम कर्मयोग हीच खरी योगस्थिती

कर्म करण्यापुरताच आपला अधिकार आहे. फलावर आपला अधिकार आहे, असे कधीच समजू नये. आपण जेव्हा एखादे कर्म करतो तेव्हा त्याच्या फलावर केवळ आपल्या प्रयत्नांचाच प्रभाव असत नाही. इतर अनेक शक्तींचाही त्यावर प्रभाव पडत असतो. म्हणून आपल्याला जसे हवे तसेच फळ मिळेल असे नाही.

म्हणून कर्म करताना मनात लक्ष्यप्राप्तीचे उद्दिष्ट जरूर ठेवावे, त्याच्याविषयी पूर्ण आस्था असावी. पण लोभ किंवा आसक्ती अजिबात ठेवू नये. म्हणजे कर्म करण्याचा आपला हेतू कर्मफलाचा लोभ नव्हे तर त्यात कर्तव्याची भावना असावी. मनाच्या शुद्धीसाठीदेखील हे आवश्यक आहे. कारण की, असे केल्यामुळे 'कर्मबंध' म्हणजे कर्मजनित पाप, पुण्य व आसक्तीचे बंधन मनावर राहत नाही.

याप्रकारे हा निष्काम कर्मयोग मुक्तीचेही साधन बनतो. असे हे कर्म करतेवेळी योगयुक्त राहून मनाची समता ठेवावी. अशी चित्ताची समता हाच योग व योगच म्हणजे कर्मातील कौशल्य होय. म्हणून 'योगः कर्मसु कौशल' असे म्हटले आहे.

फळाची अभिलाषा सोडून कर्मयोगात ठाम राहता आले पाहिजे. यश मिळो अगर अपयश मिळो पण मनोवृत्ती स्थिर ठेवता आली पाहिजे. अशी समबुद्धी ठेवणे म्हणजे योग अशी दुसरी व्याख्या भगवंतानी सांगितली आहे. कोणतेही कर्म होत असताना समचित्त असणे हेच कर्मातील कौशल्य आहे.

हा फलास्वाद जसा काढून टाकायचा तसेच कर्तृत्वभाव सोडून द्यायचा. कोणतेही काम करीत असताना ते 'मी आहे म्हणून घडते', 'माझ्यामुळे हे घडते', 'या कर्माला मीच कारणीभूत आहे' असा जो अहंभाव आहे तो कर्मात नसावा. अज्ञानामुळे व देहात्मकतेमुळे हा अहंकार कातडीसारखा आपल्याला चिकटलेला असतो. 'मी माझे' हा भाव काढून टाकायचा असेल तर 'तू-तुझे' हा समर्पणाचा भाव मनात दृढ करावा. भगवंताकडे सतत प्रार्थना करावी की, "हे भगवंता, मी माझ्या शक्तीने हे काम करत नसून तुझीच शक्ती त्यास कारणीभूत आहे. हे करण्यास मी निमित्तमात्र आहे. माझ्या ह्या कर्माचे फळ तुझेच आहे," असा भाव दृढ करावा म्हणजे मनातील कर्तृत्वमद निघून जातो. असा अहंकार व फलेच्छा निघून गेली की, सकाम कर्म हे निष्काम बनते. अशी स्थिती ही योगस्थिती बनते.

दिनांक ९ नोव्हेंबर

**जंव प्रकृतीचे[1] अधिष्ठान[2] । तंव सांडी[3] मांडी[3] हे अज्ञान ।**
**जे चेष्टा[4] ते गुणाधीन । आपैसी[5] असे ।।३.५३।।**

*शब्दार्थ - १) मायेचे २) आश्रय ३) त्याग व ग्रहण ४) वर्तन ५) आपोआप*

**अर्थ** - जोपर्यंत मायेचे अधिष्ठान आहे, तोपर्यंत मी कर्म टाकीन अथवा करीन हे म्हणणे मूर्खपणाचे आहे, कारण की जेवढे म्हणून कर्म घडणे आहे ते स्वभावतः गुणांच्या अधीन आहे.



ॐ

## कर्म न करता क्षणभरही राहू शकत नाही

जोवर शरीराशी संबंध आहे तोवर कर्माचा त्याग अशक्य आहे. प्रत्येक जण गुणांच्या अधीन असल्याने ते सत्त्व, रज, तम हे गुण प्रत्येकाकडून कर्म करून घेतच असतात.

मनुष्य जो धर्म आचरतो, तो त्याच्या प्रकृतिधर्माच्या अनुसार असतो.

आपल्याकडे अध्यात्म म्हणजे निष्क्रियता, कर्माविषयीची उदासीनता, संन्यस्त व निवृत्तीप्रधान जगणे किंवा शून्यात पाहत राहणे, असा गैरअर्थ अनेक पाश्चात्त्यांनी व आपल्याकडील लोकांनी घेतला आहे. प्रपंचापासून पलायन, स्वकर्तव्यापासून दूर जाणे व केवल जप-तप करणे म्हणजे आध्यात्मिक जीवन जगणे अशा विपरीत कल्पना करून घेतल्यामुळे भारतीय अध्यात्मशास्त्राबद्दल उलटसुलट बोलले जाते.

गीता-ज्ञानेश्वरीची शिकवण आहे, "कर्म कर. ऊठ... फलाशा सोडून कर्म कर", "स्वधर्माचरण कर, ईश्वरार्पण बुद्धीने कर्म कर."

तिसरा अध्याय हा कर्मयोग समजून सांगणारा अध्याय आहे. "कर्मापेक्षा जर ज्ञानच श्रेष्ठ असेल तर मग घोर कर्माच्या (युद्धाच्या) ठिकाणी तू माझी योजना का करीत आहेस?" या अर्जुनाच्या प्रश्नावर या संपूर्ण अध्यायाची मांडणी झाली आहे.

व्यवहारातसुद्धा असेच घडते. जो ज्ञानी आहे त्याने कर्म कशासाठी करायचे? व जो सतत कर्म करत राहतो त्याने ज्ञानप्राप्ती कशासाठी करायची?

ज्ञान व कर्म या दोन्ही मार्गांचा संबंध नीट न लागल्याने आजही या शास्त्रार्थात घोटाळे व विपर्यास निर्माण झाला आहे.

याबाबतीत भगवंतांनी स्पष्ट निवाडा दिला आहे. कर्म व ज्ञान यांच्यातील संबंध व सामंजस्य स्थापन करणे हा गीतेतील पहिल्या पाच अध्यायांचा विशेष उद्देश आहे.

कर्माने मनुष्य कर्मबंधनात अडकतो, पापपुण्याचा धनी होतो. कर्मच जर केले नाही तर असे घडण्याचे कारणच नाही. नैष्कर्म्य राहिले तर कर्माची बाधा होणार नाही.

वरील ओवीत याचे उत्तर माऊलींनी दिले आहे. कोणीही मनुष्य कर्म न करता एक क्षणभरही राहू शकत नाही. माया ही त्रिगुणमयी असल्याने व सर्व प्राणिमात्र मायेच्या अधीन असल्याने प्रत्येक जण आपल्या गुणकर्मानुसार कर्म करीतच राहणार. इंद्रियांचे जोपर्यंत स्वभाव आहेत तोपर्यंत ते कर्मे करीत राहणार. जागृती व स्वप्न हे कधी थांबले आहेत का? जन्म व मरण हे खंडित झालेत का?

त्याप्रमाणे कर्मातील अवस्थेस प्राप्त झालेला पुरुषही शरीराच्या आश्रयाने कर्मेंद्रियांच्या द्वारा, नेहमी कर्मे करीत असतो. कर्म हे परतंत्र असल्यामुळे ते शरीरातील सत्त्व, रज, तम या गुणांनुसार उत्पन्न होत असते. म्हणून मी कर्म करेन अथवा न करेन हा अंतःकरणात अभिमान बाळगणेसुद्धा व्यर्थ आहे.

दिनांक १० नोव्हेंबर

**कर्मफळ ईश्वरी अर्पे । तत्प्रसादे बोधु[1] उद्दीपे[1] ।**
**तेथ रज्जुज्ञाने लोपे । व्याळशंका[2] ।।१८.२२८।।**

*शब्दार्थ - १) ज्ञान प्रकटते २) सर्पभ्रांती*

**अर्थ** - कर्माचे फळ ईश्वराच्या ठिकाणी अर्पण झाले असता त्याच्या प्रसादाने आत्मज्ञान प्रकट होते. त्या वेळी ज्याप्रमाणे दोरीच्या ज्ञानाने सर्पाचा भ्रम नाहीसा होतो.

ॐ

## कर्मफल ईश्वराला अर्पण केल्याने आत्मज्ञान

काहीही केले तरी कर्म टाळता येत नाही म्हणून आपल्या वाट्याला आलेले, शास्त्राने, धर्माने नेमून दिलेले नियत, विहित कर्म करणे हे न करण्यापेक्षा निश्चितच चांगले. कर्मबंधनाच्या भीतीने कर्म करायचे नाही असे ठरविले तर शरीराचे व्यवहारही चालणार नाहीत.

म्हणून कर्माचा पूर्णपणे त्याग करणे देहधाऱ्यास शक्य नाही.

अशा अटळ असणाऱ्या कर्माच्या बंधनातून सुटण्याचा मार्गही भगवंतांनी सांगितला आहे. विहित कर्मे करीत असताना त्यांच्या फलाशेच्या ताब्यात जायचे नाही. उलट ह्या कर्मापासून मिळणारे फळ ईश्वराच्या ठिकाणी अर्पण करायचे. यामुळे ईश्वराच्या प्रसादाचा लाभ होतो. हा ईश्वराचा प्रसाद म्हणजे आत्मज्ञानाची प्राप्ती होय.

ज्या वेळी अशा आत्मज्ञानाचा लाभ होतो त्या वेळी जसे दोरीच्या ज्ञानाने सर्पाचा भ्रम नाहीसा होतो तसे अज्ञानाचा नाश होतोच पण त्याबरोबर कर्माचाही नाश होतो.

जो याप्रमाणे कर्मफलाचा त्याग करतो तोच या जगामध्ये खरा त्यागी असतो. असा कर्माच्या फलाचा त्याग करणारा पुरुष कर्मालाच नैष्कर्म्यस्थितीला पोहोचवतो.

वास्तविक मनुष्याचा अधिकार हा केवळ कर्म करण्यापुरताच आहे याचे स्पष्ट मत भगवंतांनी दुसऱ्या अध्यायात मांडले आहे.

''कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन'' (२.४७) ''तुझा अधिकार फक्त कर्म करण्याचा आहे. कर्मफलाविषयी तू इच्छा धरता कामा नये,'' हे या सुप्रसिद्ध श्लोकात व्यक्त झाले आहे.

निष्कामबुद्धीने कर्म करावे हा गीतेचा संदेश आहे.

**परी कर्मफळी आस न करावी । आणि कुकर्मी संगती न व्हावी ।**
**हे सत्क्रियाचि आचरावी । हेतुविण ।।२.२६६।।**

माऊलींचा हा आग्रह आहे. कर्मफलाच्या ठिकाणी आशा ठेवू नये व निषिद्ध कर्म न करण्याविषयीही प्रवृत्ती होऊ देऊ नकोस. हा सदाचारच निष्काम बुद्धीने आचरावा.

आपले नेमून दिलेले कर्तव्यकर्म निष्ठेने व सचोटीने करावे, पण त्याचे फळ आपल्याला मिळेलच अशी इच्छा बाळगू नये. त्यातूनही हे फळ मिळण्याची इच्छा झालीच तर ते फळ ईश्वराला अर्पण करावे. 'निष्काम कर्म करणे' हे समजायला सोपे पण आचरायला कठीण असे तत्त्वज्ञान आहे. पण त्याचे मर्म समजून घेऊन तसे आचरण करता आले तर आपले पारमार्थिक जीवन कृतार्थ झाले असे म्हणावयास हरकत नाही.

**दिनांक ११ नोव्हेंबर**

**म्हणोनि प्रवृत्ती[1] आणि निवृत्ती[2] । इये वोझी नेघे मती ।**
**अखंड चित्तवृत्ती । आठवी माते ।।१२.१२२।।**

*शब्दार्थ - १) कोणतेही कर्म करण्याची इच्छावृत्ती २) कोणतेही कर्म न करण्याची वृत्ती*

**अर्थ** - म्हणून कोणतेही कर्म करण्याची प्रवृत्ती अथवा न करण्याची निवृत्ती, ही ओझी तू आपल्या बुद्धीवर घेऊ नकोस. तर तू आपल्या चित्तवृत्तीने मला निरंतर स्मर.

## केवळ भगवंतासाठीच कर्म करावे

बाराव्या अध्यायात भगवंतांनी भक्तीचे चार मार्ग सांगितले - १) भगवंताला मन व बुद्धी अर्पण करणे २) मन-



ॐ

बुद्धी देता येत नसेल तर अभ्यास योगाचे अनुष्ठान करावे ३) अभ्यासयोग जमत नसेल तर भगवंतासाठी कर्म करावे ४) अभ्यासयोग जर जमत नसेल तर, स्वकर्मफलाचा त्याग करावा.

यातील तिसरा व चौथा मार्ग हे कर्मयोगाशी संबंधित आहेत.

भगवंताकरिता कर्म केल्यानेदेखील सिद्धी प्राप्त करता येते. ही कर्मे देताना मात्र ती शुद्ध करून दिली पाहिजेत. शिवाय शास्त्राने सांगितलेली कर्मे करून ती अर्पण करावीत व जी कर्मे करू नये म्हणून सांगितली आहेत ती पूर्णपणे वर्ज्य करावीत.

कायावाचामने असे जे कर्म होईल ते कर्म मी करत आहे असे न म्हणता ते ईश्वरीशक्तीनुसार घडते आहे असे मानावे. कारण ज्या परमेश्वराच्या सत्तेने हे विश्व चालले आहे, त्यालाच्च कोणतीही गोष्ट करणे अथवा न करणे हे ठाऊक आहे.

माळी जसे पाण्याला नेईल तेथे काही तक्रार न करता ते जाते, त्या पाण्याप्रमाणे निरभिमान होऊन कर्म करणारे व्हावयास पाहिजेत.

म्हणून कोणतेही कर्म करण्याची प्रवृत्ती अथवा न करण्याची वृत्ती या दोन्हींचाही विचार न करता, आपल्या चित्तवृत्तीने भगवंताचे निरंतर स्मरण करावे. नंतर जे जे कर्म घडेल ते ते कमी अथवा जास्त न म्हणता निवांतपणे ईश्वराच्या चरणी सोपवावे. असा पुरुष यथावकाश सायुज्य मुक्तीच्या अवस्थेपर्यंत पोहोचतो.

ज्ञानेश्वरी सामान्य लोकांना आवडण्याचे महत्त्वाचे कारण म्हणजे, तिने कोणतेच कर्मकांड लोकांच्या मागे लावले नाही. यज्ञयाग, व्रतवैकल्ये, तीर्थयात्रा, दानधर्म, सकाम भक्ती इत्यादींना दूर सारून ईश्वराच्या प्राप्तीचा सर्वांत सुलभ मार्ग ज्ञानेश्वरांनी दाखविला आहे.

इंद्रियांचा निग्रह, वासनात्याग यांचीही जरुरी नाही.

**आणि जे जे कर्म निपजे । ते थोडे बहुत म्हणिजे ।**
**निवांतचि अर्पिजे । माझा ठायी ।।१२.१२३।।**

**अर्थ** - जे जे कर्म घडते, ते थोडेबहुत न म्हणता भगवंताला निवांतपणे अर्पण करावे.

हे कर्म करणे योग्य आहे, हे कर्म करू नये अशी द्विधा मनःस्थिती करून घेऊ नये. सर्वच कर्मे भगवंताला अर्पण करावीत.

**दिनांक १२ नोव्हेंबर**

**अर्जुना हा फलत्यागु । आवडे[1] कीर असलगु[1] ।**
**परि योगामाजी योगु । धुरेचा[2] हा ।।१२.१३४।।**

*शब्दार्थ - १) निश्चयेकरून सोपा वाटतो २) श्रेष्ठ*

**अर्थ** - अर्जुना, हा फलत्याग सोपा वाटतो खरा पण सर्व योगांमध्ये हा योग श्रेष्ठ आहे.

## फलत्याग सर्व योगांमध्ये श्रेष्ठ

मन-बुद्धी भगवंताला अर्पण करणे शक्य नसेल तर अभ्यासयोगाने माझ्याकडे ये व हेही जमत नसेल तर माझ्यासाठी कर्मे कर असे पहिल्या तीन मार्गांत सांगितले व या तिन्ही गोष्टी जमत नसतील तर फलत्यागाचा मार्ग स्वीकार.

हा मार्ग दिसायला सोपा वाटतो पण आचरण करायला मात्र हा कठीण आहे.

ॐ

आरंभिलेल्या कर्मापासून मिळणारे फळ त्या कर्माच्या शेवटी परमात्म्यास समर्पण करणे म्हणजे त्या परमात्म्यास कर्माच्या शेवटी जोडण्यासारखे आहे. असे झाले की, खडकावर पडलेला पाऊस अथवा अग्नीत पेरलेले बी हे जसे व्यर्थ असते त्याप्रमाणे सर्व कर्मे व्यर्थ मान, असे माऊली सांगते. यासाठी व्यवहारातला दृष्टान्त दिला आहे. आपल्या मुलीविषयी बाप जसा निष्काम असतो तसा सर्व कर्मांच्या फलाविषयी तू निष्काम हो. म्हणजे जणू काही ती कर्मे तुझ्या हातून घडलीच नाहीत अशी तुझी मनोवृत्ती होऊ दे. म्हणजे जशा अग्नीच्या ज्वाळा आकाशात गेल्या की, व्यर्थ होतात तशी तुझी सर्व कर्मे शून्यामध्ये जिरू देत.

फलत्याग दिसायला मात्र सोपा वाटतो पण अंतःकरणातून फलाची अपेक्षा न करणे हे कठीण आहे.

जसे वेळूचे झाड एक वेळ व्याले म्हणजे पुन्हा वीत नाही, त्याप्रमाणे या फलत्यागाने जे जे कर्म टाकले जाते त्या कर्मास पुन्हा पालवी फुटत नाही. म्हणजे ते कर्म पुन्हा सुखदुःखाचा भोग देण्याकरिता पुढे जन्माला कारणीभूत होत नाहीत.

फलत्यागातून शांती प्राप्त होते, पण त्याची क्रिया सुरुवातीपासून या क्रमाने झाली पाहिजे.

स्वधर्म पाळण्यासाठी अशा निष्काम बुद्धीने केलेले कर्म हे तीर्थासारखे पवित्र आहे.

**तैसे निष्ठा केले कर्म । सांडूनि रजतम ।**
**सत्त्वशुद्धीचे धाम । डोळां दावी ।।१८.१५७।।**

**अर्थ** - त्याप्रमाणे निष्ठेने झालेले कर्म अंतःकरणात रजोगुण, तमोगुण नाहीसे करून अंतःकरणावर शुद्ध सात्त्विक गुणाचे घर स्पष्ट दाखविते.

तीर्थे शरीराच्या ठिकाणी असलेले बाह्य पापरूप मल नाहीसे करतात, पण कर्मे अंतःकरणातील मल नाहीसे करून चित्त शुद्ध करतात. म्हणून कर्मे हीच शुद्ध तीर्थे आहेत.

यज्ञदानतपादि कर्मे जेव्हा अशी यथायोग्य वारंवार केली जातात तेव्हा रज, तम असे गुण झाडून नाहीसे होतात. अशी शुद्ध झालेली कर्मे करून त्याची फळे भगवंताला अर्पण करावीत. निष्काम बुद्धीने केलेल्या शुद्ध कर्मांनीच भगवंत प्रसन्न होतो.

भगवंताला जे फळ अर्पण करायचे तेही शुद्ध भावनेनेच.

**दिनांक १३ नोव्हेंबर**

**तू योगयुक्त होऊनी । फळाचा संग[1] सांडूनी ।**
**मग अर्जुना चित्त देऊनी । करी कर्मे ।।२.२६७।।**

*शब्दार्थ - १) आसक्ती*

**अर्थ** - अर्जुना, तू निष्काम कर्मयोगाने युक्त होऊन कर्मफलाचा अभिलाष टाकून मग मन लावून विहित कर्मे करावीस.

## कर्मफलाची आसक्ती नसावी

''योगस्थः कुरु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा...'' या दुसऱ्या अध्यायातील ४८ व्या श्लोकावर हे भाष्य आहे. ''अर्जुना, योगयुक्त होऊन, फलाचा अभिलाष टाकून, पूर्ण व अपूर्ण कर्माविषयी मनाचा समतोलपणा ठेवून तू कर्म कर. असा जो मनाचा समतोलपणा त्यालाच योग म्हणतात. ।।२.४८।।

१) निष्काम कर्मयोगाने युक्त होणे



ॐ

२) फलाची इच्छा न धरणे
३) मन देऊन विहित कर्मे करावीत
४) पूर्ण-अपूर्ण, यशस्वी-अयशस्वी कर्माविषयी साम्यबुद्धी ठेवावी

अशा चार टप्प्यांत योगयुक्ताची व्याख्या भगवंतांनी केली आहे.

वरील एका ओवीत माऊलींनी हे सार सांगितले आहे. निष्काम कर्मयोगाची स्थिती त्यांनी वर्णन केली आहे. ''देखे संतासंती कर्मी । हे जे सरिसेपण मनोधर्मी । तेचि योगस्थिती उत्तमी । प्रशंसिजे ।।'' (२.२७२). ''हे पाहा, पूर्ण आणि अपूर्ण कर्माविषयी हा जो मनाचा समतोलपणा आहे, तीच खरी योगस्थिती! हाच खरा निष्काम कर्मयोग! ज्ञानी पुरुष याचीच प्रशंसा करतात.

दैवाच्या अनुकूलतेने हातात घेतलेले एखादे काम यथासांग पार पडले तरी त्यात विशेष संतोष मानू नये व काही कारणाने एखादे काम सिद्धीस गेले नाही तरीही त्याचे दुःख मानू नये. कारण सर्वच कर्मे जर परमात्म्याला अर्पण करायची असतील तर ती पूर्णच झाली असे समजावे. म्हणून या दोन्हीही स्थितीमध्ये मनाचा समतोलपणा ठेवावा. वेदातील कर्मकांड स्वर्गसुख मिळवून देणारे आहे असे श्रीकृष्ण अर्जुनाला म्हणतात. पण ज्ञानेश्वर यावर भाष्य करताना म्हणतात की, वेदातील रजतमात्मक भाग सुखदुःख प्राप्ती करून देणारा असल्याकारणाने अर्जुनाने तिकडे लक्ष देऊ नये. तीनही गुणांचा त्याने अव्हेर करावा. वेदांनी विविध मार्ग सांगितलेले असले तरी आपल्या प्रकृतिधर्मानुसार आपणास जो योग्य वाटेल तोच त्याने स्वीकारावा. माऊलींनी येथे उत्तम दृष्टान्त दिला आहे. सकाळी सूर्योदय झाला की, अनेक रस्ते दिसतात. सर्वच रस्त्यांनी कोणी एकाच वेळी चालत नाही. एखादाच रस्ता स्वीकारावा लागतो. त्याप्रमाणे आपला मार्ग आपण निवडावा.

म्हणून स्वधर्मरूपी युद्ध करणे हे क्रमप्राप्त आहे. विहित कर्म न सोडता, फलप्राप्तीची अभिलाषा न धरता व यश, अपयश याचा विचार न करता, अर्जुना, तू कर्मयोग युक्त हो व अशा कर्माचे आचरण चित्त लावून कर.

निरपेक्ष, अनासक्त, निष्काम कर्मयोग हा गीतेचा - ज्ञानेश्वरीचा आत्मा आहे.

**दिनांक १४ व १५ नोव्हेंबर**

**म्हणऊनि तू नियतु[1] । सकळ कामरहितु ।**
**होऊनिया उचितु[2] । स्वधर्म रहाटे[3] ।।३.१५०।।**
**जे स्वकर्मे निष्कामता । अनुसरले[4] पार्था ।**
**कैवल्य पर तत्त्वता । पातले[5] जगी ।।३.१५१।।**

*शब्दार्थ - १) सदोदित, नियमाने २) योग्य ३) वागणे ४) आचरण करतात ५) पोचतात*

**अर्थ** - म्हणून तू सर्व आसक्ती टाकून देऊन निरंतर उचित जो स्वधर्म त्याप्रमाणे वाग. ।।३.१५०।।

अर्जुना, जे निष्काम बुद्धीने स्वधर्माचे आचरण करतात, ते या जगामध्ये तत्त्वतः श्रेष्ठ अशा मोक्षाला पोचतात. ।।३.१५१।।

## अनासक्त श्रेष्ठ पदाला पोहोचतो

''तस्मादसक्तः सततं कार्यं कर्म समाचर......'' या तिसऱ्या अध्यायातील महत्त्वपूर्ण श्लोकावरील भाष्य वरील केवळ दोन ओव्यांत माऊलींनी केले आहे. म्हणून सर्वदा अनासक्त होऊन कर्तव्य असे कर्म करीत राहा. कारण अनासक्त होऊन कर्म आचरण करणारा पुरुष मोक्षपद मिळवतो.'' ।।३.१९।।

'तस्मादसक्तः सततं कार्य कर्म समाचर' - हा खरा कर्मयोगाचा मंत्र आहे. संपूर्ण आसक्ती काढून सतत कर्म करीत राहणे ही ईश्वराला आवडणारी भक्ती आहे.

संसारात आसक्ती ठेवली की दुःख आलेच. त्यापाठोपाठ बंधनही. पण समजून-उमजून जाणीवपूर्वक उपेक्षा ठेवली, की अनासक्ती येते. सुखदुःखात मनाचा समतोल ठेवण्यासाठी ही अनासक्ती उपयोगी पडते. जसे रस्त्याने जाताना पडलेला कचरा पाहून त्याच्याकडे मनुष्य उपेक्षेने पाहतो, त्यामुळे तो कचरा स्मरणातही राहत नाही. पण आसक्ती ठेवून पाहिलेली एखादी वस्तू केवळ मोहच पाडत नाही तर ती पुनःपुन्हा स्मरणात येते व दुःखाला कारणीभूत होते. एखाद्याने केलेला अपमान, उच्चारलेले अपशब्द, केलेली निंदा पुनःपुन्हा स्मरणात येऊन चित्तात द्वेष-मत्सर, राग-लोभ हे विकार निर्माण करते. हा सारा प्रपंचच आसक्तीचा आहे. हा प्रपंच मनातही आहे व मनाबाहेरही. एकवेळ बाहेरचा प्रपंच संपेल पण अंतःकरणातला प्रपंच संपल्याशिवाय परमार्थात गती प्राप्त होत नाही. एकांतात गेले तरी हा प्रपंच सतावतच राहतो. वर्षानुवर्षे त्या स्मृती, वृत्ती, संस्कार, विक्षेप, गाठी ह्या सतत सतावतच राहतात. त्यातून सुटका करून घ्यायची असेल तर हा अनासक्ती योग आचरणात आणला पाहिजे. प्रपंच हा केलाच पाहिजे. प्रपंच नीटनेटका करावा हे सर्वच संतांनी सांगितले आहे. पण तो करत असताना या कर्मयोगाचे यथासांग ज्ञान झाले पाहिजे. प्रपंचातील कर्तव्ये प्रामाणिकपणे जरूर करावीत पण त्यात आसक्ती ठेवू नये. आपल्या भोवतीच्या माणसांवर स्नेह, जिव्हाळा जरूर असावा पण त्यात निरपेक्ष भाव मात्र ठेवावा. खरे प्रेम भगवंतावर ठेवावे व प्रपंचातल्या साऱ्या गोष्टी कर्तव्यभावनेने कराव्यात. बाहेरून प्रवृत्ती व आतून निवृत्ती धारण केल्याशिवाय प्रपंच सुखाचा होत नाही. हा अनासक्तीयोग आचरणात आला की, प्रपंचाचा परमार्थ होतो व परमार्थाचा प्रपंच होतो. कर्म सतत करावे पण ते करीत असताना मी-माझे हा भाव मात्र ठेवू नये. आपली सर्व सुखदुःखे यातच गुंतलेली असतात. सकाळी जाग आल्यानंतर सर्वप्रथम या 'मी'ने सुरुवात होते. मी, माझा देह, माझे कुटुंब, माझी संपत्ती, माझे सुख, माझी कीर्ती... अशा ममत्वाच्या व आसक्तीच्या गोष्टीमध्ये आपण पुरते अडकलेले असतो व हीच आसक्ती मनुष्याला सुखदुःखाच्या हिंदोळ्यावर बसवते. आशा-निराशा, तृप्ती-अतृप्ती यांच्या लाटा सतत आदळत असताना आणि आपली जीवननौका या भावभावनांच्या झंझावातात हेलकावे खात पुढे पुढे जात असताना जीवन केव्हा सरते हेही उमगत नाही.

ज्या ज्या गोष्टींना आसक्तीने 'माझे-माझे' म्हणून कवटाळलेले असते अशी कोणतीही गोष्ट देह सोडताना आपल्याबरोबर येत नाही. ज्या देहाबद्दल अपरंपार आसक्ती ठेवून त्याचे सर्व लाड, चोचले पुरविलेले असतात, तो देहसुद्धा नाशवंत आहे व क्षणाक्षणाला मृत्यूच्या द्वारापर्यंत चाललेला आहे हे सुद्धा आसक्तीने, अंध झाल्यामुळे समजत नाही. कौमार्य, यौवन, जरा, मृत्यू अशा अवस्थांमध्ये स्थित्यंतर होत असताना या देहाबद्दल आपण कोणतीही इच्छा करू शकत नाही. केवळ द्रष्टा, साक्षी या नात्यानेच त्याकडे पाहावे लागते. तरीसुद्धा या देहाबद्दलची आसक्ती सुटत नाही.

जसा देह तशा प्रपंचातल्या सर्वच वस्तूंबाबत हे म्हणता येईल. संसारात निरपेक्ष भाव नसल्यामुळे ''जन हे सुखाचे । दिल्या घेतल्याचे । अंतःकाळीचे नाही कोणी ।।'' अशाच भावाने सर्वजण व्यवहार करीत असतात.

म्हणून ज्याला आत्म्याचे अविनाशित्व व क्षणभंगुर, नाशवंत देहाचे 'अनित्यत्व' समजले तो या आसक्तीपासून दूर राहतो, 'मी-माझे' यात गुंतत नाही.

महात्मा गांधींना इतर चारही योगांपेक्षा हा 'अनासक्त योग' सर्वांत श्रेष्ठ वाटला. महात्मा गांधींनी तो आचरूनही दाखविला.

'कर्म करा' हाच गीतेचा संदेश आहे. ज्ञानेश्वरांनी हाच विचार अधिक व्यापकपणे सांगितला. कर्म उत्तम कसे करावे व कर्मबंधनातून युक्तीने कसे बाहेर पडावे, याचा परिपाठ माऊलींनी ज्ञानेश्वरीत सांगितला.





फलपेक्षा न करता कर्म करावे हा गीतेचा संदेश आहे. या निरपेक्षवृत्तीत ही अनासक्ती अनुस्यूत आहे. अनासक्ती व निष्कामता ह्या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत.

वरील दोन ओव्यांत माऊलींनी कर्मयोगाचे सार सांगितले आहे.

१) अनासक्ती
२) सतत कर्म करीत राहणे
३) निष्काम बुद्धीने कर्म करणे
४) स्वधर्माचे आचरण करणे.

कर्मयोगाचे हे चार महत्त्वाचे स्तंभ आहेत. या सर्वांचे आचरण जो मन-बुद्धी अर्पण करून करतो, तो परमपदाला पोहोचतो. अशा प्रकारचे शुद्ध कर्म करून त्याला मोक्षाची प्राप्ती होऊ शकते हे भगवंताचे आश्वासन आहे.

**दिनांक १६ नोव्हेंबर**

**देख पांजनकादिक । कर्मजात अशेख[१] ।**
**न सांडिता मोक्षसुख । पावते[२] जाहले ।।३.१५२।।**

*शब्दार्थ - १) संपूर्ण २) प्राप्त झाले*

**अर्थ** - पाहा, कर्माच्याच योगाने जनकादिकांना कर्ममात्राचा मुळीच त्याग न करता मोक्षाचे सुख प्राप्त झाले.

## ज्ञानी पुरुषाने कर्मत्याग करू नये

अनासक्त बुद्धीने कर्मयोग आचरीत असता, ज्यांना सिद्धी प्राप्त होते अशा सिद्ध पुरुषांनी त्यानंतरसुद्धा कर्माचा त्याग केव्हाही करू नये. कर्माच्या ठिकाणी, सर्व परिस्थितीत आस्था असावी. मग मिळवायचे ते ज्यांनी मिळवले व म्हणून निरिच्छ झाले, त्यांनादेखील लोकांना वळण लावण्याकरिता कर्म करणे प्राप्त आहे.

रस्त्याने आंधळ्याच्या बरोबर पुढे चालणारा डोळस मनुष्य आंधळ्यास सांभाळून घेऊन, त्याच्याबरोबर चालतो, त्याप्रमाणे अज्ञानी पुरुषाला ज्ञानी पुरुषाने आपण आचरण करून धर्म स्पष्ट करून दाखवावा.

श्रेष्ठ पुरुष ज्या मार्गाने गेले तोच मार्ग सामान्य माणसे स्वीकारीत असतात. त्यालाच लोक धर्म मानतात.

**एथ वडील जे जे करिती । तया नाम धर्मु ठेविती ।**
**तेचि येर अनुष्ठिती । सामान्य सकळ ।।३.१५८।।**
**हे ऐसे स्वभावे । म्हणोनि कर्म न सांडावे ।**
**विशेषे आचरावे । लागे संती ।।३.१५९।।**

अशी स्थिती असल्यामुळे ज्ञानी माणसाने आपले कर्म सोडू नये.

जनक राजाने उत्तम राज्य केले. आपल्या आचरणाने आदर्श राजा कसा असावा याचे उत्तम उदाहरण घालून दिले. बाहेरून प्रवृत्ती पण आतून वैराग्यपूर्ण निवृत्ती अशी त्यांची वृत्ती होती. अष्टावक्र ऋषींनी आपले आध्यात्मिक धन जनकांना दिले. जनकांनी जे प्राप्तव्य ते प्राप्त केले पण कर्म सोडले नाही.

म्हणून लोकसंग्रहाकडे दृष्टी ठेवूनही हे कर्म केले पाहिजे. ज्ञानी महात्म्यांनी हे विशेषे करून केले पाहिजे.

असा श्रेष्ठ पुरुषांनी आचरावयाच्या कर्मासंबंधी ज्ञानेश्वरांचा विशेष उल्लेख आहे. भगवंतांनीसुद्धा अवताररूपामध्ये असेच विशेष कर्माचरण करून लोकांसमोर आदर्श ठेवला आहे. वास्तविक भगवंताला कर्तव्य असे काहीच राहिलेले नसताना देखील, केवळ समाजपुरुषाच्या प्रबोधनासाठी व आदर्श घालून देण्यासाठी त्यांना कर्म करावे लागले.

भगवंताने कर्माच्या ठिकाणी आळस करून हे केले नसते तर लोकांनीही हाच कित्ता गिरविला असता.

कर्माच्या ठिकाणी आसक्त झालेल्या अडाणी लोकांच्या बुद्धीचा ज्ञानी पुरुषाने भेद करू नये. ज्ञानी पुरुषाने स्वतः अनासक्त बुद्धीने राहून कर्म करावे. सर्व संतांनी हेच कार्य केले. संत तुकाराम, रामदास, एकनाथ, नामदेव या सर्व महात्म्यांनी सर्व काही प्राप्त करूनसुद्धा लोकांना स्वकर्माचरणाने आदर्श घालून दिला.

**दिनांक १७ नोव्हेंबर**

**तैसी शुभाशुभ कर्मे । जिये निफजती[1] प्रकृतिधर्मे[2] ।**
**तिये मूर्ख मतिभ्रमे[3] । मी कर्ता म्हणे ।।३.१७८।।**

*शब्दार्थ - १) उत्पन्न होतात २) प्रकृतीच्या गुणानुरूप ३) मोहित होऊन*

**अर्थ** - तसे प्रकृतीच्या गुणाने जी बरीवाईट कर्मे होतात, ती अज्ञानी मनुष्य बुद्धिभ्रंशामुळे ''मी करतो'' असे म्हणतात.

## सर्व कर्मे प्रकृतीच्या गुणानुरूप होतात

वरील ओवीत ज्ञानेश्वरांनी कर्मयोगाचे रहस्य सांगितले आहे. तिसऱ्या अध्यायाच्या २७ व्या श्लोकावरील हे भाष्य आहे. ''प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः'' या प्रथम भागात भगवंत म्हणतात की, प्रकृतीच्या गुणांनी सर्व कर्मे केली जातात. तरीसुद्धा ''अहंकारविमूढात्मा कर्ताहमिती मन्यते'' असे ते दुसऱ्या भागात म्हणतात. ''अहंकाराने मोहित झालेला मूर्ख मनुष्य या कर्माचा 'मीच कर्ता' आहे असे मानतो.

संपूर्ण कर्मयोग दोन पायांवर उभा आहे. एक अनासक्ती व दुसरा अहंकारमुक्ती. परमार्थ मार्गामध्ये असणाऱ्या साधकाच्या अंगी हे दोन गुण नसतील तर त्याची सर्व साधना व्यर्थ आहे असेच म्हणावे लागेल.

माऊलींनी तर अशा साधकास इशारा दिला आहे की, चित्तात अहंता जर असेल तर एक कोटी वेळा जन्म घेऊनही भगवंताची प्राप्ती होणार नाही.

**तैसा चित्ती अहंते ठावो । आणि जिभे सकळशास्त्राचा सरावो ।**
**ऐसेनि कोडी एक जन्म जावो । परी न पविजे माते ।।१५.३९४।।**

मग असा पुरुष कितीही शास्त्रपारंगत असो, जिभेवर सर्व शास्त्रे नाचत असली तरीही त्याला सिद्धी प्राप्त होणार नाही.

अहंकारामुळे ज्याचे मन मोहित झाले आहे असा पुरुष, कर्माचा मीच कर्ता आहे असे मानतो. त्रिगुणमयी मायेच्या सत्तेचे ज्याला ज्ञान असते, असा पुरुष गुण व कर्म यांचे एकतत्त्व जाणतो व तो हा सर्व गुणांचा आपसात खेळ चालला आहे असे समजून आसक्त होत नाही.

पण मूर्ख माणसाला मात्र हे न कळल्यामुळे, ही सर्व शुभाशुभ कर्मे, आपल्याच कर्तृत्वाने, शक्तीने घडत आहेत. असा अहंकार निर्माण होतो.

सूर्याच्या प्रकाशात प्राणिमात्रांचे सर्व व्यवहार होत असतात पण सूर्य जसा लिप्त होत नाही तसे साधकाने कमलपत्राप्रमाणे निरहंकारी होऊन कर्मे केली पाहिजेत. घरातील दिव्याच्या प्रकाशात सर्व कामे होत असतात पण दिवा त्यापासून पूर्ण अलिप्त असतो. ती कर्मे आपल्यामुळे घडत आहेत असे तो समजत नाही.

मनुष्य जितका निःस्वार्थ, निस्पृह, निरभिमानी, अनासक्त होईल तितका तो निरहंकारी व्हायला लागतो, त्याचा 'मी व माझे' हा बोध कमी व्हायला लागतो. मनुष्याच्या हातून प्रकृती कर्मे घडवून आणत असते.





**दिनांक १८ व १९ नोव्हेंबर**

**ऐसी गुणत्रयभिन्ना । कर्माची गा अर्जुना ।**
**हे केली विवंचना[1] । उपपत्तीसी ।।१८.६२७।।**
**आता ययाची कर्म भजता । कर्माभिमानीया कर्ता ।**
**तो जीवुही त्रिविधता[2] । पातला असे ।।१८.६२८।।**

*शब्दार्थ - १) विवरण २) तीन प्रकारचे*

**अर्थ** - अर्जुना, तीन भिन्न गुणांमुळे तीन भिन्न प्रकारच्या झालेल्या कर्माचे असे हे उपपत्तीसहित विवेचन केले. ।।१८.६२७।।

आता याच कर्माचे आचरण करीत असताना कर्माभिमानी कर्ता जो जीव तोदेखील तीन प्रकारचा झाला आहे. ।।१८.६२८।।

## त्रिगुणाप्रमाणे तीन प्रकारच्या कर्मांचे कर्तेही तीन प्रकारचे

सत्त्व, रज, तम या त्रिगुणांप्रमाणे कर्मही तीन प्रकारचे होते. सात्त्विक, राजस व तामस अशा तीन प्रकारची कर्मे घडली जातात व असे कर्म करणारे कर्तेसुद्धा तीन प्रकारचे असतात.

एकाच घरातील तीन सख्खे भाऊ तीन प्रकारचे असतात. त्यांचे स्वभाव हे त्यांच्या तीन प्रकारच्या स्वभावधर्मानुसार वेगवेगळे असतात. एकाच आईच्या पोटी जन्म घेतलेले तीन भाऊ, तीन गुणांनी युक्त होते. याचे उत्तम उदाहरण म्हणजे रावण, बिभीषण व कुंभकर्ण. रावण राजसी, बिभीषण सात्त्विक व कुंभकर्ण तामसी होता. प्रत्येक गुणाची वैशिष्ट्ये आहेत. त्या त्या गुणांकडून तीच ती ठरावीक कर्मे होणार.

आसक्तीरहित, प्रीती अथवा द्वेष यांनी वर्जित असे फलाकांक्षा न धरणाऱ्या मनुष्याने केलेले जे विहित कर्म, त्याला सात्त्विक कर्म असे म्हणतात. सोन्याला ज्याप्रमाणे सुगंध प्राप्त व्हावा त्याप्रमाणे नित्य कर्माला नैमित्तिक कर्माची जोड मिळाली असता, त्या नित्य कर्माला शोभा प्राप्त होते. अशी हातून झालेली शुभ-अशुभ सर्व कर्मे जो भगवंताच्या चरणी अर्पण करतो तो कर्ता सात्त्विक होय. काम्य कर्मे किंवा निषिद्ध कर्मे सात्त्विक असू शकत नाहीत. ज्या कर्मामध्ये कर्त्याची आसक्ती व द्वेष या दोन्हीही भावना नसतात, असे कर्म केवळ लोकहितासाठी केले जाते. असे आसक्तीविरहित निष्काम भावनेने केलेले कर्म सात्त्विक कर्मात मोडते. सत्त्वगुणामुळे व सात्त्विक कर्मामुळे ज्ञान उत्पन्न होते. म्हणून परमात्म्याचे तत्त्व जाणू इच्छिणाऱ्या मुमुक्षुंनी सात्त्विक कर्माचे आचरण केले पाहिजे.

राजस-तामस कर्मांमध्ये मनुष्याचा अहंकार, कर्तृत्वाभिमान, आसक्ती असल्यामुळे सतत भोगांची इच्छा असते. 'आज हे मी मिळविले, उद्या मी ते मिळविणार' अशी सतत ऊर्मी असते. असा देहाभिमान सतत स्फुरत असल्यामुळे या राजस कर्माचे फळही कधी सुख, तर कधी दुःख असे होते.

राजस वृत्तीची माणसे थोडा तरी विचार करतील पण तामस व्यक्ती, विवेकशून्य होऊन अविचाराने, स्वार्थाने कोणत्याही प्रतीचे काम करावयास मागेपुढे पाहत नाहीत. त्यामुळे अशा कामातून आपल्या वाट्याला अपमान, दुष्कीर्ती, निंदा, तिरस्कार येऊ शकतो, याची तमा ते बाळगीत नाहीत. शास्त्रविहित कर्मे न करता चुका करीत, स्वार्थाने, मोह व अज्ञानाने भरलेली कामे करून, अनर्थ ओढवून घेण्यापलीकडे त्यांच्या हाती काही मिळत नाही. त्यांचे सुखही तामसी व दुःखही तामसी. अशी माणसे अहंकारापोटी स्वतःचा व दुसऱ्याचाही नाश ओढवून घेतात. जसे रावणाचे झाले.

म्हणून भावी परिणाम, नाश, इतरांना पीडा, आपले कर्म करण्याचे सामर्थ्य याकडे लक्ष न देता अविचाराने जे कर्म केले जाते त्याला तामस कर्म असे म्हणतात. दुसऱ्याच्या दुःखात सुख मानून दुसऱ्याला पीडा देणारे या वर्गात मोडतात.

परमात्म्याची मायाशक्ती, प्रकृती ही त्रिगुणात्मक आहे. प्रकृतीपासून उत्पन्न झालेल्या सत्त्व, रज, तम या तीन गुणांच्या वैशिष्ट्यानुसार तीन वेगवेगळे स्वभावभेद झाल्यामुळे त्या त्या व्यक्तीकडून वरीलप्रमाणे भिन्न भिन्न कर्मे निर्माण होतात. हे तिन्ही गुण कमी-अधिक प्रमाणात प्रत्येक पुरुषात असतात. कोणीही मनुष्य, या साऱ्या पृथ्वीतलावर असा मिळणार नाही की, ज्याच्यात हे तिन्ही गुण उपलब्ध नाहीत. ज्या गुणाचे प्राबल्य असेल त्याप्रमाणे तो सात्त्विक अथवा राजसिक वा तामसिक बनेल व तसे वर्तन त्याच्याकडून घडेल.

स्वयंपूर्ण आत्म्याला हे गुणच देहात बांधून टाकतात. मनुष्यात जे सतत बदल घडत असतात त्याला कारण हे त्रिगुण! पुण्यकर्माचे फल निर्मल व सात्त्विक, पण राजस कर्माचे फल दुःख आणि तामस कर्माचे फळ दुःखाबरोबर अज्ञान होय. जसे कर्म तशी त्याची आंतरिक प्रकृती असते. जगात अनेक जणांकडून वेगवेगळी अनंत कर्मे होतात, त्यापाठीमागे हे गुणच कारणीभूत असतात.

म्हणून शुद्ध सात्त्विक कर्म घडून, भगवंताची सेवा होण्यासाठी, इतर दोन गुणांचा प्रभाव कमी केला पाहिजे.

**दिनांक २० नोव्हेंबर**

**म्हणौनि विषयसुखाडु[1] तुटे । जव जव देहबुद्धी आटे ।**
**तंव तंव आनंदु दुणवटे[2] । कर्मी जया ।।१८.६४४।।**

*शब्दार्थ - १) विषयांची आवड २) दुप्पट*

**अर्थ** - म्हणून जो जो विषयसुख कमी होईल व देहाहंकार नाहीसा होईल, तो तो कर्म करण्यात ज्याचा आनंद दुप्पट वाढतो.

## सात्त्विक कर्त्याची लक्षणे

पारमार्थिक मार्गात उत्तम साधक होण्यासाठी सात्त्विक गुणांची कास धरली पाहिजे. हा गुण अंगी बाणला व त्याचा प्रभाव वाढला की, मनुष्याकडून सात्त्विक कर्मे व्हावयास लागतात.

अठराव्या अध्यायाच्या २६ व्या श्लोकावरील माऊलींचे हे भाष्य आहे. आदर्श सात्त्विक कर्त्यांची लक्षणे साररूपाने या श्लोकात मांडली आहेत. हे एक परिपूर्ण दैवीगुण संपत्तीच्या पुरुषाचे वर्णन आहे. कोणत्याही कार्यक्षेत्रात काम करीत असता अशा विलोभनीय कार्यकर्त्याची गरज असते.

"मुक्तसंग, अनहंवादी, धैर्यवान, उत्साही, यश व अपयश काही मिळो पण त्यात समचित्त, निर्विकार असणारा कर्ता हा सात्त्विक कर्ता असतो.

या श्लोकावर माऊलींनी सुंदर निरुपण केले आहे. सात्त्विक कर्त्याची लक्षणे साररूपाने सांगितली आहेत.

अशा सात्त्विक कार्यकर्त्याला ऐहिक अथवा पारलौकिक भोगाबद्दल किंचितही ममता, आसक्ती, कामना, स्पृहा राहिलेली नसते. म्हणून विषयसुखाबद्दल त्याच्या मनात कसलेही आकर्षण नसते. तो सर्वथा मुक्तसंग असतो. अनासक्त होऊन इतरांसारखीच कर्मे करीत असतो.

मन, बुद्धी, इंद्रिये, देह या अनात्म पदार्थाबद्दल, आत्मबुद्धी नसल्यामुळे कोणत्याही कर्माचे कर्तृत्व व भोक्तृत्व तो स्वीकारीत नाही. म्हणून त्याचा अहंभाव नाहीसा झालेला असतो.





कर्तव्यकर्मे, स्वधर्मानुसार करीत असताना त्यात कितीही संकटे येवोत पण आपल्या कर्तव्यात तो कधीही कसूर करत नाही. त्याचा उत्साह अधिकाधिक वाढत असतो. कार्यशक्ती वृद्धिंगत होत असते व अखंड उत्साहाने आपले कर्म तो तडीस नेत असतो.

यश येवो वा अपयश. तो समचित्त भावाने हे सर्व स्वीकारीत असतो. पण त्याचा आनंद मात्र अधिकाधिक वाढत असतो. ज्याप्रमाणे सोने तापविले असता, वजनात कमी झाले तरी त्याचा कस वाढत असतो, त्याप्रमाणे कर्मे करण्यात त्याचा उत्साह अधिक वाढत असतो. अशा सात्त्विक कर्त्याला कोणत्याही स्वरूपात प्रत्युपकाराची अपेक्षा नसते.

**दिनांक २१ व २२ नोव्हेंबर**

**मी अविवेकाची[1] काजळी[2] । फेडूनि विवेकदीप उजळी ।**
**तै योगिया पाहे[3] । दिवाळी निरंतर[4] ।।४.५४।।**
**मज हृदयी सद्‌गुरु । जेणे तारिलो[5] हा संसारपुरु ।**
**म्हणऊनि विशेषे अत्यादरु[6] । विवेकावरी[7] ।।१.२२।।**

*शब्दार्थ - १) अविचाराची, अज्ञानाची २) दिव्याभोवतीचे आवरण ३) उजाडे ४) सतत ५) तरून गेलो ६) अतिशय आदराने ७) मोठ्या विचाराने*

**अर्थ** - मी विवेकदीपाला आलेली अविचाराची काजळी झाडून तो प्रज्वलित करतो, त्या वेळी योग्यांना निरंतर (अस्त नाही अशा) दिवाळीचा दिवस उगवतो. ।।४.५४।।

ज्यांनी मला या संसारपुरातून तारिले ते सद्‌गुरू माझ्या हृदयात आहेत, म्हणून माझे विवेकावर फार प्रेम आहे. ।।१.२२।।

## उत्तम कर्मासाठी विवेकबुद्धी सतत जागृत ठेवावी

आतापर्यंत ज्ञानेश्वरीतील कर्मयोगाचा सर्व अंगांनी आपण विचार केला. मनुष्य कर्माशिवाय एक क्षणसुद्धा राहू शकत नाही. प्रकृती मनुष्याला त्रिगुणानुसार कर्म करावयास भाग पाडते व मनुष्यसुद्धा या त्रिगुणानुसार तीन प्रकारची कर्मे करतो. कर्म करण्याचाच आपला अधिकार आहे. कर्माचे फळ आपल्या हाती नाही. निरपेक्ष व अनासक्त बुद्धीने केलेले कर्म भगवंताला आवडते. विहित कर्म म्हणजेच स्वधर्म व हा स्वधर्म म्हणजेच यज्ञ. अशा आपल्या स्वधर्मात मृत्यू आला तरी स्वीकारावा. पण दुसऱ्याचा स्वधर्म कितीही चांगला वाटला तरी स्वीकारू नये. निष्काम कर्मयोग हा संन्यास धर्मापेक्षासुद्धा श्रेयस्कर आहे. आपली स्वकर्मरूप फुले त्या भगवंताला अर्पण करावीत. "स्वकर्मणा तमभ्यर्च्य" हा भगवंताला सर्वांत आवडणाऱ्या भक्तीचा प्रकार आहे. अशा कर्मासाठी आपला व्यवसाय, प्रपंच सोडण्याचे कारण नाही. प्रपंचात बाहेरून प्रवृत्ती व आतून निवृत्ती धारण करावी. ज्यांना या जन्मात जे मिळवायचे ते कृतार्थ व्हायचे असे प्राप्तव्य प्राप्त झाल्यानंतरसुद्धा त्यांनी कर्म सोडू नये. श्रेष्ठ लोक जसे वागतात त्याप्रमाणे सर्वसामान्य लोक त्यांचेच आचरण करतात व त्यालाच धर्म मानतात. म्हणून अशा श्रेष्ठांनी विशेषेकरून कर्मे करावीत व अज्ञानी लोकांना योग्य तो मार्ग दाखवावा. म्हणून लोकसंग्रहार्थ का असेना पण अशा निष्काम, अनासक्त ज्ञानी, सिद्ध लोकांनी कर्माचरण करावे. निष्काम बुद्धीने केलेले कर्म हे तीर्थासारखे पवित्र असते. मन-बुद्धी अर्पण करून स्थिर मनोवृत्तीने कर्म आचरावे. समत्वबुद्धीने कर्म करणे हाच योग आहे. असे कर्म करताना सुखदुःख, यशापयश, लाभहानी, अशा द्वंद्वांचा विचार करू नये. कोणतेही कर्म करत असताना शास्त्रवचन प्रमाण मानावे. वेदविहित अनेक मार्ग असले तरी आपल्या स्वभावधर्मानुसार, आपले विहित कर्म व वेदांनी सांगितलेले कर्म यांची योग्य ती सांगड घालावी. वेदांनी सांगितलेले सर्वच मार्ग एकाच वेळी आचरता येत नाहीत.

ॐ

अशा अनेक अंगांनी कर्मयोगाचा सारासार विचार आपण केला. आता ज्ञानेशांनी उत्तम कर्म करण्यासाठी ज्या विवेकशक्तीचा ज्ञानेश्वरीमध्ये पुनःपुन्हा उल्लेख केला आहे, केवळ उल्लेखच नव्हे तर गौरव केला आहे, त्या विवेकाचा विचार या शेवटच्या दोन ओव्यांमध्ये आपण करावयाचा आहे.

कर्माचरण, शास्त्राध्ययन, दैवतोपासना यासारख्या साधनांची सफलता आत्मप्राप्तीत आहे. कर्मकांड कितीही कौशल्याने केले तरी जर त्यात या अध्यात्मदृष्टीचा अभाव असेल तर ही सर्व साधने निरर्थक आहेत. जसे मोराच्या अंगावरील असलेल्या मोरपिसावरील डोळ्यांनी बघता येत नाही किंवा आंधळ्याच्या हातात दिवा असून त्याचा त्याला काहीही उपयोग होत नाही, त्याप्रमाणेच परमार्थाच्या प्रांतात केवळ शब्दपांडित्याचा काहीही उपयोग होत नाही. अशा विवेकशून्य पढिक पंडितांना ज्ञानेश्वरांनी ''शास्त्रमूढ'' ही संज्ञा दिली आहे.

म्हणून अध्यात्मपरतेमुळे कर्माला डोळसपणा प्राप्त होतो. म्हणून धर्मसाधनेत बहिर्मुखतेपेक्षा अंतर्मुख वृत्तीची विशेष आवश्यकता आहे. केवळ बाह्यकर्म म्हणजे परमार्थाची विटंबनाच आहे. म्हणून माऊली म्हणते,

**म्हणोनि अंतरी ज्ञान व्हावे । मग बाह्य लाभेल स्वभावे ।**
**वरि ज्ञानकर्मे संभवे । ऐसे के जोडे ।।१३.४७१।।**
**यालागी बाह्य विभागु । कर्मे धुतला चांगु ।**
**आणि ज्ञाने फेडिला वंगु । अंतरीचा ।।१३.४७२।।**

**अर्थ** - (आत शुद्ध नसून केवळ बाह्यात्कारी कर्म करणे हे त्याप्रमाणे आहे) म्हणून मनामध्ये ज्ञान असावे. मग बाह्य शुद्धी सहजच प्राप्त होईल. पण ज्ञान व कर्म या दोहोंनी उत्पन्न होणारी पवित्रता कोठे मिळेल? ।।१३.४७१।। याकरिता अर्जुना, बाहेरील भाग कर्माने चांगला शुद्ध केलेला आहे आणि ज्ञानाने आतील मळ काढून टाकलेला आहे. ।।१३.४७२।।

थोडक्यात, आत मन शुद्ध नसताना बाहेर केवळ शरीराने कर्म करणे ही विटंबना आहे. अंतःकरणात ज्ञानाचा दिवा तेवत असेल, तर स्वाभाविकपणे सत्कर्माकडे प्रवृत्ती होते. म्हणून कर्मबंधनाचे मूळ कर्त्याच्या बुद्धीत आहे. बुद्धी शुद्ध असेल तर आत्मप्राप्तीचा मार्ग सुलभ होतो. बुद्धी ही सत्त्वगुणप्रधान आहे, तेजतत्त्वाचे ते उगमस्थान आहे. आत्मा व जीव यांच्यातील बुद्धी हा दुवा आहे, असे माऊलींनी वर्णन केले आहे (१३.८६ ते ८८). अशी शुद्ध बुद्धीच कार्याकार्याचा विवेक करू शकते.

बुद्धी, मन, इंद्रिये यात एकसूत्रीपणा असेल तर साधना यशस्वी होते. पण मन रजोगुणी असल्यामुळे सतत चंचल असते. अशा मनाची एक गोष्ट चांगली आहे की, ते ज्याच्यात रमते त्याचीच गोडी त्याला लागते. म्हणून युक्तीयुक्तीने अशा मनाला विषयापासून परावृत्त करून सत्कर्माची गोडी लावावी. मग बुद्धीचा निर्णय व मनाचा कल यामधील अंतर कमी होते. माऊली म्हणते,

**अर्जुना, समत्व चित्ताचे । तेचि सार जाण योगाचे ।**
**जेथ मना आणि बुद्धीचे । ऐक्य आथी ।।२.२७३।।**

मन व बुद्धी यांचा ऐक्यभाव सिद्ध होण्यासाठी आपली विवेकबुद्धी सदैव जागृत ठेवली पाहिजे. विवेकाचा गौरव माऊलींनी अनेक अध्यायांत केला आहे. तेराव्या अध्यायात ज्ञानेश्वर म्हणतात

**फिटो विवेकाची वाणी । हो कानामनाची जिणी ।**
**देखो आवडी ते खाणी । ब्रह्मविद्येची ।।१३.११६०।।**

**अर्थ** - आत्मानात्मविवेकाचा कमीपणा नाहीसा होवो, कानाचे व मनाचे जगण्याचे सार्थक होवो व वाटेल त्याला ब्रह्मविद्येची खाण बघता येवो.



ॐ

चौथ्या अध्यायात हीच मागणी आहे. भगवंत स्वतः म्हणतात की, माझा अवतार हा भक्तांच्या कैवारासाठी आहे. अज्ञान, अधर्म, अविचार हे नष्ट करून सज्जनांचे रक्षण करण्यासाठी मी अवताररूपाने येतो. मी विवेकदीपाला आलेली अज्ञानाची, अविचाराची काजळी झाडून ती प्रज्वलित करतो. तेव्हाच हे जग आत्मसुखाने भरून जाते.

संत, महात्मे भगवंताप्रमाणेच विवेकाची कास धरतात. प्रत्येक मनुष्याच्या अंतःकरणात ही सारासार विचार करण्याची विवेकबुद्धी भगवंताने दिली आहे. हा विवेक जेथे जागृत असतो तेथे उत्तम कर्म घडते. श्रेय व प्रेय, आत्मा व अनात्मा, न्याय व अन्याय, या सर्वांत निवड करण्याचे काम ही विवेकबुद्धीच करते. ज्या ठिकाणी हा विवेकरूपी ज्ञानाचा दिवा तेवत असतो तेथे सत्कर्म घडते. भगवंतावर निस्सीम, एकनिष्ठ, अनन्य प्रेम केले की, ह्या विवेकदीपावरील अविचाराची काजळी तो स्वतःच दूर करतो.

श्री ज्ञानेश्वर म्हणतात की, सद्‌गुरूच्या रूपाने तो भगवंत माझ्या हृदयात आहे. त्यांनीच मला या संसारपुरातून तारले आहे. त्यामुळेच माझे विवेकावर फार प्रेम आहे. हा विवेकच आपले कल्याण करतो.

विवेक आला की, सद्‌विचारावर, सत्कर्मावर आपली निष्ठा जडायला लागते.

संपूर्ण ज्ञानेश्वरीत माऊलींनी या विवेकाचा गौरव केला आहे. गीतेच्या तत्त्वज्ञानावर हा विवेकाचा साज चढविला आहे. ते पुढे म्हणतात -

**आता अवधारा कथा गहन । जे सकळा कौतुका जन्मस्थान ।**
**की अभिनव उद्यान । विवेकतरूचे ।।१.२८।।**

**अर्थ** - आता (ज्यात गीता निर्माण झाली अशा महाभारताची) खोल विचारांनी भरलेली गीता (तिचे माहात्म्य) ऐका. ही कथा सर्व चमत्काराची खाण आहे किंवा विवेकरूपी वृक्षाचा अपूर्व बगीचा आहे.

म्हणून सर्व शास्त्रांमध्ये ती श्रेष्ठ आहे. अशा गीतेवरील भाष्यांतून, ज्ञानेश्वरांनी विचार-विवेकाचे वैभव आपल्याला दिले आहे. विवेकाच्या अधिष्ठानावरच परमार्थाचा डोलारा उभा राहतो. विवेकाची कास धरली की, निषिद्ध कर्मांचा त्याग होऊन दैवीगुणसंपन्न असे भगवंताला आवडणारे दैवीकर्म आपल्या हातून होते.

।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।

ॐ

## प्रकरण तिसरे

## श्री ज्ञानेश्वरांचा ज्ञानयोग

ज्ञानीयांचा राजा, श्री ज्ञानेश्वरांनी भक्तिमार्गात ज्ञानाला खूप महत्त्व दिले आहे. अज्ञानी भक्तीचे जोरदार खंडन केले आहे. समजून-उमजून न केलेली भक्ती म्हणजे खडकावर पडलेला पाऊस किंवा अग्नीत टाकलेले बीजच. दोन्हीही जशी व्यर्थ जातात, तसे भगवंताचे स्वरूप न समजता केलेली भक्ती म्हणजे केवळ कर्मकांडच. जीव, जगत व जगदीश्वर यांचे स्वरूप, ज्ञान झाले की भक्तीचा खरा अर्थ समजतो.

आजही भक्तीचे स्वरूप अज्ञानमूलक आहे. मी करेन ती भक्ती, मला जशी जमेल ती भक्ती असे म्हणून, शास्त्राचे अध्ययन न करता किंवा संतांनी दाखविलेली भक्तीची नेमकी वाट न चोखाळता, आपल्याच बुद्धीने काहीतरी करून त्याला भक्ती म्हणायचे व खोट्या आत्मसमाधानात राहायचे. अशा अज्ञ, दांभिक लोकांना माऊलींनी ज्ञानयोगाचे महत्त्व ज्ञानेश्वरीत विशद केले आहे.

ज्ञान, कर्म हे भक्तीचे दोन डोळे आहेत. ज्ञानमार्ग, योगमार्ग व कर्ममार्ग हे तीन मार्ग ज्ञानेशांच्या भक्तिमार्गाला येऊन मिळाले आहेत. त्या तीन मतांचे भक्तिमतात सामरस्य झाले आहे. ज्ञानेश्वरप्रणीत भक्तिकल्पना ही ज्ञानोत्तर भक्तीची कल्पना आहे. गीता ही ज्ञानामृताची जान्हवी असून ज्ञान हे भक्तीचे डोळे आहेत हे ज्ञानेश्वर पुनःपुन्हा सांगतात. या तिसऱ्या प्रकरणात, ज्ञानमार्गाचा आपण सखोल विचार करू. ज्ञानमार्गावरील पहिल्या खंडात आलेल्या ओव्या संदर्भासाठी खाली देत आहे. एकुण ओव्या २३.

| अध्याय | ओवी क्रमांक | अध्याय | ओवी क्रमांक |
|---|---|---|---|
| २ | ३६६, ३६७ | १३ | ९; ८२, १७८, ८३५ |
| ४ | १०५, १६५, १६६, १७२ | १४ | ३८८ |
| | १७३, १८२, १८३, १९० | १५ | ४२० |
| ७ | १०९, १३६ | १८ | १२४७, १२४८ |
| १० | ७७, ११७, ११८ | | |

**दिनांक २३ नोव्हेंबर**

**येर माते नेणोनि भजन । ते वायाचि गा आनेआन[१] ।**
**म्हणोनि कर्माचे डोळे ज्ञान । ते निर्दोष होआवे[२] ।।९.३५०।।**

*शब्दार्थ - १) काहीतरी २) असले पाहिजे*

**अर्थ** - अर्जुना, मला न जाणून, जे भजन होते ते भजन व्यर्थ. भलत्यास भलते असे होते, याकरिता माझे भजनकर्म ज्या ज्ञानाने होते, त्या ज्ञानाची दृष्टी स्वच्छ असली पाहिजे.



ॐ

## ज्ञानाने ईश्वराचे स्वरूप न जाणता केलेले भजन व्यर्थ

''जे श्रद्धेने युक्त असलेले भक्त माझ्याहून अन्य देवतांची देखील पूजा करतात, ते देखील, हे अर्जुना, माझीच पूजा करतात, पण अज्ञानाने'' या नवव्या अध्यायाच्या २३ व्या श्लोकावरील निरूपणात वरील ओवी आली आहे.

अनेक यज्ञ वगैरे कर्मकांडातून अनेक देवतांची उपासना केली जाते. अग्नी, इंद्र, सूर्य, वरुण इत्यादी देवतांना हवन दिले जाते. वास्तविक इंद्रादिकांच्या भावनेने केलेले भजन हे परमात्म्याचेच भजन असते. कारण ह्या सर्व रूपांनी तोच एक परमात्मा नटला आहे.

माऊलींनी येथे एक सुंदर दृष्टान्त दिला आहे. झाडाची पाने, फुले, फळे ही एकाच बीजापासून निर्माण झालेली असतात. परंतु पाणी मुळात न घालता पाना-फुलांना घातले तर ते झाडाला पोहोचेल काय? दुसरा असाच दृष्टान्त आहे. जशी शरीराची दहा इंद्रिये आहेत. या सर्व इंद्रियांनी भोगलेले विषय एकाच ठिकाणी म्हणजे भोक्त्याला मिळतात. असे जरी असले तरी पक्वान्नें ती तोंडानेच खाल्ली पाहिजेत. कानांत भरून ती खाता येत नाहीत. वास तो नाकानेच घेतला पाहिजे.

त्याप्रमाणे भगवंताचे भजन त्याच्याच भावनेने करावे. भगवंताला न जाणता जे भजन होते ते व्यर्थ आहे.

'जो जो भाव धरून भक्त माझी उपासना करतात त्यांचा तो तो भाव मी पूर्ण करतो, त्या भावाचेही रक्षण करतो. म्हणून अर्जुना, सर्व प्रेमभावाला मीच त्यांना आश्रय वाटतो,' असे भगवंत म्हणतात.

इतर देव-देवतांची पूजा करताना, त्या सर्व देवदेवतांत परमात्माच आहे हे ते जाणत नाहीत. त्यामुळे परमात्म्याचा भाव त्यात नसतो. भगवंताचा भाव सोडून केलेले भजन त्यामुळे व्यर्थ होते.

म्हणून कर्म करावे, त्याच वेळी ज्ञानरूपी कर्माचे डोळे निर्दोष असावयास पाहिजेत.

म्हणून ईश्वराचे भजन आणि भक्ती ईश्वराच्याच भावनेने केली पाहिजे. असे केले नाही तर ते भलत्यास भलते असे होते. हे भजनकर्म ज्या ज्ञानामुळे होते त्या ज्ञानाची दृष्टी भक्ताच्या ठायी निर्दोष, परिपूर्ण, स्वच्छ असली पाहिजे.

जे ईश्वराविषयीच्या प्रेमाने प्रेमयुक्त होतात, त्यांना ईश्वराची प्राप्ती होते. ईश्वराची भक्ती करणारे ईश्वराप्रत जातात व अन्य देव-देवतांची पूजा करणारे त्या त्या देवताप्रत जातात. म्हणजे त्या देवतांकडून ती ती विवक्षित फळेच त्यांना प्राप्त होतात. गीतेत भगवंतांनी हे स्पष्ट केले आहे.

**देवान्देवयजो यान्ति मद्भक्ता यान्ति मामपि ।।७.२३।।**

**अर्थ** - देवतांची भक्ती करणारे देवताप्रत जातात आणि माझी भक्ती करणारे माझ्याजवळ येतात.

अशा अल्पबुद्धी मनुष्यांना मिळणारे फळसुद्धा विनाशी व अल्पकाळ टिकणारे असते.

''जो जो भक्त ज्या ज्या देवतेची श्रद्धेने भक्ती करण्याची इच्छा करतो, त्या त्या भक्ताची श्रद्धा त्या त्या देवतेच्या ठिकाणी मी स्थिर करतो,'' असे भगवंत स्वच्छ सांगतात. याहीपुढे जाऊन ते म्हणतात की, त्या देवदेवतांना त्यांना ती इच्छित फळे द्यावयास मीच भाग पाडतो. ते सर्व माझ्यामुळेच होते.

अशा कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम, सर्वेसर्वा, श्रेष्ठ परमात्म्याचे भजन एकनिष्ठतेने करणे हीच खरी भक्ती होय.

**दिनांक २४ नोव्हेंबर**

**क्षेत्र आणि क्षेत्रज्ञाते । जाणणे जे निरुते[१] ।**
**ज्ञान ऐसे तयाते । मानूं आम्ही ।।१३.९।।**

*शब्दार्थ - १) खरे*

**अर्थ** - क्षेत्राला आणि क्षेत्रज्ञाला जे यथार्थ जाणणे, त्याला ज्ञान असे आम्ही समजतो.

ॐ

## देह व त्याला जाणणारा देही यांना जाणणे म्हणजे ज्ञान

तेराव्या अध्यायात क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांची महती सांगितली आहे. क्षेत्र म्हणजे काय, क्षेत्रज्ञ कोण असतो इत्यादी प्रश्नांचा उलगडा या अध्यायात केला आहे. या प्रश्नांचे ज्ञान ज्यांना झाले ते पुरुष ज्ञानी होत. यांचे ज्ञान होणे, यालाच ज्ञान अशी ज्ञानाची व्याख्या केली आहे.

अशा ज्ञानी पुरुषाची लक्षणेसुद्धा यात वर्णन केली आहेत. क्षेत्र म्हणजे हा मानवी देह. या देहाला जो जाणतो तो क्षेत्रज्ञ. आणि या दोघांची ओळख ज्यामुळे होते ते ज्ञान होय. सर्व क्षेत्रांचे पालन करून जो असतो तो क्षेत्रज्ञ आणि तोच परमात्मा आहे.

पंचमहाभूते, अहंकार, बुद्धी, अव्यक्त, दहा इंद्रियांचा समुदाय, दहा विषय, मन, सुख, दुःख, द्वेष, संघात, इच्छा, चेतना आणि धृती या छत्तीस तत्त्वांचा समुदाय म्हणजे क्षेत्र होय. पृथ्वी, जल, अग्नी, वायू व आकाश ही पंचमहाभूते होय. ईश्वराने निर्माण केलेले सारे जग म्हणजे क्षेत्रच.

याला क्षेत्र का म्हणावे, हे कसे व कोठे उत्पन्न होते व कोणकोणत्या विकारांमुळे याची वाढ होते. हे क्षेत्र माळजमीन आहे की सुपीक, या क्षेत्रात काय पेरावे, या सर्वांची चर्चा या अध्यायात झाली आहे.

क्षेत्रज्ञ म्हणजे आत्मा. देह व आत्मा यांची चर्चा करून, त्यांचा निवाडा करण्यात वेद, सहा शास्त्रे इत्यादींनी सारा खटाटोप केला आहे. क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचे वर्णन निरनिराळ्या ऋषींनी, तत्त्ववेत्यांनी, दार्शनिकांनी वेगवेगळे केले आहे. यात मतमतांतरे असल्यामुळे हे क्षेत्र कसे आहे व याचे स्वरूप कसे आहे याविषयी मीच तुला सांगतो असे भगवंतांनी अर्जुनाला सांगितले.

**दिनांक २५ नोव्हेंबर**

तैसे शास्त्रजात जाण । आघवेचि[1] अप्रमाण ।
अध्यात्मज्ञानेविण । एकलेनि ।।१३.८३८।।

*शब्दार्थ - १) संपूर्ण*

**अर्थ** - त्याप्रमाणे एका अध्यात्मज्ञानाशिवाय ते इतर सर्व शास्त्रांचे ज्ञान पूर्णपणे अप्रमाण आहे असे समज.

## अध्यात्मज्ञान हेच सर्वश्रेष्ठ ज्ञान

भगवद्गीतेतील ११ व्या श्लोकावरील निरूपणात, ज्ञानेश्वरांनी आपल्या उत्तुंग काव्यप्रतिभेने एकूण २४८ ओव्यात अध्यात्मज्ञानाचे माहात्म्य वर्णन केले आहे. येथेसुद्धा त्यांनी ज्ञानाची व्याख्या केली आहे. अज्ञानाच्या लक्षणांचे वर्णनसुद्धा विस्तृत व बहारदार झाले आहे.

''अध्यात्मज्ञान नित्य आहे अशी बुद्धी असणे, तत्त्वज्ञानाचा अर्थ जे ज्ञेय ब्रह्म त्याचे दर्शन, या सर्वाला ज्ञान असे म्हणतात. याखेरीज जे इतर ते सर्व अज्ञान होय.'' ।।१३.११।

श्री ज्ञानेश्वर म्हणतात, ''परमात्मा म्हणून जी एक वस्तू आहे ती ज्या ज्ञानामुळे अनुभवाला येते ते अध्यात्मज्ञान होय. खरा भक्त या ज्ञानाशिवाय जे प्रपंचाचे व इतर क्षेत्रांचे ज्ञान आहे ते बाजूस सारून मन व बुद्धी यास अध्यात्मज्ञानाच्या मार्गाला लावतो. शुद्ध आत्मज्ञानाचे फल म्हणजे ज्ञेयाची (ब्रह्माची) प्राप्ती आहे. जेथे ज्ञान नाही ते सर्व अज्ञानच म्हटले पाहिजे.

ज्याने अध्यात्मज्ञानाला कधीच मानले नाही तो ज्ञानाचा विषय जे ब्रह्म यास पाहू शकत नाही. आत्मनिरूपण न



ॐ

जाणता, इतर कोणत्याही क्षेत्रातील कितीही ज्ञान प्राप्त केले तरी जोपर्यंत अध्यात्मज्ञान मिळत नाही तोपर्यंत ते सर्व व्यर्थ आहे. केवळ अध्यात्मज्ञान हेच प्रमाणशास्त्र आहे. मंत्रशास्त्र, इतर शास्त्रे, वैद्यशास्त्र, गृहशास्त्र, ज्योतिषशास्त्र, अशा सर्व शास्त्रांत तो जरी पारंगत असला तरी अध्यात्म ज्ञानावाचून त्याचे जीणे व्यर्थ आहे.

ज्ञानेश्वर हे समजावण्यासाठी एक समर्पक दृष्टान्त देतात. मोराच्या अंगावर जशी डोळेवाली पिसे भरपूर असतात, परंतु मोर ज्या एका आपल्या दृष्टीने पाहतो ती दृष्टीच नसेल तर त्या पिसावरील डोळ्यांचा जसा काहीएक उपयोग नाही, त्याप्रमाणे अर्जुना, एक अध्यात्मज्ञानावाचून इतर ज्ञानांचा काही उपयोग नाही. त्याच्याशिवाय इतर सर्व शास्त्रांचे ज्ञान पूर्णपणे अप्रमाण आहे.

म्हणून भक्तीत भगवंताचे व त्याने निर्माण केलेल्या जीव व जगताचे ज्ञान होण्यासाठी अध्यात्मज्ञानाची गरज आहे.

**दिनांक २६ नोव्हेंबर**

अगा नेणा[1] आणि चतुरा । पुढा निळयांचा[2] दुसरा[3] ।
नेणा सर्पत्वे जाला येरा । सुखालागी ।।१५.४१९।।

*शब्दार्थ - १) अज्ञान्याला, मूढाला २) नीळमण्यांचा ३) दोन सरांचा हार*

**अर्थ** - अर्जुना, अरे अज्ञानी व ज्ञानी यांच्यापुढे असलेला दोन पदरांचा नीळमण्यांचा हार, हा अज्ञान्याला सर्पपणाने (भीती उत्पन्न करणारा) भासला व तोच हार ज्ञान्याला (हार नीळमण्यांचा आहे हे यथार्थ ज्ञान झाल्यामुळे) सुख उत्पन्न करणारा झाला.

## ज्ञान्याला सुख अज्ञान्याला दुःख हे निश्चित

या विश्वात सर्व ठिकाणी परमात्म्याशिवाय काहीच नाही. प्रत्येकाच्या हृदयात त्याचा वास आहे. असे असताना काही जण सुखी तर बाकीचे दुःखाने व्याकुळ झालेले असतात. ही शंका येणे रास्त आहे. व्यसनी, बलात्कारी, दरोडेखारे अशा राक्षसी प्रवृत्तीच्या माणसांच्या हृदयातसुद्धा त्या ईश्वराचा अंश आहे. अज्ञान्यांच्याही हृदयात तोच आहे व संत-महात्म्यांच्याही अंतःकरणात तो आहे. सर्वत्र तो असताना हा अनाचार, दारुण दुःख का? असा एक सार्वत्रिक प्रश्न विचारला जातो.

माऊलींनी याचे यथार्थ उत्तर दिले आहे. सर्वत्र तो ईश्वर भरून उरला आहे यात शंका नाही. परंतु प्राण्यांची अंतःकरणरूप उपाधी जशी शुद्ध किंवा अशुद्ध असेल त्याप्रमाणे भगवंत त्यांच्या ठिकाणी व्यक्त होतो.

जसे एकच पाणी निरनिराळ्या बीजांच्या धर्माप्रमाणे निरनिराळ्या झाडांत निरनिराळ्या रसांच्या परिणामाला पावते किंवा सूर्याचा प्रकाश एकच असतो पण लोकांच्या निरनिराळ्या उद्योग-व्यापारामध्ये वेगवेगळ्या उपयोगास येतो. त्याप्रमाणे भगवंताचे एकच स्वरूप निरनिराळ्या जीवांच्या ठिकाणी, त्यांच्या त्यांच्या बुद्धीप्रमाणे व शुद्धतेप्रमाणे निरनिराळ्या परिणामाला पावत असते.

एकाच स्वाती नक्षत्राचे पाणी हे शिंपल्यामध्ये मोती होते व सापाच्या मुखात पडले की विष होते त्याप्रमाणे ज्ञानवान्याला ईश्वर सुखरूप आहे व अज्ञान्याला दुःखरूप आहे.

एकच नीळमण्यांचा हार अज्ञानी माणसाला सापासारखा वाटल्याने दुःखदायक होतो तर ज्ञानी माणसाला त्याचे यथार्थ ज्ञान झाल्यामुळे सुखदायक होतो.

ॐ

**दिनांक २७ नोव्हेंबर**

**तैसा ज्ञानाचिया दिठी । जो माते सेवी किरीटी ।**
**तो होय ब्रह्मतेच्या मुकुटी । चूडारत्न[१] ।।१४.४००।।**

*शब्दार्थ - १) मुकुटमणी*

अर्थ - त्याप्रमाणे अर्जुना, ज्ञानाच्या दृष्टीने जो माझे सेवन करतो, तो ब्रह्मस्थितीच्या मुकुटावर अग्रभागी असणारे रत्न (मुकुटमणी) होतो.

## ज्ञानी भगवद्स्वरूपाला पोहोचतो

भगवंताचे स्वरूप कसे आहे, भक्तीचे स्वरूप, एकनिष्ठता, अव्यभिचारी भक्ती कशी असते? अशा प्रश्नांचा निर्णय झाल्यावर ईरवरप्राप्तीचा मार्ग सुलभ होतो.

वरील ओवी चौदाव्या अध्यायातील २६ व्या श्लोकावरील भाष्य आहे. ''अव्यभिचारी भक्तियोगाने जो माझी उपासना करतो तो या त्रिगुणांच्या पूर्ण पलीकडे जाऊन, त्यास ब्रह्मत्व प्राप्त होण्याची योग्यता येते.'' (१४.२६). या अव्यभिचारी भक्तीचा अर्थही माऊली सांगतात. विश्वाचा निरास करून भगवंताला प्राप्त करावे असा तो विश्वाहून वेगळा नाही तर विश्वासकटच सर्व काही तो आहे. असे ज्ञान जेव्हा होते तेव्हा तिला अव्यभिचारी भक्ती असे म्हणतात. यात भेद दिसला तर ते अज्ञान. पण भेद टाकून 'सोऽहं' वृत्तीने भगवंतास आपल्याहून वेगळा न मानता जे जाणले जाते ती अव्यभिचारी भक्ती.

पृथ्वीवर असलेला अणू जसा पृथ्वीरूपच असतो किंवा बर्फाच्या पर्वतावरील बर्फाचा कण जसा पर्वतरूपच असतो, समुद्रावरची लाट जशी समुद्रापेक्षा वेगळी नसते तसा मीसुद्धा ईश्वराहून वेगळा नाही अशी ऐक्याची दृष्टी जेव्हा येते तेव्हाच तिला भक्ती म्हणायचे.

आणि अशी ऐक्याची, सामरस्याची दृष्टी म्हणजे ज्ञानाचा चांगलेपणा होय व तेच योगाचेही सर्व सार होय.

ढग आणि समुद्र यामध्ये जशी अखंड जलधारा लागलेली असते त्याप्रमाणे अशा भक्ताची वृत्ती अखंड ब्रह्ममय असते. जेव्हा भक्त व भगवंत यांच्यामध्ये असे ऐक्य होते तेव्हा तो ईश्वररूपच होतो.

याबरोबरच जो ज्ञान प्राप्त करून भगवंताशी एकरूप होतो तोसुद्धा या ब्रह्मस्थितीच्या मुकुटावर अग्रभागी असणारे रत्नच होतो.

अशा या ब्रह्मत्वालाच सायुज्य असे म्हणतात. चौथा पुरुषार्थ हे यालाच नाव आहे.

**दिनांक २८ नोव्हेंबर**

**म्हणोनि जन्मक्षया[१] । अतीत[१] ते धनंजया ।**
**मी जाले ज्ञाना यया । अनुसरोनी ।। १४.५९ ।।**

*शब्दार्थ - १) जन्म व मृत्यूच्या पलीकडे*

अर्थ - अर्जुना, म्हणून ते पुरुष या ज्ञानाचा मार्ग स्वीकारून जन्मक्षयातीत असे मद्रूप झाले.

## आत्मज्ञानी पुरुष जन्म-मृत्यूच्या पलीकडे जातो

गीतेतील चौदाव्या अध्यायाच्या पहिल्या दोन श्लोकांत भगवंतांनी ज्ञानाचा महिमा गायिला आहे. माऊलींनी त्याचा विस्तार केला आहे.



ॐ

वास्तविक ज्ञान हे आपले स्वरूप आहे पण मोह, अज्ञान यामुळे आपल्याला स्वर्ग व मृत्युलोकातील गोष्टीच अधिक आवडतात. आत्मज्ञान हे अग्नीसारखे तर इतर ज्ञाने ही गवताप्रमाणे आहेत. म्हणून हे ज्ञान उदय पावले असता इतर सर्व ज्ञाने लय पावतात. याच ज्ञानाने मोक्षप्राप्ती होते.

''अशा या ज्ञानाचा आश्रय करून माझ्यासमान झालेले सृष्टीनिर्माणकाली जन्म पावत नाहीत आणि प्रलयकाली मृत्यूला प्राप्त करीत नाहीत,'' असे भगवंताचे आश्वासन आहे.

अशा ज्ञानी भक्ताची तुलना भगवंत आपल्याबरोबर करतात. मी जसा नित्य आहे तसेच तेही नित्य आहेत. मी जसा अमर्याद आनंद आहे, सत्याचा समुद्र आहे तसेच ते आहेत. घट फुटल्यावर घटाकाश जसे महाकाशात विलीन होते तसे तेही माझ्यात विलीन होतात. दिव्याच्या मूळ ज्योतीत दुसऱ्या अनेक ज्योती मिळाल्या असता त्या सर्व जशा एकरूप होतात तसे हे ज्ञानाच्या योगाने मद्रूप होतात.

असे भक्त द्वैत संपल्यामुळे ईश्वररूप होतात. त्यामुळे जेव्हा मूळ सृष्टी उत्पन्न होते, तेव्हाही त्यांना जन्मास यावे लागत नाही.

म्हणून ते पुरुष या ज्ञानाचा मार्ग स्वीकारून जन्मक्षयातीत असे मद्रूप झाले.

असा ज्ञानाचा महिमा भगवंतांनी वर्णन केला. यात भगवंताचा हेतू असा होता की, अर्जुनालाही या ज्ञानाची गोडी लागावी.

**दिनांक २९ व ३० नोव्हेंबर**

**परी ज्ञानेंवीण नाशिले । जे बुद्धिभेदासी[१] आले ।**
**तेणेचि या कल्पिले[२] । अनेकत्व ।।४.६८।।**
**म्हणऊनि अभेदी भेदु देखती । यया अनाम्या[३] नामे ठेविती ।**
**देवी देवो म्हणती । अचर्चाते[४] ।।४.६९।।**

*शब्दार्थ - १) बुद्धीचे ठिकाणी भेद झाला २) मानले ३) नामरहिताला*
*४) अनिर्वाच्य, चर्चा करण्याला अशक्य*

अर्थ - पण ज्ञान नसल्यामुळे त्यांचे सर्व बिघडते. ते असे की, त्यांच्या ठिकाणी भेदबुद्धी उत्पन्न होते, त्यामुळे मी जो एक, त्या माझ्या ठिकाणी ते अनेकत्वाची कल्पना करतात. ।।४.६८।।

म्हणून जेथे वास्तविक अभेद आहे तेथे ते भेद पाहतात, जो नामरहित आहे, त्याला ते नावे देतात. (वास्तविक) जो चर्चेचा, शब्दांचा विषयच होऊ शकत नाही, त्याला देव किंवा देवी म्हणतात. ।।४.६९।।

## अज्ञानामुळे ईश्वराचे स्वरूप समजत नाही

चौथ्या अध्यायाच्या ११ व्या श्लोकावरील हे निरूपण आहे. ''ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहं ।'' ''जे माझी भक्ती करतात त्यांच्यावर तेवढ्याच प्रमाणात मी प्रेम करतो,'' हे भगवंताचे स्पष्ट विवेचन आहे. भक्ती जर समजून-उमजून नाही केली तर भक्तीचे यथार्थ फळ प्राप्त होत नाही. केलेले प्रयास वाया जातात.

म्हणून ज्ञानेश्वरांनी अज्ञानी भक्तीचे परखड शब्दात वर्णन केले आहे. भगवंताला आवडणारी, ज्ञानपूर्वक केलेली उत्कट भक्तीच, ईश्वराच्या चरणी रुजू होते. अध्यायात सर्व काही रोखठोक आहे. हे पूर्ण शास्त्र आहे. ईश्वरी न्याय कुठेही अन्याय करणारा नाही.

बऱ्याच जणांची नेहमी तक्रार असते, आम्ही इतक्या वेळा इतकी व्रत-वैकल्ये केली, इतका दान-प्रसाद केला, इतक्या वेळा नामस्मरण केले, पूजापाठ केला पण भगवंताची कृपा मात्र आमच्यावर झाली नाही. सकाम भक्ती करणाऱ्यांना अपेक्षित फळे मिळाली नाहीत की, त्यांच्या मनात संशयाची बीजे निर्माण होतात. परमार्थमार्गात अपयशी होऊन मग निरीश्वरवादी होण्यापर्यंत अशा महाभागांची मजल जाते.

मनुष्य स्वभावतःच भजनशील आहे. भगवंताविषयीची भीती अथवा प्रेम, जिज्ञासू वृत्ती ही सर्वसाधारण प्रत्येकात असते. पण ईश्वरी स्वरूपाचे यथार्थ ज्ञान नसल्यामुळे त्याच्या अस्तित्वाविषयीच्या वेगवेगळ्या कल्पना तो करून घेतो. शास्त्राने सांगितलेल्या अचूक मार्गाने न जाता, जशी जमेल तेवढी मनाला अनुकूल असणारी भक्ती करतो.

भगवंताने आपला नेमका पत्ता व आपले स्वरूप गीतेतून, वेद-उपनिषदातून पुनःपुन्हा सांगितले आहे. ज्ञानेश्वरांनी त्यावर अतिशय सोप्या शब्दात ते समजावले आहे. ''जे जे भेटे भूत । ते ते मानिजे भगवंत ।।'' ''तैसा हृदयामध्ये मी रामु...'', ''या उपाधीमाजी गुप्त । चैतन्य असे सर्वगत...'' अशा नेमक्या, अर्थपूर्ण शब्दांतून त्याचे सार सांगितले आहे.

ईश्वर सर्वत्र व्याप्त आहे. त्याचे ज्यात अस्तित्व नाही असे ठिकाण व वस्तू जगात नाही. ईश्वर सर्वांच्या हृदयात आहे. तो केवळ देवळातील मूर्तीत आहे व इतरत्र नाही असे नाही. तो केवळ तीर्थस्थानी आहे व काही ठिकाणीच जागृत आहे असे नाही. म्हणून ''तीर्थी धोंडा पाणी'' असे परखड उद्‌गार तुकारामांना काढावे लागले. ''दूरी केही न वचावे । तीर्थासी गा ।'' असे माऊलींनाही म्हणावे लागले.

म्हणून ज्ञानाने मूर्तीशास्त्रही समजून घेतले पाहिजे. मानवी मनासाठी मूर्तीची, सगुणाची सोय आहे. पण या सगुणांतूनच निर्गुणाकडे जायचे आहे याची पक्की खूणगाठ भक्ताच्या मनात पाहिजे. अशा निर्गुण, निराकार भगवंताने भक्तांसाठी सगुण, साकार रूप धारण केले. पूर्णांशाने व अंशरूपाने अवतार घेऊन तो या भूमीवर अवतीर्ण झाला.

ईश्वरी तत्त्व सर्वत्र सारखे व एकच आहे. ''एको देवः सर्वभूतेषु गूढः सर्वभूतान्तरात्मा ।'' असा उपनिषदांनी उद्‌घोष केला आहे. पण अज्ञानी मनुष्य त्याचीच विविध रूपे पाहताना विविध देव-देवतांच्या नावाचा जपजाप्य करतो. एकाच परमात्म्याच्या ठिकाणी भेदाभेद करतो. भोग, काम व सांसरिक वस्तूंच्या प्राप्तीसाठी कनिष्ठ देव-देवतांची पूजा करून सर्वव्याप्त परमात्म्यालाच विसरतो. त्या नाव नसलेल्या परमात्मतत्त्वाला निरनिराळी नावे ठेवतो.

**दिनांक १ डिसेंबर**

**ते द्रव्यादियागु कीर[१] होती । परी ज्ञानयज्ञाची सरी[२] न पवती ।**
**जैशी तारातेजसंपत्ती[३] । दिनकरापाशी[४] ।।४.१७१।।**

*शब्दार्थ - १) निश्चयेकरून २) बरोबरी ३) नक्षत्रांचा प्रकाश ४) सूर्यापुढे*

**अर्थ** - ते द्रव्यादि यज्ञ खरे आहेत पण ताऱ्यांच्या तेजाचा डौल जसा सूर्यापुढे चालत नाही, तशी ज्ञानयज्ञाची सर त्यांना येत नाही.

## ज्ञानयज्ञ हा सर्वश्रेष्ठ यज्ञ आहे

द्रव्ययज्ञापेक्षा तपयज्ञ, त्यापेक्षा योगयज्ञ व या सर्वांपेक्षा ज्ञानयज्ञ श्रेष्ठ आहे असे भगवंत सांगतात. दृढ संकल्प करून स्वाध्याय केला पाहिजे. आत्मचिंतन व महापुरुषांचा सत्संग करून ज्ञानयज्ञ संपन्न केला पाहिजे. ब्रह्मज्ञानाचे ज्ञान सर्वश्रेष्ठ ज्ञान आहे. विश्वातील सज्जनांनी ज्ञानाची मशाल घेऊन जर ज्ञानदान केले तर अज्ञानाचा अंधार राहणार नाही. सर्वप्रकारच्या सर्व कर्मांचे पर्यवसान ज्ञानामध्ये होते.





माऊलींनी येथे एक दृष्टान्त दिला आहे. आकाशात ताऱ्यांचा, नक्षत्रांचा डौल जसा सूर्यापुढे चालत नाही तशी ज्ञानयज्ञाची सर इतर यज्ञांना येत नाही. वेदकाळात हे कर्मकांडात्मक यज्ञ व्हायचे. त्यातून स्वर्गप्राप्तीपर्यंतची फलनिष्पत्तीही व्हायची. ते यज्ञ यथासांग पूर्ण होऊन भौतिक वस्तूंची प्राप्ती होत असे. काही मर्यादेपर्यंत द्रव्ययज्ञातूनही हे समाधान प्राप्त होऊ शकते.

पण परमात्मसुखाचा ठेवा हस्तगत करण्याकरिता योगी लोक ज्ञानरूपी अंजन बुद्धीरूपी डोळ्यात घालतात. आत्मसुख प्राप्त करण्यासाठी याच ज्ञानयज्ञाची आवश्यकता आहे. असे ज्ञान हृदयात प्रतिष्ठित व्हायला लागले की, इंद्रिये भोगविषयांना विसरतात. प्रवृत्तीच्या ठिकाणी निवृत्ती स्थिर व्हायला लागते. मनाचे मनपण थांबते व ईश्वराच्या स्वरूपामध्ये बुद्धी स्थिर व्हायला लागते.

ज्ञानानेच वैराग्याची प्राप्ती होते. विवेक जागृत होऊन आत्मलाभाकडे त्याची प्रवृत्ती होते.

**दिनांक २ डिसेंबर**

**ऐसे ज्ञानप्रकाशे पाहेल[१] । तैं मोहांधकारु[२] जाईल ।**
**जैं गुरुकृपा होईल । पार्था गा ।।४.१७१।।**

*शब्दार्थ - १) उजाडेल २) मोहरूपी अंधकार*

**अर्थ** - अरे पार्था, ज्या वेळी श्रीगुरूंची कृपा होईल त्या वेळी असा ज्ञानप्रकाशाचा उदय होईल. आणि मग त्या त्या वेळी मोहरूप अंधकार नष्ट होईल.

## संतकृपा व गुरुकृपा यामुळेच ज्ञानप्राप्ती

चौथ्या अध्यायाच्या ३५ ते ४२ पर्यंतच्या सर्व श्लोकांत ज्ञानाचे माहात्म्य भगवंतांनी वर्णन केले आहे. यावर ज्ञानेश्वरांनी आपले वाग्वैभव उत्कटतेने प्रकट केले आहे. माऊलींचे हे हृद्गत असल्यामुळे त्याला विशेष माधुर्य प्राप्त झाले आहे.

असे ज्ञान प्राप्त करण्यासाठी काय करावे हे सुद्धा सांगितले. साधकाने योग्य त्या ज्ञानी गुरूची निवड करावी. अशा तत्त्वदर्शी गुरूकडे जाऊन, अतिशय विनम्र होऊन, बुद्धी समर्पित करून ज्ञानसाधना केली पाहिजे. आपल्या मनातील प्रश्न, शंका विचारून अंतःकरणातील संशय, विक्षेप काढून टाकावेत. गुरू-शिष्यांच्या हृदयाची स्पंदने एक व्हावीत. समर्पित भावाने आपल्या गुरूची सेवा करावी. श्रद्धा व सेवा जितकी उत्कट असेल तेवढे फळही उत्तम मिळते. 'प्रणिपातेन, परिप्रश्नेन व सेवया' हे तीन मार्ग साधकाने अनुसरले पाहिजेत.

असे समर्पित झाल्यावर गुरू वा आचार्य प्रसन्न होऊन ज्ञानदान करतात. आवश्यक व यथार्थ असा आदेश करतात. असे ज्ञान झाल्यावर शिष्याला मोह, लोभ, आसक्ती, अज्ञान असे काही राहत नाही. तमोरूपी अंधकारातून तो ज्ञानरूपी सूर्याच्या प्रकाशात राहतो. कठोपनिषदामध्येसुद्धा ज्ञानप्राप्तीसाठी हाच मार्ग उपदेशिला आहे.

''उत्तीष्ठत, जाग्रत प्राप्य वरान' निबोधत।' - 'उठा, जागे व्हा. तत्त्वदर्शी, ज्ञानी गुरुंजवळ जाऊन ज्ञान प्राप्त करा.'

असे ज्ञानसंपन्न झाल्यानंतर 'हे विश्वचि माझे घर' असे वाटून सर्व ठिकाणी त्या भगवंताचे दर्शन व्हायला लागेल. हे सर्व गुरुकृपेने होईल असे माऊली सांगते.

ॐ

**दिनांक ३ डिसेंबर**

**एथ[२] ज्ञान हे उत्तम होये । आणिकही एक तैसे के[१] आहे ।**
**जैसे चैतन्य कां नोहे । दुसरे गा ।।४.१७९।।**

*शब्दार्थ - १) कोठे २) इहलोकी*

**अर्थ** - इहलोकी ज्ञान हे उत्तम आहे. अरे, ज्याप्रमाणे दुसरे चैतन्य नाही, त्याप्रमाणे (ज्ञानाइतके उत्तम) दुसरे कोठे आहे?

## ज्ञानासारखे पवित्र काही नाही

आत्मज्ञानाची पवित्रता आत्मज्ञानाच्या ठिकाणी कशी आहे याचे स्पष्टीकरण ज्ञानेश्वर येथे करीत आहेत. ''न हि ज्ञानेन सदृशं पवित्रं इह विद्यते...' या सुप्रसिद्ध मंगल श्लोकावरील हे भाष्य आहे. ज्ञानासारखी पवित्र वस्तू या जगामध्ये कोणतीही नाही.

एखादा पापाचे आगर, भ्रांतीचा सागर व व्यामोहाचा डोंगर (मनाच्या घोटाळ्याचा) जरी असला तरी या ज्ञानरूपी नौकेने सर्व पातके तरून जाऊ शकतो. माऊलींनी ३६ व्या श्लोकावरील निरूपणात हे स्पष्ट केले आहे...

**जरी कल्मषांचा आगरु । तू भ्रांतीचा सागरु ।**
**व्यामोहाचा डोंगरु । होऊनी असशी ।।४.१७२।।**
**तऱ्ही ज्ञानशक्तिचेनी पाडे । हे आघवेचि गा थोकडे ।**
**ऐसे सामर्थ्य असे चोखडे । ज्ञानी इये ।।४.१७३।।**

असे सामर्थ्य या ज्ञानाचे आहे. प्रज्वलित केलेला अग्नी जसा काष्ठांचे भस्म करतो तसा ज्ञानरूपी अग्नी सर्व कर्मांना भस्म करून टाकते.

**ज्ञानाग्नीचेनि मुखे । जेणें जाळिली कर्मे अशेखे ।**
**तो ब्रह्मचि मनुष्यवेखें । वोळख तू ।।४.१०५।।**

**अर्थ** - ज्ञानरूपी अग्नीच्या द्वारा ज्याने सर्व कर्मे जाळून टाकली आहेत तो मनुष्याचे रूप घेतलेले प्रत्यक्ष ब्रह्मच आहे असे तू समज.

इहलोकी ज्ञान हे उत्तम आहे. ज्याप्रमाणे चैतन्य एकच असते त्याप्रमाणे ज्ञानसुद्धा एकच आहे. अमृताला जशी अमृताचीच उपमा देता येते तसे ज्ञानालासुद्धा ज्ञानाचीच उपमा शोभून दिसते. म्हणून ज्ञानाची पवित्रता ही फक्त ज्ञानाच्याच ठिकाणी आहे.

हे आत्मज्ञान मिळविण्यासाठी सत्पुरुषांची सेवा करावी. सत्पुरुष, संत हे तत्त्वदर्शी व ज्ञानाचे कोठारच आहेत. अत्यंत नम्रतेने व सेवाभावाने त्यांना शरण जाऊन त्यांच्याकडून ज्ञानाचा बोध करून घ्यावा. या आत्मज्ञानासारखी दुसरी श्रेष्ठ गोष्ट जगात नाही.

**दिनांक ४ डिसेंबर**

**तयातेचि गिंवसित[१] । हे ज्ञान पावे[२] निश्चित ।**
**जयामाजि अचुंबित[३] । शांति असे ।।४.१८९।।**

*शब्दार्थ - १) शोधीत २) प्राप्त होते ३) संपूर्ण*



ॐ

**अर्थ** - ज्या ज्ञानात निर्भेळ शांतीची वसती असते ते ज्ञान त्याला शोधीत येऊन निश्चित प्राप्त होते.

## जेथे ज्ञान तेथे शांती प्रकटते

ज्ञानाची महती सांगून ते ज्ञान कसे प्राप्त करावे याचा उपायही भगवंतांनी अर्जुनाच्या निमित्ताने आपणा सर्वांना सांगितला. 'श्रद्धावान लभते ज्ञानं...' 'श्रद्धावान पुरुषालाच ज्ञानाची प्राप्ती होते.' या श्रद्धेबरोबर त्याने आपल्या इंद्रियांवर ताबा मिळवलेला असला पाहिजे. असा जितेंद्रिय झालेला पुरुष निरिच्छ, निरहंकारी होतो. कशाचीही इच्छा मनात येऊ देत नाही. असा निर्विषय झालेला पुरुष प्रकृतीकडून होणाऱ्या कर्मांकडे साक्षीभावाने पाहतो. स्वतःकडे त्या कर्माचे कर्तृत्व घेत नाही.

ज्ञानेश्वरांनी श्रद्धेचे अपार महत्त्व ज्ञानेश्वरीत सांगितले आहे. भक्त जेव्हा सगुण भक्तीत आत्यंतिक श्रद्धेने समरस होऊन भक्ती करतो तेव्हा ईश्वर त्याच्यावर कृपेचा वर्षाव करतो. श्रद्धेतून भक्ताचे चित्त शुद्ध होऊ लागते. चित्तशुद्धी होऊ लागणे ही अंतःकरणात पडणाऱ्या भगवद्कृपेच्या पावलांची साक्ष होय. शुद्ध अंतःकरणातच ज्ञान प्रकट होते.

म्हणून श्रद्धा ही जीवन घडविणारी महान शक्ती आहे. श्रद्धाच चित्कला आहे. अंतःप्रेमवेदनाच सकंप होऊन श्रद्धेचा आकार घेते. म्हणून श्रद्धेचे उद्‌भवन भक्तजीवनात लाभणे ही ईश्वरकृपाच असते. श्रद्धा ही मानण्याची बाब नाही तर ती एक आत्मप्रत्ययी संज्ञा आहे. जीवनात श्रद्धेचे रूप ज्या अभिरुचीचे असेल त्या पातळीचे जीवन मनुष्य जगत असतो. श्रद्धा म्हणजे चित्ताच्या अवस्थेचे दर्शन आहे. अशी असीम श्रद्धा जेव्हा निर्माण होते तेव्हा ज्ञान प्रकटते. हे ज्ञान अंतःकरणात स्थिर झाले की, मग तेथे शांती प्रकटते. जिकडे पाहील तिकडे त्याला शांतीचाच अनुभव येतो. शांती आली की, आत्मज्ञानाचा विस्तार प्रकट व्हायला लागतो.

**दिनांक ५ डिसेंबर**

**जे तया ज्ञानाचेनि प्रकाशे । फिटले भेदाभेदांचे कवडसे[१] ।**
**मग मीचि जाहला समरसे[२] । आणि भक्तुही तेवीचि ।।७.११२।।**

*शब्दार्थ - १) अंधार २) ऐक्याने, एकरूप होऊन*

**अर्थ** - कारण की, ज्ञानाच्या प्रकाशाने त्याच्या ठिकाणचा द्वैताद्वैतरूपी अंधार नाहीसा होतो. नंतर ब्रह्मैक्यभावाने तो मद्रूप होतो आणि मद्रूप होऊनसुद्धा तो माझा भक्त असतोच.

## अनन्य भक्ती करणारा ज्ञानी श्रेष्ठ होय

चार प्रकारच्या भक्तांचे वर्णन झाल्यानंतर भगवंतांनी आपला निवाडा सांगितला आहे. आर्त, जिज्ञासू, अर्थार्थी व ज्ञानी या भक्तांमध्ये नित्य व अनन्य भक्ती करणारा ज्ञानी भक्त श्रेष्ठ आहे असे भगवंत म्हणतात. जो ज्ञानी आहे तोच एक भक्त, कारण ज्ञानाच्या प्रकाशाने त्याच्या ठिकाणचा द्वैताद्वैत भाव संपलेला असतो. सर्वत्र त्याला भगवंताचे दर्शन होते. ईश्वराशी एकरूप होऊनसुद्धा त्याचे भजन संपत नाही. माऊलींनी अशा ज्ञानोत्तर भक्तीचे वर्णन हृदयापासून केले आहे.

असा हा ज्ञानी पुरुष इतरांसारखेच वागतो, भक्ती करतो पण अनुभूतीमुळे आतून तो भगवद्रूपच असतो. ज्ञानाचा उदय झाल्यामुळे तो मला आत्मा समजतो व मीही ज्ञानी, माझा आत्मा आहे असे म्हणतो.

चारही प्रकारचे भक्त उत्कृष्टच आहेत. पण ज्ञानी तर केवळ माझा आहे हे भगवंतांनी १८ व्या श्लोकात म्हटले आहे. ''ज्ञानी तु आत्मा एव मे मतम्...'' अशा ज्ञानी भक्तावर मीच प्रेम करतो.

'म्हणोनि भक्तु एक पाही । ज्ञानिया जो' असे माऊली म्हणते. हा ज्ञानेश्वरांचा ज्ञानी भक्त आहे.

ज्ञानोत्तर भक्तीची प्रेममयता येथे वर्णन केली आहे. 'हे विश्वचि माझे घर...' अशी अद्वैत भावना ठेवूनसुद्धा 'मग याहीवरी पार्था । माझा भजनी आस्था । तरी तया ते मी माथा मुकुट करी ।।' (१२.२१३, २१४) इतके असूनही भगवंताच्या भजनाच्या ठिकाणी आस्था असते तेव्हा त्याला परमेश्वर आपल्या डोक्यावरचा मुकुटच करतो. परब्रह्माच्या अनुभूतीनंतरसुद्धा जो भगवंताची भक्ती करतो अशा ज्ञानी भक्ताविषयी ज्ञानेश्वर विशेष गौरवाने बोलतात.

**दिनांक ६ डिसेंबर**

**हे असो आणिक काही । तया सर्वत्र मीवांचूनि नाही ।**
**जैसे सबाह्य[1] जळ डोही । बुडालिया घटा[2] ।।७.१३३।।**

*शब्दार्थ - १) आंतबाहेर, सर्वत्र २) घट, घागर*

**अर्थ -** हे बोलणे असो, त्याला सर्व ठिकाणी माझ्यावाचून दुसरे काही नाही. ज्याप्रमाणे डोहात घट बुडाला असता त्याच्या आतबाहेर जसे पाणीच असते.

## ज्ञानी भक्त सर्वत्र ईश्वराला पाहतो

''बहुनां जन्मनामन्ते ज्ञानवान् मां प्रपद्यते । वासुदेवः सर्वमिति सः महात्मा सुदुर्लभः ।।'' या सातव्या अध्यायाच्या १९ व्या श्लोकावरील माऊलींचे हे भाष्य आहे. ''अनेक जन्म घेतल्यानंतर 'सर्व विश्व वासुदेव होय,' असे ज्ञान प्राप्त होऊन तो ज्ञानी मला शरण येतो (मला येऊन पोचतो) असा महात्मा अत्यंत दुर्लभ आहे.

माऊलींच्या ज्ञानी भक्ताचे हे वर्णन आहे. ''हे समस्तही श्री वासुदेवो । ऐसा प्रतीतिरसाचा वोतला भावो । म्हणोनि भक्तामाजी रावो । आणि ज्ञानिया तोचि'' ।।७.१३६।। ''हे संपूर्ण विश्व श्री वासुदेव आहे, अशा अनुभवरूपी रसाचा त्याचा भाव ओतलेला असतो. म्हणून सर्व भक्तांमध्ये तो राजा आणि ज्ञानीही तोच.''

ज्ञानेश्वरांच्या विश्वात्मक देवाची हीच कल्पना आहे. सर्व भूतमात्रात त्या भगवंताचा वास आहे, तोच या जगाचा कर्माध्यक्ष आहे, त्याच्यावाचून असे एकही ठिकाण नाही अशी सामरस्याची अनुभूती ज्ञानी भक्ताला येते. 'विश्व होऊनी । विचरे विश्वामाजी ।।' अशी आत्मौपम्य दृष्टी आल्यामुळे सर्वांच्या ठिकाणी तो भगवंताचे रूप पाहतो व भगवंतात सर्वांचे दर्शन घेतो. अशा भक्ताला अनेक जन्म झाल्यानंतर माझा साक्षात्कार होतो. सर्व जग नामरूपासह मीच आहे असे तो जाणतो.

पंचविषयांचे दाट अरण्य व त्यातील काम-क्रोधादी संकटे यांना चुकवून सद्भावनेच्या ओसाड जमिनीवर स्थिर होतो आणि अर्जुना, साधूंच्या संगतीत शास्त्राविरुद्ध प्रवृत्तीची आडवाट सोडून तो सत्कर्मास लागतो. निरपेक्ष व निरहंकारी भावनेने त्याची वाटचाल सुरू होते व त्याला गुरुकृपाही प्राप्त होते.

जेथे जेथे दृष्टी जाईल तेथे तेथे या ज्ञानी भक्ताला ईश्वराचेच दर्शन होते. पाण्यात बुडालेल्या घड्याला आतबाहेर जसे पाणीच असते, तसे त्याला मी-वाचून दुसरे काहीच दिसत नाही. या ज्ञानाने तो सर्व व्यवहार करीत असला तरी सर्व विश्वच आपण होऊन जातो.

**दिनांक ७ डिसेंबर**

**मग तो जीवु[1] हे भाष[2] सरे[3] । आब्रह्म[4] परमात्मबोधे[5] भरे ।**
**ऐसे भजती ज्ञानाध्वरे[6] । एकत्वे येणे ।।९.२४८।।**

*शब्दार्थ - १) जीवभाव २) बोली, भाषा ३) संपून जाते ४) ब्रह्मदेवापासून तृणापर्यंत ५) माझ्या ज्ञानाने ६) ज्ञानयज्ञाने*





**अर्थ -** अशा अनुभवावर आल्यावर मग, मी जीव आहे ही त्याची कल्पना नाहीशी होते. ब्रह्मदेवापासून मुंगीपर्यंत सर्व ब्रह्मरूपच आहे, अशा ज्ञानाने तो परिपूर्ण होतो. याप्रमाणे ज्ञानयज्ञद्वारा ते या ऐक्यभावनेने माझी उपासना करतात.

## ज्ञानयज्ञाने भगवंताची प्राप्ती होते

भजनयज्ञ, कीर्तन, योगयज्ञ यांचे वर्णन केल्यावर आता ज्ञानेश्वर ज्ञानयज्ञ करून परमेश्वराचे भजन कसे केले जाते याचे वर्णन करीत आहेत.

अद्वैतरूपी ज्ञानयज्ञात संकल्प हा पशू बांधावयाचा खांब आहे, पंचमहाभूते हा मांडव आहे, द्वैत हा पशू आहे. इंद्रिये व प्राण हीच यज्ञाची साहित्यसामग्री आहे. अज्ञान हे तूप आहे, मन व बुद्धी या कुंडात प्रज्वलित अग्नी असून सुखदुःखादी द्वंद्वाविषयी जी चित्ताची समता, ती यज्ञाचा ओटा (वेदी) आहे. आत्मानात्मविचार करण्याविषयीची जी बुद्धीची कुशलता तीच मंत्रविद्येची शोभा आहे व जीव हा यज्ञ करणारा आहे. आत्मरूपाच्या मंत्राने या ज्ञानरूप अग्निहोत्राचे अनुष्ठान करून हा जीव सर्व भेदांचा नाश करतो.

या वेळी अज्ञानरूपी तूप संपून जाते. यज्ञ व यज्ञकर्ता यातील भेद संपून जातो. परमात्म्याशी जीवाचे ऐक्य होते. आत्मबुद्धीमुळे पंचमहाभूते, विषय, इंद्रिये ही सर्व एकच आहेत अशी ऐक्यभावना यज्ञ करणारा जाणतो. अशा एकत्वाने संपूर्ण विश्व त्याच्या अनुभवास येते. अशा अनुभवावर आल्यावर मी जीव आहे असा जीवभाव नाहीसा होतो. तो स्वतःच आत्मरूप बनतो, निद्रावश झालेल्या माणसास स्वप्नात नानाप्रकारची सेना दिसते ती त्याला स्वतःहून वेगळी वाटते, पण जागे झाल्यावर सेना वगैरे काही नसून केवळ आपणच आहोत असे त्याला दिसते.

ब्रह्मदेवापासून मुंगीपर्यंत सर्व ब्रह्मरूपच आहे अशा ज्ञानाने तो परिपूर्ण होतो. याप्रमाणे ज्ञानी पुरुषाला सर्व मीच आहे असे अद्वैत ज्ञान होते. याप्रमाणे ज्ञानयज्ञद्वारा ते ऐक्यभावाने ते ईश्वराची उपासना करतात.

**दिनांक ८ व ९ डिसेंबर**

**मग तेच इये शरीरी । जै आपुला प्रभावो[1] करी ।**
**तैं इंद्रियांचिया व्यापारी । डोळांहि दिसे ।।१३.१७७।।**
**तैसे हृदयींचेनि ज्ञाने । जिये देही उमटती चिन्हे ।**
**तिये सांगो आता अवधाने[2] । चांगे[3] आइक ।।१३.१८३।।**

*शब्दार्थ - १) सामर्थ्य, प्रताप २) लक्ष देऊन, एकाग्र चित्ताने ३) चांगल्या रीतीने*

**अर्थ -** मग तेच ज्ञान जेव्हा या शरीरात आपली शक्ती प्रकट करते, तेव्हा ते इंद्रियांच्या क्रियेवरून डोळ्यांनाही दिसते ।।१३.१७७।।

त्याप्रमाणे हृदयातील ज्ञानाने देहाच्या ठिकाणी जी लक्षणे उमटतात, ती आता सांगतो. चांगले लक्ष देऊन ऐक. ।।१३.१८३।।

## ज्ञान हृदयात आले की, देहातून प्रकटते

क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांचे ज्ञान हेच खरे ज्ञान आहे. ते ज्ञान जेव्हा हृदयात प्रतिष्ठित होते तेव्हा ते इंद्रियांच्या विविध क्रियांवरून बाहेर प्रकट व्हायला लागते. तीच ज्ञानाची लक्षणे होत. अशी ज्ञानाची अठरा लक्षणे ७ ते ११ श्लोकांतून

भगवंतांनी सांगितली. याचा विस्तार ज्ञानेश्वरांनी ६८० ओव्यांतून केला आहे. ज्ञानेशांना ज्ञानाची विशेष आस्था असल्याने, त्यांनी या विस्तारातून आपल्या काव्यप्रतिभेचे उत्कट आविष्कार प्रकट केले आहेत. ज्ञानाचा हा विषय आकलन होण्यासाठी त्यांनी केलेला एवढा विस्तार ज्ञानेश्वरीत इतरत्र कोठेही नाही.

हे गुण किंवा लक्षणे मनुष्याच्या ठायी, देहातून उमटू लागली की, त्याला ज्ञान झाले असे म्हणावे. इंद्रियांच्या क्रियेवरून या ज्ञानाची प्रचिती व्हायला लागते.

वसंतऋतूचे आगमन झाले की, वृक्षवेली जशा बहरून येतात त्याप्रमाणे ज्ञानवान पुरुषाची इंद्रिये ज्ञानाचे अस्तित्व दाखवितात.

वेदान्तात 'ज्ञान' शब्दाचा अर्थ जाणणे, आकलन होणे एवढाच नसून, ईश्वरानुभव किंवा अद्वैतानुभव असा केला आहे.

जसे पेरलेले असेल तसेच ते उगवते. अंतःकरणात हे ज्ञानरूपी बीज पेरायचे असते. मग ''अंतरीचे धावे । स्वभावे बाहेरी'' या संत तुकारामांच्या उक्तीप्रमाणे आत प्रतिष्ठित झालेले ज्ञान बाहेर इंद्रियांद्वारे प्रकट व्हायला लागते.

भक्तीत बाह्यबदल करून इष्ट ते साध्य करता येत नाही. आंतरिक बदल झाल्याशिवाय बाहेरील बदलाला अर्थ नाही. ''अंतर्निष्ठ तितुके तरले । बहिर्निष्ठ ते बुडाले ।'' असे संत रामदास म्हणाले. आत डोकावून पाहणे, आपणच आपल्याला पाहणे हेच आत्मज्ञान आहे. आतील मन, बुद्धी, चित्त, अहंकार हे अंतःकरणचतुष्टय शुद्ध झाले की, ज्ञान प्राप्त व्हायला लागते. चित्तशुद्धी झाली की ज्ञान आलेच असे समजावे.

अशा ज्ञानासाठी योगी लोक पराकाष्ठा करतात. मुनीश्वर साधना करतात हे ज्ञान प्राप्त झाले की अज्ञान व अविद्या नष्ट होते. भक्त व भगवंत यांचे ऐक्य व्हायला लागते. हे ज्ञान इंद्रियांच्या बाह्यवृत्तींना आवरून धरते. मनाचे दारिद्र्य दूर करते व द्वैत नष्ट करते. या ज्ञानाच्या पोटी उन्मत्तपणा, अहंकार नसतो. याच्या प्रकाशाने बुद्धीला आत्मौपम्य दृष्टी प्राप्त होते. सर्व प्राणिमात्रांत भगवंताचे दर्शन व्हायला लागते.

देहात्मकता जाऊन आत्मभाव प्रकट व्हायला लागतो. अशा ज्ञानासारखी पवित्र वस्तू जगात दुसरी नाही.

पण अशा ज्ञानाचे निरूपण करता येत नाही. ते ज्ञान दाखविता येत नाही. हे ज्ञान जरी दाखविता आले नाही तरी त्याचा अनुभव मात्र घेता येईल. वृक्षाला मुळाशी पाणी घातले की त्याचे रूप वृक्षाच्या फांद्या व फुलवरून ध्यानात येते तसा ज्ञानी माणसाचा आचार दिसायला लागतो. ही विशिष्ट लक्षणे दिसू लागली की, ते ज्ञान असे समजावे.

संत-महात्म्यांचे दर्शन झाले की, त्यांच्या मुखकमलावरील अपार शांती, अखंड प्रसन्नता पाहून ते ज्ञानी आहेत हे सांगावे लागत नाही.

**दिनांक १० डिसेंबर**

**पूज्यता डोळा न देखावी । स्वकीर्ती कानी नायकावी ।**
**हा अमुका ऐसी नोहावी[1] । सेचि लोका[2] ।।१३.१८८।।**

*शब्दार्थ - १) आठवण न व्हावी २) लोकांना*

**अर्थ -** आपली पूज्यता आपण डोळ्यांनी पाहू नये. आपली कीर्ती आपण कानांनी ऐकू नये. हा एक अमुक मनुष्य आहे अशी आपली लोकांना आठवणच होऊ नये.

## ज्ञानी मनुष्याची लक्षणे : अवमानित्व

तेराव्या अध्यायाच्या ७ ते ११ श्लोकांत गीतेच्या आधाराने ६८० ओव्यांमध्ये ज्ञानेश्वरांनी १८ ज्ञानाची लक्षणे सांगितली आहेत. या विविध लक्षणांचा विस्तार करताना माऊलींनी आपल्या कवित्वाची, प्रतिभेची व संतत्वाची





साक्षच दिली आहे. हे उत्तुंग काव्यशैलीने सजलेले बहारदार वर्णन, मुळातूनच वाचण्यासारखे आहे. येथे फक्त अमानित्व, अहिंसा व आचार्योपासना या सातव्या श्लोकातील केवळ तीन लक्षणांचाच आढावा घेणार आहोत.

अमानित्व, दंभरहितता, अहिंसा, सर्वसहनशीलता, सरळपणा, सद्गुरुसेवा, शुद्धी, स्थैर्य, अंतःकरणनिग्रह ही नऊ लक्षणे सातव्या श्लोकात आली आहेत.

'अमानित्व'चा सामान्य अर्थ 'मानाची अपेक्षा ठेवू नका' हा आहे. मनुष्य मानाची अपेक्षा दोन कारणांमुळे ठेवतो. जगात जे दुसऱ्याजवळ नाही ते माझ्याजवळ आहे अशा कल्पनेने मानाची अपेक्षा करतो. ज्ञान, सत्ता, संपत्ती, प्रतिष्ठा, पद इत्यादी माझ्याजवळ आहे म्हणून मला मान द्या अशी त्याची अपेक्षा असते. दुसरे हे की, मी काही निर्मिती केली आहे, त्यात माझे कर्तृत्व आहे, तोच कर्तृत्वाभिमान माणसाला मान मागायला प्रवृत्त करतो. हा अहंकार, कर्तृत्वाभिमान व स्वामित्वाची भावना गेली की 'अवमानित्व' येते. ही भावना ज्यामुळे कमी होते ते ज्ञान.

'मी होतो म्हणून झाले', 'माझ्यामुळे संसार चालला आहे', 'मी नसतो तर हे झाले नसते...' अशी अनेक वाक्ये व्यवहारात सतत कानावर पडत असतात. प्रत्येक लहानसहान गोष्टीमध्ये आपला 'अहं' दडलेला असतो.

अमानित्व आले की नम्रता येते. मी माझ्या शक्तीमुळे हे करीत नसून, यात भगवंताची कृपा आहे हा बोध आल्यामुळे हातून घडलेले कर्तृत्व व त्याचे मिळालेले फळ हा भगवंताचा प्रसाद आहे अशी दृढ श्रद्धा निर्माण होते. अशी जाणीव आली की लोकेषणा राहत नाही. मानाचीच अभिलाषा असेल तर प्रभूस्पर्शाचा मान मिळविणे हाच खरा सन्मान. कोणत्याही मानाची अपेक्षा न करता सतत काम करणे हा खरा आध्यात्मिक विकास आहे. आपली पूज्यता, आपला सत्कार, आपली कीर्ती आपण पाहू नये व ऐकू नये हे खरे अमानित्व.

**दिनांक ११ डिसेंबर**

**एवं हिंसाचि अहिंसा । कर्मकांडी हा ऐसा ।**
**सिद्धान्तु सुमनसा[1] । वोळखे तू ।।१३.२३६।।**

*शब्दार्थ - १) प्रसन्न मनाच्या (अर्जुना)*

**अर्थ -** याप्रमाणे हे प्रसन्न मनाच्या अर्जुना, हिंसेलाच अहिंसा ठरविण्याचा हा असा कर्मकांडात सिद्धान्त आहे तो नीट समजून ठेव.

## ज्ञानाची लक्षणे : अहिंसा

अमानित्व, अदंभित्व अशा दोन लक्षणांचे वर्णन केल्यावर ज्ञानेश्वर अहिंसा या अत्यंत महत्त्वाच्या लक्षणांवर निरूपण करीत आहेत. इतर लोकांनी अहिंसेचा विपरीत अर्थ कसा केला याचेही ते दर्शन घडवितात.

त्यांनी केलेली अहिंसा हीच कशी हिंसा आहे याचे विवेचन करताना माऊलींनी मार्मिक दृष्टान्त दिले आहेत. झाडाच्या फांद्या तोडून त्यांचे कुंपण त्याच वृक्षाला करणे यात काय अर्थ आहे? घराचे वासे तोडून भूक कधी भागवावी का? देवाच्या वा देवळाच्या रक्षणासाठी संरक्षण भिंत देऊळ मोडून बांधावी का? प्राणीहिंसा करणारे अनेक यज्ञ सांगितले गेले आहेत. ज्ञानेश्वरांना ही हिंसा मान्य नाही.

हिंसा पेरली असता अहिंसा उगवेल काय? सर्व आयुर्वेदही याच धोरणाचा आहे. कारण की, एका जीवाचे रक्षण करण्याकरिता दुसऱ्या जीवाचा घात करावा असे तो प्रतिपादन करतो. या औषधयोजनेत पहिल्याप्रथम कित्येक झाडांचे कंद खणविले, कित्येकांना मुळासकट व पानासकट उपटविले. अशा अजातशत्रू झाडांना (रबरासाठी) त्यांच्या सर्वांगावर भेगा पाडून त्या वृक्षांचे जीव घेऊन त्यांना कोरडे केले.

ॐ

व्यवहारात लोकांना फसवून, लुटून जे द्रव्य मिळविले त्यातून अन्नसत्र घातले तर त्याचे पुण्यफळ मिळेल का? बैल विकून जसा गोठा बांधावा किंवा पोपटास हाकलून लावून जसा पिंजरा बांधावा, अशा कृतींना हसावे की त्यांना चेष्टा म्हणावयात?

कित्येकांनी धर्ममार्ग म्हणून पाणी गाळण्याला आरंभ केला. तेव्हा त्या गाळण्याच्या तापाने जीव मेले असे हे हिंसेलाच हिंसा ठरविण्याचे कृत्य आहे.

अहिंसा म्हणता म्हणताच लोक हिंसा कशी करतात याचे सूक्ष्म निरीक्षण माऊलींनी केले आहे. विविध प्रकारच्या कर्मकांडात हे असे हिंसात्मक प्रकार घडतात.

**दिनांक १२ डिसेंबर**

**एवं बाह्यमनोगत । श्रीगुरुसेवा समस्त ।**
**वेंटाळीन¹ वस्तुजात । होऊनिया ।।१३.४२९।।**

*शब्दार्थ - १) आटोपीन*

**अर्थ -** याप्रमाणे सर्व वस्तुमात्र मी होऊन, श्रीगुरूंची सर्वबाह्य सेवा मी व्यापीन, असे त्याचे मनोगत असते.

## ज्ञानाची लक्षणे : सद्गुरूंची उपासना

ज्ञानेश्वर आता आपल्या अत्यंत जिव्हाळ्याच्या विषयाकडे वळलेत. ''आचार्योपासनं'' या गीतेतील एका शब्दावर माऊलींनी हे निरूपण केले आहे. अतिशय भक्तीपूर्वक व हृदयापासून त्यांनी हे विवेचन केले आहे. ज्ञानेशांच्या नाथपंथामध्ये गुरूंचे स्थान सर्वांत मोठे आहे. गुरू हाच परमेश्वर त्यांनी मानला आहे.

ही गुरुसेवा सर्व भाग्यांची उत्पन्न होण्याची जमीन आहे व ही सेवा शोकग्रस्त जीवाला ब्रह्म करते. गुरूवरील प्रेमाने शिष्य आपले सर्वस्व गुरूला अर्पण करतो. ज्याप्रमाणे विरहिणीच्या चित्तात प्रियकर असतो, त्याप्रमाणे ज्या देशात गुरूचे घर असते तो देश त्याच्या मनामध्ये असतो. त्या दिशेकडून आलेल्या वाऱ्यालाही तो सामोरा जातो. सद्गुरूविषयींच्या प्रेमाने वेडा झाल्यामुळे त्याला त्या दिशेशीच बोलणे आवडते.

अंतःकरणात श्रीगुरुमूर्तीची प्रेमाने, ध्यानाने उपासना करतो. अंतःकरण शुद्ध करून तो आपल्या गुरूची प्राणप्रतिष्ठा तेथे करतो. ज्ञानाच्या आवारात असणाऱ्या आनंदाच्या देवळामध्ये, गुरुरूपी लिंगाला ध्यानरूपी अमृताचा अभिषेक करतो. एखाद्या वेळी आपल्या भावाच्या रूपाने गुरुला आई मानतो व मग आपण त्या आईच्या मांडीवर स्तनपानाच्या सुखाने लोळतो. चैतन्यरूपी झाडाच्या खाली गुरूला गाय कल्पून आपण तिच्या पाठीमागे असणारे वासरू होतो.

गुरूची सर्वबाह्य सेवा करण्याची तीव्र इच्छा भक्ताच्या मनात असते. गुरूंच्या सर्व वस्तू मीच होईन. गुरूंच्या स्नेहाच्या दृष्टीला मीच खाली पृथ्वी होईन. गुरूंचे राहते घर मी स्वतः होईन व त्यांच्या घरचा चाकर होऊन मीच चाकरी करेन. गुरूंचे आसन मी होईन, त्यांच्या अंगावर घालण्याचे अलंकार व नेसावयाचे वस्त्र आणि चंदनादि उपचार मीच होईन. श्रीगुरूंचे डोळे कृपादृष्टीने ज्या ज्या वस्तू पाहतील त्या त्या सर्व मीच होईन. याप्रमाणे सर्व वस्तुमात्र मी होऊन श्रीगुरूंची सर्वबाह्य सेवा मी व्यापीन. गुरुसेवेच्या या माहात्म्याचे हे बहारदार वर्णन आहे.

**दिनांक १३ व १४ डिसेंबर**

**जो सर्व भूतांचा ठायी । द्वेषाते नेणेचि कहीं¹ ।**
**आपपरु नाही । चैतन्या जैसा ।।१२.१४४।।**



ॐ

**वार्षियेवीण² सागरु । जैसा जळे नित्य निर्भरु³ ।**
**तैसा निरुपचारु⁴ । संतोषी जो ।।१२.१५१।।**

*शब्दार्थ - १) कधी २) वर्षाकाळावाचून ३) पूर्ण भरलेला ४) बाह्य उपचाराशिवाय*

**अर्थ -** सर्वव्यापी चैतन्याला ज्याप्रमाणे आपला व परकेपणाचा भाव कोठेच नसतो, त्याप्रमाणे त्याला लोकांविषयी आपला व परकेपणा राहिला नाही, म्हणून तो कोणत्याही प्राण्याचा द्वेष करण्याची गोष्ट जाणत नाही ।।१२.१४४।

वर्षाऋतूशिवाय जसा समुद्र पाण्याने नेहमी पूर्ण भरलेला असतो, तसा जो बाह्य उपचाराशिवाय संतोषाने नेहमी पूर्ण भरलेला असतो. ।।१२.१५१।।

गीतेच्या बाराव्या अध्यायात भक्तियोगाचे वर्णन करताना भगवान श्रीकृष्णांनी १३ ते २० या श्लोकांमध्ये अर्जुनाला ज्ञानी भक्ताची ३६ लक्षणे सांगितली आहेत. ज्ञानेश्वरांचे या श्लोकांवरील निरूपण अत्यंत रसाळ, बहारदार झाले आहे. तेराव्या अध्यायातील ज्ञानाच्या लक्षणांपैकी तीन लक्षणे आपण पाहिली. आता बाराव्या अध्यायातील ज्ञानी भक्ताच्या लक्षणांपैकी केवळ दोन लक्षणांचा विचार येथे आपण करणार आहोत. ही ३६ गुणांची ज्ञानी भक्ताची कुंडली आहे. हे आध्यात्मिक लग्न आहे. मधुराभक्तीमध्ये भगवंताला पती, प्रियकर मानून भक्त उपासना करतो. या पती-पत्नीच्या लग्नामध्ये ही ३६ गुणांची कुंडली मांडली आहे. जेवढे जास्त गुण जमतील तेवढा तो भक्त श्रेष्ठ व हे लग्न तेवढे यशस्वी.

''अद्वेष्टा सर्वभूतानां.....'' पासून अनिकेतः स्थिरमतिः भक्तिमान् मे प्रियो नरः'' येथपर्यंत या लक्षणांचे वर्णन आहे. माऊलींनी या लक्षणांवर १४४ ते २२९ या ओव्यांमध्ये माधुर्यपूर्ण भाष्य केले आहे.

यातील एक गुण जरी सर्वार्थाने जीवनात आला तरी आपल्या जन्माचे सार्थक होईल. तत्त्वज्ञान हे जगायचे असते. भक्ती म्हणजे वृत्ती. हे गुण जर आचरणात आले तरच भक्तीला सुगंध प्राप्त होतो. नाहीतर ते कर्मकांडच ठरते.

हे वैश्विक गुण आहेत. जगाच्या पाठीवर कोठेही राहणाऱ्या मनुष्याने हे गुण आत्मसात केले तर त्याला शांती, सुख, समाधान, तृप्ती, प्रसन्नता हे निश्चित मिळेल.

'अद्वेष्टा' हा पहिला गुण! सर्व प्राणिमात्रांच्या बाबतीत ज्याच्या मनात वैर नाही, ईर्ष्या, द्वेष, मत्सर नाही व सर्वांवर निःस्वार्थ प्रेम करतो तो भगवंताला आवडतो. ईश्वर जसा भेदभाव न करता जगावर निःस्वार्थ प्रेम करतो तसे हे प्रेम असले पाहिजे. 'अद्वेष्टा' ही ज्ञानी भक्ताची पहिली ओळख आहे. ज्ञानेश्वर व त्यांच्या भावंडांचा समाजाने अनन्वित छळ केला पण त्यांनी कोणाचाही द्वेष केला नाही. संत तुकारामांनाही असाच छळ भोगावा लागला, गाढवावरून धिंडसुद्धा काढली, पण त्यांनी कोठेही, कसलाही वैरभाव ठेवला नाही. ईर्ष्या माणसाला सतत जाळत असते. वैरभाव, मत्सर करणाऱ्यांच्या मनात अशांतीने घर केलेले असते. दुसऱ्याच्या दुःखात एक वेळ दुःख मानता येते पण दुसऱ्याच्या सुखाने जेव्हा सुख वाटते तेव्हा तो द्वेषरहित झाला असे समजावे. माणूस ज्याचा द्वेष करतो, त्याचेच सदैव चिंतन करतो मग बुद्धीत भक्तीचा विषय कसा राहणार?

दुसरा गुण संतुष्टता! भक्ती दृढ झाल्याशिवाय व ज्ञानाने सुख-दुःख समजून घेतल्याशिवाय संतुष्टता येत नाही. प्रपंचात सुख नेमके कशात आहे याचे ज्ञान झाले पाहिजे. ''भोगान् भुक्ता वयमेव भुक्ता..... तृष्णा न जीर्णाः वयमेव जीर्णाः ।।'' या शब्दांत मनुष्याच्या जीवनाचे दर्शन घडविले आहे. आपण भोग भोगत नाही तर भोगच आपल्याला भोगत असतात. माणसाची तृष्णा, हे हवे, हे नको, हे कधीच संपत नाही. मनुष्य मात्र संपत असतो.

प्रपंचात वस्तूंची गोळाबेरीज आपण सतत करीत असतो. धन, घर यासाठी आयुष्य वेचत असतो, पण संतुष्टता, प्रसन्नता, शांती, सुख, समाधान यापासून आपण दूरच असतो.

ॐ

वस्तू माणसाला सतत सुख देत नाहीत. वस्तुनिष्ठ सुख अल्पकाळ टिकणारे असते. म्हणून ज्याचा काम, हव्यास, तृष्णा संपते तेथे संतुष्टता यायला लागते. आत्मसुख वस्तूवर नव्हे तर वृत्तीवर अवलंबून असते. सुखाचा, संतुष्टतेचा झरा अंतःकरणातच असतो.

**दिनांक १५ व १६ डिसेंबर**

**घाली विद्येचा पसारा । सूये सुकृताचा डांगोरा ।**
**करी तेतुले मोहरा । स्फीतीचिया[1] ।।१३.६५९।।**
**आंगा वरिवरी[2] चर्चीं । जनाते अभ्यर्चिता वंची ।**
**तो जाण पां अज्ञानाची । खाणी एथ[3] ।।१३.६६०।।**

*शब्दार्थ - १) प्रतिष्ठेसाठी २) वरवर ३) या जगात*

**अर्थ** - विद्येचा पसारा घालतो, केलेल्या पुण्यकर्माची दवंडी पिटतो आणि जेवढे म्हणून काही करतो तेवढ्याचा मोर्चा कीर्तीकडे असतो. ।।१३.६५९।।

स्वतःच्या अंगाला भस्म, गंध वगैरे लोकांना दिसेल अशा तऱ्हेने फासतो व लोक याची पूज्य म्हणून पूजा करीत असता, हा त्यास फसवीत राहतो; तो अज्ञानाची खाण आहे असे समज. ।।१३.६६०।।

## अज्ञानाची लक्षणे

ज्ञान झाल्यावर अज्ञानही सहज जाणता येते. कारण की, जे ज्ञान नाही ते आपोआप अज्ञानाच आहे. जसा दिवस संपला की रात्र आहेच तसे जेथे ज्ञान नाही ते अज्ञान समज, असे भगवंत अर्जुनाला सांगतात.

असे असले तरी अज्ञानाची लक्षणे ज्ञानेश्वरांनी सांगितली आहेत. ज्ञानाची आधी १८ लक्षणे सांगितली. ही सांगून झाल्यावर म्हटले की, या ज्ञानाविरुद्ध जे काही आहे ते अज्ञान. तरीसुद्धा अज्ञानाचे वर्णन माऊलींनी केले आहे. माऊलींचे समाजातील अनिष्ट प्रथाविषयी असलेले सूक्ष्म निरीक्षण, अंधश्रद्धेविषयी प्रखर व परखड मते, मनुष्य स्वभावाचे तंतोतंत दर्शन याचे दर्शन या ओव्यांतून घडते.

अज्ञानी मनुष्य मानाची, सत्काराची, प्रशंसेची वाट पाहतो. गर्वाने, कर्तृत्वाने त्याला मद येतो. केलेल्या पुण्यकर्माचे फळ तत्काळ मिळवितो.

अरण्यात वणवा लागला म्हणजे ज्याप्रमाणे सर्व जीव जळून जातात त्याप्रमाणे त्याच्या वागण्याने सर्व जगास दुःख होते. त्याचे सहज बोलणे भाल्यासारखे तीक्ष्ण असते. इतरांच्या जिव्हारी लागते. भाता जसा फुंकल्याने फुगतो व वारा सोडल्याने रिकामा होतो त्याप्रमाणे त्याची अवस्था असते. लाभाने हुरळून जातो व हानी झाली की होरपळून जातो. यश आले की कर्तृत्वाची दवंडी पिटवतो व अपयश आले की, खचून जातो. स्तुतीच्या वेळी आनंदाच्या उकळ्या फुटतात व निंदा झाली की, दारुण नैराश्येच्या खोल गर्तेत गटांगळ्या खातो.

चिखल जसा पाण्याच्या एका थेंबाने विरघळतो व थोड्याशा वाऱ्याने वाळतो, त्याप्रमाणे मानाने व अपमानाने याची स्थिती होते. त्याला विकाराचा वेग सहन हात नाही. त्याचे बोलणे-चालणे वरून सरळ असले तरी तो इतरांना फसवत असतो. पारधी जनावरांना आमिष दाखवून जसे जाळ्यात फसवत असतो तसे याचे वागणे असते.

हा अज्ञानी मनुष्य गुरुभक्तीला कंटाळतो. विद्या शिकून झाल्यावर तो गुरूवरच उलटतो. असा पुरुष शारीरिक श्रमाच्या बाबतीत आळशी व उदासीन असतो. स्त्रीसंगाविषयी व द्रव्यप्राप्तीविषयी तो कसलाच विधिनिषेध बाळगत नाही. थोड्याशा स्वार्थासाठी तो निश्चयापासून ढळतो. माकडाप्रमाणे त्याचे मन सदैव चचल असते. स्वधर्माला तो



ॐ

लाथेने झुगारतो तर निषिद्ध कर्मे करण्यात मागे-पुढे पाहत नाही. तो पुण्याला आश्रय देत नाही व पापाला कधी सोडत नाही. विषयांचे प्रेम त्याला सोडत नाही किंवा त्यापासून सावधही होत नाही.म्हणून तो विषयाच्या जळत्या अग्नीत उडी घालतो व आपले वागणे हे भूषण आहे असे मानतो.

त्याची प्रत्येक कृती ही लोकेषणानी भरलेली असते. केलेल्या पुण्यकर्माचा डांगोरा पिटवून केवळ प्रतिष्ठा, कीर्ती मिळविण्याकडे त्याचा कल असतो. थोड्याशा पुण्यकर्मांनी थोर साधू-संतांचा आव आणतो. अंगाला भस्म, गंध लावून लोकांच्या डोळ्यात धूळ फेकतो. लोकांच्या श्रद्धेचा गैरफायदा घेऊन स्वतःला पूज्य समजून घेतो. हे सर्व अवडंबर करून तो केवळ लोकांना फसवत असतो. अशी सर्व लक्षणे जेथे असतात ते अज्ञान होय.

।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।

## प्रकरण चौथे
# अष्टांगयोगसाधना

सहाव्या अध्यायाच्या सुरुवातीलाच ज्ञानेश्वरांनी अत्यंत सूक्ष्मार्थरूप ब्रह्माचा, अंतःकरणात बोध उत्पन्न होईल अशा कोमल व अनुभूतीपूर्ण शब्दांनी योगाचे निरूपण करण्याची प्रतिज्ञा केली आहे.

कारण हा अध्याय म्हणजे जीवाचे मूळस्वरूप जे ब्रह्म, त्याचा प्रत्यक्ष साक्षात्कार करून घेण्याचा मार्ग होय.

जीवाचे मूळ स्वरूप अद्वैत सच्चिदानंदस्वरूप आहे. पण जीवाने अज्ञान व अविद्येने आपली ही मूळची स्थिती नाहीशी केली आहे. त्यानेच या सच्चिदानंद रूपाहून आपल्या निराळेपणाची कल्पना केली. अहंकार व देहात्मिकता यामुळे तो आपले स्वस्वरूप विसरला. जीवाला जे दुःख प्राप्त झाले त्याला तोच जबाबदार आहे. कोळी जसा स्वतःच निर्माण केलेल्या कोशात स्वतःच बद्ध होतो त्याप्रमाणे आपल्याच अज्ञानाने जीवाने आपल्याला बद्ध करून घेतले आहे.

अनंत जन्मातील संस्कारांची, वासनांची पुटे, दृढ झाल्यामुळे या विपरीत कल्पना लवकर सुटत नाहीत.

म्हणून योगाभ्यासाने आपल्या मूळ स्वरूपाचा प्रत्यय आल्यावर ती अविद्या, अज्ञान, विपरीत कल्पना दूर होते. एकदा असा आत्मस्वरूपाचा प्रत्यय आला की, त्या योग्याला सर्वत्र आत्मस्वरूपच दिसते. सर्वत्र एक सच्चिदानंद परमात्माच आहे याची अनुभूती येते.

योगप्रक्रियेच्या साहाय्याने कुंडलिनी शक्ती कशी जागृत होते, याचेही वर्णन ज्ञानेश्वरांनी केले आहे. माऊलींनी हा सर्व विषय अनुभूतीने व गुरुकृपेने अत्यंत काव्यात्म पद्धतीने व सूक्ष्मतेने मांडला आहे. तसा हा विषय इतरत्र आढळणार नाही.

गीतेत योगशास्त्र आहे पण कुंडलिनी योग ही केवळ नाथपंथाची व श्री ज्ञानेश्वरांची देणगी आहे. त्यामुळे माऊलींनी हा विषय अत्यंत आत्मीयतेने मांडला आहे.

पुढील १६ सारभूत ओव्यांत ही अष्टांगयोगसाधना स्पष्ट केली आहे.

**दिनांक १७ डिसेंबर**

**जयाचे नांव तीर्थरावो[1] । दर्शने प्रशस्तीसि[2] ठावो ।**
**जयाचेनि संगे ब्रह्मभावो । भ्रांतासही ।।६.१०२।।**

*शब्दार्थ - १) तीर्थांचा राजा २) पूज्यतेला*

**अर्थ -** ज्याचे नाव तीर्थराज आहे व ज्याचे दर्शन झाले असता समाधान होते व ज्याच्या संगतीने भ्रमलेल्यास ब्रह्मता मिळते.

## योगी पुरुषाची लक्षणे

जो योगनिष्णात अखंड परिपूर्ण झाला त्याची चिन्हे ज्ञानेश्वर सांगत आहेत. विषयांच्या ठिकाणी आणि कर्माच्या ठिकाणी जो आसक्त होत नाही व ज्याचे सर्व संकल्प सुटलेले असतात तेव्हा त्या योग्याला योगारूढ म्हणतात.





''एके संन्यासी तो योगी...'' अशी त्या योग्याची व्याख्या करून त्यांनी ही लक्षणे सांगितली आहेत. जो कर्मे करून कर्मफलाची अपेक्षा ठेवत नाही असा निष्काम कर्मयोगीसुद्धा योगीच आहे हेही आधी त्यांनी सांगितले.

ज्याला योगरूपी पर्वताच्या शिखरावर जायचे आहे त्याने कर्ममार्गरूपी अष्टांगयमनियम चुकवू नयेत.

**तया स्वान्तःकरणजिता । सकळकामोपशांता ।**
**परमात्मा परौता । दुरी नाही ।।६.८१।।**

''अशा त्या पुरुषाने आपले अंतःकरण जिंकल्यामुळे व त्याच्या इच्छा (काम) निवृत्त झाल्यामुळे त्याला परमात्मा कोठे लांब नाही,'' या एकाच ओवीत ज्ञानेशांनी योगी पुरुषाचे वर्णन केले आहे. ज्याने मन जिंकले आहे, जो निरीच्छ झाल्यामुळे शांत आहे. ज्याप्रमाणे हिणकस सोन्यातून मिसळलेल्या धातूचा दोष निघाला की ते शंभर नंबरी सोने होते, त्याप्रमाणे अहंकारनाश झाला की त्या जीवाला ब्रह्मत्व ठेवलेलेच आहे.

ज्याचा हा मिथ्या देहाहंकार कारणासह नाहीसा झाला आहे, तो मूळचाच सर्वत्र भरलेला परमात्माच आहे. तो मान-अपमान, सुख-दुःख, शीत-उष्ण अशा सर्व द्वंद्वांच्या पलीकडे जातो. सर्वत्र समबुद्धीने व आत्मौपम्य भावनेने पाहतो.

असा योगारूढ पुरुष सर्व पवित्र वस्तूंचा राजा बनतो. त्याचे दर्शन झाले असता पूज्य बुद्धी निर्माण होते. अशा पुरुषांच्या संगतीने मोहग्रस्त झालेल्या भ्रान्त लोकांनासुद्धा आत्मबोध होतो.

**दिनांक १८ डिसेंबर**

**तो जितेंद्रियु[1] सहजे । तोचि योगयुक्तु म्हणिजे ।**
**जेणे साने[2] थोर नेणिजे । कवणे काळी ।।६.९१।।**

*शब्दार्थ - १) इंद्रिये स्वाधीन ठेवणारा २) लहान*

**अर्थ -** तो सहजच जितेंद्रिय आहे आणि त्यालाच योगयुक्त म्हणावे व त्याला लहान-थोर असा भेद कोणत्याच वेळेला प्रतीत होत नाही.

## इंद्रिये ज्याच्या अधीन आहेत तोच योगयुक्त

योगयुक्ताची लक्षणे सांगताना माऊलींनी त्याचे चित्रच उभे केले आहे. सूर्य जेथे जाईल तेथे प्रकाश नेतो त्याप्रमाणे हा योगयुक्त पुरुष जे पाहील त्याच्याशी एकरूप होतो. लहान-थोर असा दुजाभाव त्याच्या मनात राहत नाही. सोन्याचा डोंगर अथवा मातीचे ढेकूळ तो सारखेच मानतो. मित्र, शत्रू, आपला, परका असा भेदभाव त्याच्या मनात राहत नाही. मीच सर्व आहे अशा भावनेने व समदृष्टीने तो सर्वत्र पाहतो. 'विश्व होऊनी । विचरे विश्वामाजी।।' याप्रमाणे सर्वत्र परमात्म्याचे दर्शन त्याला होते.

अशा योग्याने आपली सर्व इंद्रिये जिंकलेली असतात. त्यामुळे तो देहधारी असूनसुद्धा परब्रह्माच्या बरोबरीची योग्यता त्याला येते. मीच सारे विश्व आहे अशी प्रतीती ज्याला आलेली असते त्याला हा हितचिंतक, मित्र, शत्रू, अप्रिय, नातलग, सज्जन, पापी असा काहीही भेदभाव राहिलेला नसतो.

वस्त्राच्या आत पाहिले तर त्या वस्त्रामध्ये जिकडे तिकडे तंतूंचीच रचना दिसते. तरीही पण त्या वस्त्रात एका सुतावाचून दुसरी गोष्टच नसते. तसे साऱ्या विश्वात त्याला त्या परमात्म्यावाचून दुसरे काही दिसत नाही. अशी समबुद्धी प्राप्त झाल्यामुळे कोण मित्र व कोण शत्रू... सर्वच त्याला सारखे. त्याच्या बोलण्याने पावित्र्य, नीती, धर्म यांची प्रतिष्ठापना होते.

ॐ

अशा जितेंद्रिय पुरुषांच्या सत्संगतीत लोकांना प्रसन्नता, शांती प्राप्त होते. वाट चुकलेल्या भ्रान्त पुरुषांना श्रेयाचा मार्ग सापडतो. त्याची कृपा होणे म्हणजेच भगवंताचा प्रसाद मिळाल्यासारखे असते.

**दिनांक १९ डिसेंबर**

**तेथ प्रवृत्तितरुच्या[1] बुडी । दिसती निवृत्तिफळाचिया[2] कोडी[3] ।**
**जिये मार्गीचा कापडी[4] । महेशु[5] आझुनी ।।६.१५३।।**

*शब्दार्थ - १) संसार वृक्षाखाली २) मोक्षफळाच्या ३) कोटी ४) यात्रेकरू ५) शंकर*

**अर्थ** - या मार्गामध्ये प्रवृत्तीरूप झाडाच्या बुडालाच निवृत्तीरूप कोट्यवधी फळे दिसत आहेत (म्हणजे ज्या मार्गाचे आचरण करावयास लागले असता मोक्षरूपी फळ मिळते) व या मार्गाचे श्री शंकर अद्यापपर्यंत यात्रेकरू आहेत.

## योगमार्गाने मोक्षत्वाची प्राप्ती

हा योगमार्ग म्हणजे कर्मप्रवृत्तीपर एक वृक्षच आहे. पण याच्या बुडाशी मात कर्मनिवृत्तीपर असंख्य फळे आहेत. भगवान शंकर या मार्गाने अजून प्रवास करीत आहेत. आत्मप्राप्तीकरता केलेला योगाभ्यास हे कर्माचरणच आहे खरे, पण शेवटी अभ्यास पूर्ण होऊन जेव्हा जीव-ब्रह्मैक्य होते तेव्हा योग्याला, ''माझे ठिकाणी कर्म नाही व कर्माचे कर्तृत्वही नाही, मी केवळ सच्चिदानंदस्वरूप आहे,'' असा अनुभव येतो. या अनुभवाने सर्व कर्माची व कर्तृत्वाची निवृत्ती होते.

अर्जुनाचे पुण्य एवढे होते की, भगवंताचे प्रेम संपादन करण्यासाठी त्याला विशेष प्रयास करावे लागले नाहीत. श्रीकृष्णाने अर्जुनाची स्तुती केली. ती ऐकून अर्जुन नम्रतेने म्हणाला, ''तुम्ही वर्णन केलेली लक्षणे माझ्या अंगी नाहीत. पण इतके मात्र खरे की, आपल्या उपदेशाने ही लक्षणे मी अंगी बाणवण्याचा प्रयत्न मात्र करीन. अर्जुन व कृष्ण दोघेही एकमेकांच्या प्रेमाने ओथंबून गेले आहेत. श्रीकृष्णांना अर्जुनाबद्दलचा विश्वास वाढला व त्यांना वाटले की, आता हा योगमार्ग सांगण्यास हरकत नाही. आता योगमार्गाचा उपदेश केला तर तो निष्फळ ठरणार नाही. म्हणून भगवंतांनी हा योगमार्ग सांगावयास प्रारंभ केला. हा योगमार्ग कसा आहे?

वरील ओवीत माऊली म्हणतात त्याप्रमाणे हा योगमार्गाचा प्रवास करताना प्रमुख पथिक म्हणून शिवशंकराचा उल्लेख करावा लागेल. आदिनाथ शंकर हे नाथसंप्रदायाचे आद्यस्थान आहे.

**दिनांक २० डिसेंबर**

**परि आवश्यक पांडवा । ऐसा ठावो जोडावा ।**
**तेथ निगूढ[1] मठ होआवा । का[2] शिवालय ।।१६.१७९।।**
**म्हणोनि तैसे ते जाणावे । मन राहते[3] पाहावे ।**
**राहेल तेथ रचावे[4] । आसन ऐसे ।।१६.१८१।।**

*शब्दार्थ - १) गुप्तस्थान, दृष्टीस न पडणारा २) अथवा ३) मन स्थिर होईल असे स्थळ ४) घालावे*

**अर्थ** - परंतु अर्जुना, असले स्थान जरूर शोधून ठेवावे. त्या ठिकाणी सहज दृष्टीस न पडणारा एखादा मठ अथवा शंकराचे देऊळ असावे. ।।१६.१७९।।

म्हणून ते स्थान, तसे आहे की नाही, हे समजून घ्यावे. आपले मन तेथे स्थिर राहते की नाही, हे पाहावे आणि राहत असेल तेथे असे आसन लावावे. ।।१६.१८१।।



ॐ

## एकांतस्थळी स्थिर मनाने आसन लावावे

११ व्या श्लोकापासून भगवंत योगशास्त्राचे विवेचन करीत आहेत. ज्ञानेश्वरांचा हा विषय अतिशय जिव्हाळ्याचा असल्याने त्यांनी याचा विस्तार खूप केला आहे. ज्ञानेश्वरांचा संप्रदाय हा शिपोपासक नाथपंथ. या नाथपंथात योगमार्गाला अतिशय महत्त्व असून, ज्ञानेश्वर स्वतः अनुभूतीसंपन्न योगी असल्यामुळे त्यांनी यातील सूक्ष्म बारकावे विशद केले आहेत.

योगमार्गाचे अनुष्ठान करून अनुभव घेतला तरच त्याची फळे मिळतात. याकरिता या अभ्यासाला योग्य असे ठिकाण पाहणे जरूर आहे. ज्या ठिकाणी संतांनी वास्तव्य केले आहे, अशा रम्य व एकांत स्थळाची निवड करावी. ज्या ठिकाणावरून सहजगत्या गेले असता नास्तिकालादेखील तपश्चर्या करावी असे वाटावे. विषयासक्त मनुष्यालासुद्धा विषयापासून दूर राहावे असे वाटावे. अशा ठिकाणी पूर्वी साधकांनी साधना केलेली असावी.

अशा ठिकाणी पवित्र पाण्याचे झरे असावेत, मधुर फळांची झाडे असावीत, वारा शांत, मंद वाहावा, ऊनदेखील सौम्य असावे, पोपट, भुंगे नसावेत. पण हंस, चक्रवाक, कोकिळा व मधूनमधून येऊन जाणारे मोरही चालतील.

अशा निःस्तब्ध, निवांत ठिकाणी कोणालाही सहज दृष्टीस न पडणारा एखादा मठ किंवा शंकराचे देऊळ असावे.

अशा ठिकाणी एकांतात बसावे व मन स्थिर होते की नाही हे पाहावे. मन स्थिर होत असेल तर आसन लावावे.

या राजयोगाचा मार्ग एकदा दिसला की, मनुष्याला तहान, भूक याचेही भान राहत नाही. जेथे पाऊल पडते तेथे मोक्षाची खाणच उघडते.

**दिनांक २१ डिसेंबर**

**विषयांचा विसरु पडे । इंद्रियांची कसमस[1] मोडे ।**
**मनाची घडी घडे । हृदयामाजी ।।६.१८८।।**

*शब्दार्थ - १) घालमेल*

**अर्थ** - त्याला विषयांचा विसर पडतो, त्याच्या इंद्रियांची घालमेल संपते व अंतःकरणाच्या ठिकाणी मनाची स्थिरता होते.

ज्ञानेश्वरांनी आसन कसे असावे याचेही सूक्ष्म वर्णन केले आहे. तळास साग्र दर्भ घालून त्यावर शुद्ध कृष्णाजिन घालून, त्यावर धुतलेल्या वस्त्राची घडी घालावी. दर्भ कोवळे असावे, आसन फार उंच किंवा अधिक सखल असू नये.

अशा आसनावर मन एकाग्र करून बसावे. चित्त व इंद्रियांचे नियमन करून, अंतःकरणात सद्गुरूंचे स्मरण करावे. यामुळे आपला अहंकार नष्ट होऊन मनात सात्त्विक भाव जागे होतात.

हळूहळू साधकाला विषयांचा विसर पडायला लागतो. इंद्रियांची धावपळ, चांचल्य व घालमेल थांबते. या वेळी अंतःकरणाच्या ठिकाणी मनाची स्थिरता प्राप्त होते. अशा ऐक्यबोधाने आसनावर स्थिर बसावे.

यानंतर मूळ बंध कसा लावावा याचे वर्णन माऊलींनी केले आहे. यालाच वज्रासन असे दुसरे नाव आहे. यापुढे 'जालंद बंधा'चे वर्णन आहे.

या वेळी मनाची चंचलता थांबते, बाह्य विषयाकडे असणारी धाव थांबते व सहजच शरीर व मन शांत होते. भूक, झोप याची आठवणदेखील राहत नाही.

ॐ

दिनांक २२ डिसेंबर

**नागिणीचे पिले[1] । कुंकुमे नाहले[2] ।**
**वळण[3] घेऊनि आले । सेजे[4] जैसे ।।६.२२२।।**

*शब्दार्थ - १) पिल्लू २) न्हाले ३) वेटाळे, वळसा ४) अंथरुणावर*

**अर्थ** - केशराने न्हालेले नागाचे पिलू वेढे घेऊन जसे निजावे.

## कुंडलिनीरूप नागिणीचे वर्णन

गीतेत योगशास्त्राचे वर्णन आहे पण कुंडलिनीयोग ही केवळ नाथपंथीयांची देन आहे. त्यामुळेच ज्ञानेश्वरांनी त्याचे सूक्ष्म व अनुभूतीपूर्ण वर्णन केले आहे. कुंडलिनी ही एक दैवीशक्ती मानली गेली आहे.

आपल्या शरीरात मानल्या गेलेल्या सहा चक्रांचे भेदन करून ती शक्ती ऊर्ध्वगामी सरकत राहते.

मुळात ती मुळाधारचक्रात नागिणीप्रमाणे वेढे घालून सुस्त पडलेली असते. तिचा वेग मस्तकातील सहस्त्रार चक्राकडे वळतो. यौगिक प्रक्रियेमुळे ही शक्ती कार्यरत होते. या चक्रातील अमृतबिंदू प्राशन केला की, तिची आणि योग्याची तृप्ती होते.

या जागृत झालेल्या कुंडलिनी शक्तीचे वर्णन ज्ञानेश्वर करीत आहेत. नागिणीचे पिलू वेढे घेऊन जसे निजावे त्याप्रमाणे नेमकी साडेतीन वेढ्यांची ती कुंडलिनीरूपी नागीण खाली तोंड करून निजलेली असते.

त्याप्रमाणे व्यवस्थितपणे आकुंचित असलेली व नाभीजवळच्या संकुचित जागेत ती वज्रासनाने दाटून बसलेली चिमटल्यामुळे जागी होते. अग्निज्वाळांची ही वळीच वाटते किंवा चांगली घोटलेली सोन्याची लगड दिसते.

पुष्कळ दिवसांची भूक तिची साठलेली असते. तशात तिला डिवचून जागे केलेले असते. म्हणून ती आपले तोंड आवेशाने उघडून सरळ वर झपाट्याने निघते.

मस्तकातील सहस्रकमळदलातील अमृतबिंदू प्राशन केल्यावर योगी व ती दोघेही तृप्त होतात. ते योग्याचे शरीर आनंदरूपी चित्राचा रंग अथवा ब्रह्मसुखाची प्रत्यक्ष मूर्तीच वाटते. तो योगी म्हणजे आसनावर बसलेले मूर्तिमंत तेजच वाटते. अशा तेजाला पाहून यमसुद्धा कचरतो. अशा योग्याच्या धैर्याला तोड नाही. त्या योग्याचा देह सोन्यासारख्या कांतीचा होतो. त्याला वायूसारखा हलकेपणा येतो.

मग तो समुद्राच्या पलीकडचे पाहतो. स्वर्गातील विचार ऐकतो व मुंगीच्या मनातील भाव ओळखतो. अनेक सिद्धी त्यास प्रसंगानुरूप प्राप्त होतात.

दिनांक २३ डिसेंबर

**ते कुंडलिनी जगदंबा[1] । जे चैतन्यचक्रवर्तीची[2] शोभा ।**
**जिया विश्वबीजाचिया[4] कोंभा[3] । साउली केली ।।६.२७२।।**

*शब्दार्थ - १) जगाची माता २) चैतन्यरूपी ईश्वराची ३) अंकुर ४) जगद्बीज, ॐकार*

**अर्थ** - जी कुंडलिनी जगाची आई आहे, ब्रह्मरूपी सार्वभौमाची शोभा आहे व जिने विश्वाच्या बीजाच्या कोंभाला सावली केली आहे.

## कुंडलिनी शक्ती ही जगाची आई आहे

योगप्रक्रियेच्या साहाय्याने ही कुंडलिनी शक्ती जागृत कशी होते याचे काव्यात्मक वर्णन ज्ञानेश्वरांनी केले आहे.



ॐ

ज्ञानेश्वर स्वतः योगी असल्याने व नाथपंथीयांचा वारसा मिळाल्याने अनुभूतीने केलेले हे वर्णन आहे. कुंडलिनीजागृतीचा हा स्वानुभव असल्याने हे वर्णन रसरशीत झाले आहे. असे वर्णन ऐकून मात्र कुंडलिनी जागृत करण्याचा प्रयत्न करू नये.

ही योगप्रक्रिया सिद्धहस्त गुरूकडून शिकून करावी. आजही अनेक ठिकाणी केवळ स्पर्शाने ही शक्ती जागृत करण्याचे जाहीर केले जाते. हा विषय ज्याच्या त्याच्या अनुभवाचा असल्याने त्यावर भाष्य करणे व्यर्थ आहे.

ही शक्ती निराकार परमात्म्याचे चिन्ह दाखविणारी पिंडी आहे. जी परब्रह्म शीवाची संबळी व जी प्राणाची उघडउघड जन्मभूमी आहे. ही शक्ती अत्यंत तेजस्वी असून तिच्या जागृतीमुळे योग्याच्या शरीरात खूप बदल व्हायला लागतात.

हृदयकमळापर्यंत जणू काय सोन्याची सरी अथवा प्रकाशरूप जलाचा झरा जसा काही वाहत आला आहे अशी ती दिसते. मग तो प्रकाशाचा झरा जसा हृदयाच्या पोकळ भूमीत एकदम जिरावा, त्याप्रमाणे शक्तीचे रूप शक्तीमध्येच मावळते.

अशा कुंडलिनीचे तेज जेव्हा लय पावते तेव्हा देहाचा आकार नाहीसा होतो. वास्तविक तो देह पूर्वीप्रमाणेच सावयव असतो परंतु तो देह जसा वायूचाच बनविलेला असावा असा होतो.

भगवंतांनी असे हे अष्टांगयोगरूपी साधन सांगितले. योगाभ्यासाने अंतःकरणशुद्धी झाल्यावर असा योगी ईश्वररूप होतो. या साधनेने ब्रह्मप्राप्ती होते. असा योग योग्यतेशिवाय मात्र प्राप्त होत नाही.

दिनांक २४ डिसेंबर

**म्हणोनि अतिशये विषय सेवावा । तैसा विरोध न व्हावा ।**
**का सर्वथा निरोधू[1] करावा । हेही नको ।।६.३४८।।**

*शब्दार्थ - १) पूर्ण बंद करणे*

**अर्थ** - म्हणून विषयांचे अतिसेवन करावे अशी विरोधी बुद्धी नसावी किंवा वाजवीपेक्षा फाजील नियमन करणे हेही कामाचे नाही.

## योगी होण्यासाठी योग्यतेची गरज

भगवंताचे योगाबद्दलचे सर्व वर्णन ऐकून अर्जुनाच्या मनात एक रास्त शंका उद्भवली. या योगस्थितीस अनुभवण्यासाठी आपली योग्यता आहे की नाही असे त्यास वाटले. नसेल तर ती कशी प्राप्त करावी असे अर्जुनाला वाटले. योगाविषयीचे सर्व विचार त्याला पटले पण ही योगसाधना फक्त एखाद्यालाच जमेल की सर्वांना याचे उत्तर अर्जुनाला हवे होते.

यावर भगवंतांनी उत्तर दिले की, एखादे सामान्य कर्म करतानासुद्धा कर्त्याला काही विशेष पात्रता लागते. मग योगसाधनेसाठी ही पात्रता आवश्यक नाही का? असे म्हणून भगवंतांनी योगी होण्यासाठी लागणाऱ्या गुणांचे वर्णन करावयास १६ व्या श्लोकापासून प्रारंभ केला.

विहित कर्मे विरक्त होऊन जो करतो तो मनुष्य योगाचा अधिकारी होतो. जो आपल्या जिव्हेचे सतत चोचले करत असतो, जो सतत आळस व निद्रा यांनी भरलेला असतो किंवा सर्वांचा निरोध करून तहान व भुकेला मारून अजिबात आहार घेत नाही असा दुराग्रहाने देहाला पीडा देणारा जो मनुष्य आहे त्याने योगाच्या वाटेला जाऊ नये.

ज्याचे खाणे व हिंडणे उचित, बेताचे, परिमीत, मोजके आहे, जो सर्व कर्मे मर्यादित करतो, ज्याची निद्रा व जागणे

हे आटोक्यात आहे. सर्व गोष्टी जो मर्यादा सांभाळून करतो त्याला हा योग सुखकारक असतो. १७ व्या श्लोकात ह्या सर्व विचारांची सुंदर मांडणी केली आहे.

**युक्ताहारविहारस्य युक्तचेष्टस्य कर्मसु ।**
**युक्तस्वप्नाव बोधस्य योगो भवति दुःखहा ।।**

माऊलींनी याचे सुंदर विवेचन केले आहे. असे युक्त व्यवहार जर केले तर एवढ्याने कफवातादिरसांचे योग्य प्रमाण राहून आरोग्यही ठीक राहते. या नियमित व परिमित आहार व इतर आचरणाने योगाचा विशेष अभ्यास न करणाऱ्यालासुद्धा सुखप्राप्त होते, मग योग्याची अवस्था किती श्रेष्ठ असेल?

असा योग आचरल्यावर शरीर हे पवित्र क्षेत्र होते. या शरीरात योग्याचे मन स्थिर व शांत राहते. माऊली अशा योग्याचे वर्णन करताना एक सुंदर उपमा देतात. असा हा योगयुक्त पुरुष निर्वात ठिकाणी तेवत राहणाऱ्या ज्योतीसारखा असतो.

दिनांक २५ डिसेंबर

**परतोनि पाठिमोरे ठाके । आणि आपणियांते आपण देखे ।**
**देखतखेंवो[1] वोळखे । म्हणे तत्त्व हे मी ।।६.३६६।।**

*शब्दार्थ - १) पाहताच तत्क्षणी*

**अर्थ** - ते (चित्त) ज्या वेळेला विषयांना सोडून परत अंतर्मुख होते आणि आपण आपल्या आत्मस्वरूपाला पाहते, आणि पाहिल्याबरोबर त्यास स्वरूपाची ओळख पटते व ते तत्त्व मी आहे अशा समजुतीवर ते येते.

## योग्याच्या चित्ताला आत्मस्वरूपाची ओळख होते

ज्ञानेश्वरांच्या सर्वोत्तम ओवीपैकी ही एक ओवी आहे. चित्ताला चैतन्याची भेट कशी होते याचे हे सुंदर वर्णन आहे.

नियम व योग ज्या वेळी एकत्र येतात त्या वेळी त्याचे मन क्षेत्रसंन्यास करून स्थिर होते. मनुष्याची इंद्रिये ही सदोदित बहिर्मार्गी असतात. आपल्या हितास जे जे चांगले असते ते या इंद्रियांना नेहमीच दुःखकारक वाटते. योगासारख्या कल्याणकारी मार्गांपासून ही इंद्रिये मनुष्याला खेचत असतात, पण अभ्यास, वैराग्य, तत्परता, परिमित व्यवहार यांमुळे ही इंद्रिये मनाला वश होतात, मग इंद्रियांमागून मन न जाता मनामागून इंद्रिये यायला लागतात. योगाभ्यासाने या इंद्रियांचा निरोध करणे शक्य आहे.

अशा वेळेला चित्त चैतन्याच्या भेटीला निघते.योगाच्या अभ्यासाने नियमन पावलेले चित्त विषयापासून परावृत्त होते. असे चित्त अंतर्मुख व्हायला लागते. होता होता हे चित्त, आपल्याच आत्मस्वरूपाला पाहायला लागते. पाहिल्याबरोबर त्यास आपल्या स्वरूपाची ओळख पटते. मग या चित्ताला ते तत्त्व मीच आहे असा बोध होतो.

हा आत्मबोध झाला की, या चित्ताचा चित्तपणा नाहीसा होतो. ज्या लाभाहून दुसरा कोणताही श्रेष्ठ लाभ नाही व ज्याला इंद्रिये केव्हाच जाणत नाहीत अशा अतिंद्रीय चैतन्यशक्तीला ते मन आपण स्वतः आपल्या ठिकाणी होऊन राहते.

असे मन आत्म्याशी समरस झाल्यामुळे सुखाच्या साम्राज्यावर आरूढ होते. असे चित्त मग निरतिशय सुखात लीन झाल्यामुळे परत वृत्तीवर येत नाही. अलौकिक, दिव्यानंद प्राप्त झाल्यामुळे असे चित्त देहालाही विसरते.





दिनांक २६ व २७ डिसेंबर

**भूतांचेनि अनेकपणे । अनेक नोहे[1] अंतःकरणे ।**
**केवल एकत्वचि माझे जाणे । सर्वत्र जो ।।६.३९४।।**
**म्हणोनि आपणपां[2] विश्व देखिजे । आणि आपण विश्व होईजे ।**
**ऐसे साम्यचि[3] एक उपासिजे । पांडवा गा ।।६.४०१।।**

*शब्दार्थ - १) नाही २) आपले ठिकाणी ३) समदृष्टी*

**अर्थ** - प्राण्यांच्या भेदाने ज्याच्या अंतःकरणात द्वैत उत्पन्न होत नाही आणि जो सर्व ठिकाणी माझे केवळ एकत्वच जाणतो. ।।६.३९४।।

म्हणून आपल्या ठिकाणी जगत् पाहावे आणि आपण जगत् व्हावे, अशा एका साम्याचीच, हे अर्जुना, तू उपासना कर.

## योगयुक्त, अद्वैतबोधाने जगाकडे पाहतो

चित्त जेव्हा आत्मस्वरूपाजवळ येते व आत्मस्वरूपाशी एकरूप होते तेव्हा त्या अद्वैत स्वरूपात द्वैत, नाहीसे होते. मग त्याला संपूर्ण विश्वच चैतन्यमय होते. असा मन आत्म्याच्या ठिकाणी स्थिर करणारा योगी पापांनी विरहित होतो व त्याला ब्रह्मसाक्षात्काररूपी आत्यंतिक सुख प्राप्त होते.

ज्याचे मन योगयुक्त झाले आहे, तो प्राणिमात्रांच्या ठिकाणी आत्म्यास पाहतो व आत्म्याच्या ठिकाणी प्राणिमात्र आहेत असे पाहतो ही समदृष्टी आल्यामुळे तो भगवंतात सर्वांना पाहतो व सर्वांत भगवंताला पाहतो. ऐक्याच्या, अद्वैताच्या श्रद्धेने भगवंताला सर्वत्र अनुभवून त्याचे भजन करतो. अलंकाराचे आकार जरी पुष्कळ असले तरी सोने एकच असते किंवा झाडाची पाने अनेक असली तरी मूळ एकच असते तसे सर्वत्र भगवंतच आहे याचा तो अनुभव घेतो.

ज्ञानेश्वरांनी या एकत्वाची महती संपूर्ण ज्ञानेश्वरीत गायिली आहे. यासाठी उपमा, उत्प्रेक्षा, रूपक अशा अलंकारांचा मुक्त वर्षाव केला आहे. ज्ञानेशांनी ज्ञानेश्वरीची सुरुवात आत्मरूपाने केली व शेवट विश्वात्मक रूपात केला आहे.

अशा श्रेष्ठ योग्याला सुखदुःखादि कर्मे अथवा पुण्यपापादि कर्मे यांच्यातील द्वैताचासुद्धा अनुभव येत नाही. हे समविषमभाव, बरे-वाईट सर्व काही हे आपले अवयवच आहेत अशी त्याची भावना होते.

त्याला हे सर्व त्रैलोक्यच आपण आहोत असे ज्ञान सहजच प्राप्त होते. म्हणून आपल्या ठिकाणी जगत् पाहावे आणि आपण जगत् व्हावे असा समदर्शनाचा योग त्याला प्राप्त होतो.

मीठ पाण्यात जसे एकरूप होते व आपले अस्तित्व नाहीसे करते तसा हा पुरुष परमात्म्याशी एकरूप होऊन 'मी-माझे' हे पूर्णपणे विसरून जातो. दिवा व प्रकाश हे जसे एकरूप असतात तसे भगवंताचे विश्वाशी एकरूपत्व आहे. वस्त्रात जसा तंतू सर्वत्र असतो तसा तो सर्व प्राणिमात्रात आहे. योगयुक्त अशा समबुद्धीने म्हणजे आत्मस्वरूप बुद्धीने पाहतो.

असा पुरुष देहधारी जरी असला तरी तो मनुष्यवेशातील ब्रह्मस्वरूपच असतो. म्हणून अर्जुना, असा साम्ययोग तू अंगी बाणवावा की, ज्यामुळे तू स्वतःच विश्व व्हावे व आपणातच विश्व पाहावे.

ॐ

दिनांक २८ डिसेंबर

तंव कृष्ण म्हणती साचचि[1] । बोलत आहासी ते तैसेचि ।
यया मनाचा कीर[2] चपळचि । स्वभावो गा ।।६.४१८।।

*शब्दार्थ - १) खरेच २) खरोखर*

**अर्थ** - तेव्हा कृष्ण म्हणाले, 'तू म्हणत आहेस, ते खरोखर तसेच आहे. या मनाचा स्वभाव खरोखर चपलच आहे.

## चंचल मन स्थिर कसे होईल?

भगवंताने यथासांग योगमार्ग समजावून सांगितला. मनाची साम्यावस्था, एकाग्रता, निर्विषयता वर्णन करून सांगितली. मनच बंधाचे व मोक्षाचे कारण आहे हेही अर्जुनाला पटले. मन संयमित, परिमित, नियमित झाले की, योग हाताशी आलाच असे समजावे हेही त्याला कळले.

पण अर्जुनाच्या मनात शंका उत्पन्न झाली. म्हणून अर्जुन म्हणाला, "ज्या मनाला साम्यावस्था प्राप्त करून घ्यावयाची ते मन स्वभावतःच अत्यंत चंचल आहे. या मनाच्या स्वभावापुढे आमचा टिकाव कसा लागणार? हे मन कसे व केवढे आहे याचा पत्ता लावू म्हटले तरी ते सापडत नाही. एरवी या मनाला वावरण्याला हे सर्व त्रैलोक्य अपुरे पडते. म्हणून हे असे कसे होईल की, माकडाला समाधी लागेल किंवा सोसाट्याचा वारा "थांब" म्हटल्याबरोबर थांबेल काय? जे मन बुद्धीला छळते व केलेला निश्चय तडीस जाऊ देत नाही, सारासार बुद्धीला भ्रमात पाडते. आपण स्थिर असलो तरी मन दाही दिशांना फिरत असते. ज्याला आवरू गेले असता ते जास्तच उसळते. असे मन आपला स्वभाव टाकून देईल काय?"

अर्जुनाच्या या प्रश्नावर भगवंतांनी उत्तर दिले, "अर्जुना, तुझे म्हणणे खरे आहे. चांचल्य हा मनाचा स्वभावच आहे. ते कधीही स्थिर राहत नाही. पण वैराग्याचा आधार घेऊन, मन अभ्यासाकडे वळवून त्याला स्थिर करता येते कारण की, या मनाची एक गोष्ट चांगली आहे, ती ही की, त्या मनाला ज्याची गोडी लावावी की, त्या अनुभवलेल्या गोडीच्या ठिकाणी ते सोकावते.

म्हणून अशा मनाला कौतुकाने आत्मानुभवाच्या सुखाची गोडी वारंवार दाखवित जावे. अशा उपायांनी मन योगाच्या ठिकाणी स्थिर राहते.

दिनांक २९ डिसेंबर

ऐसी निजपुण्याचिया जोडी । वाढिन्नली सर्वसुखाची कुळ[1]वाडी ।
तिये जन्मे तो सुखाडी[2] । योगच्युतु[3] ।।६.४४८।।

*शब्दार्थ - १) उदीम, व्यापार २) सुरवात ३) योगभ्रष्ट*

**अर्थ** - अशा रीतीने ज्या कुळात आपल्या पुण्याईच्या कमाईने सर्व सुखाचा व्यापार वाढला आहे, त्या कुळात तो योगभ्रष्ट सुखाने जन्म घेतो.

## योगभ्रष्टाला पुन्हा योग्यांच्या कुळात जन्म मिळतो

अर्जुनाला पुन्हा एक शंका आली. योगमार्गाने चालला असता योगप्राप्तीच्या आधीच जर मृत्यूने त्याला गाठले तर त्याला कोणती गती प्राप्त होते? असा प्रश्न अर्जुनाच्या मनात उद्‌भवला.



ॐ

भगवंताने याचेही उत्तर दिले. वास्तविक अभ्यासाच्या जलद गतीने जर चालले तर याच जन्मी मनुष्य योगयुक्त होऊ शकतो. पण तितक्या वेगाने जरी हा अभ्यास झाला नाही तरी तो काही वाया जात नाही. शुभ व कल्याणकारी कर्मे करणारा कोणीही दुर्गतीला जात नाही. इहलोकी अथवा परलोकी त्याचा नाश होत नाही.

तो योगभ्रष्ट पुण्यकर्म करणाऱ्यांच्या लोकाला जाऊन तेथे पुष्कळ वर्षे राहिल्यानंतर शुद्धाचरणी व वैभवशाली अशा कुळामध्ये पुन्हा जन्म घेतो किंवा योगी लोकांच्याच कुळामध्ये दुर्लभ असा जन्म घेतो.

अल्प वयातच त्याच्या ठिकाणी स्वरूपज्ञानाचा उदय होतो. ज्याप्रमाणे सूर्य उगवण्याच्या पूर्वी अरुणोदयाचा प्रकाश होतो. पूर्वजन्मात तयार झालेली बुद्धी त्याला अनुकूल असल्यामुळे त्याचे मनच सर्व विद्यांना प्रसवते आणि मग सर्व शास्त्रे आपोआप त्याच्या मुखातून निघतात.

असा योगी पुन्हा योगसिद्धी प्राप्त करतो व अत्यंत श्रेष्ठ अशा गतीला म्हणजे मोक्षाला जातो.

दिनांक ३० व ३१ डिसेंबर

अगा योगी जो म्हणिजे । ते देवांचा देव जाणिजे ।
आणि सुखसर्वस्व माझे । चैतन्य[1] तो ।।६.४८२।।
जया भजता[2] भजन भजावे । हे भक्तिसाधन जे आघवे ।
ते मीचि जाहलो अनुभवे । अखंडित ।।६.४८३।।

*शब्दार्थ - १) आत्मा २) भजन करणारा, भजन करणे व भजन करण्याचा ईश्वर, ही त्रिपुटी*

**अर्थ** - अर्जुना, योगी जो म्हणतात, तो देवांचा देव जाणावा आणि माझे सुखसर्वस्व व माझा आत्मा तो आहे ।।६.४८२।।

ज्या पुरुषाला भजन करणारा, भजन व भज्य अशी भक्ति साधनांची जी त्रिपुटी, ती सर्व अनुभवाने सदोदित मद्रूपच आहे. ।।६.४८३।।

## योगी हा भगवंताचे सुखसर्वस्व

तपी, ज्ञानी व कर्मी ह्यांच्यापेक्षा योगी श्रेष्ठ आहे. कर्मनिष्ठ, ज्ञानी व तपस्वी लोकांना तो पूज्य आहे. तो देहधारी जरी असला तरी तो ईश्वररूपच आहे. म्हणून भगवंत अर्जुनाला म्हणतात की, तू योगी हो.

"असा माझ्या ठिकाणी जडलेल्या अंतःकरणाने युक्त होऊन (मद्रूप होऊन) जो मनुष्य श्रद्धेने माझी भक्ती करतो, तो सर्व प्रकारच्या योग्यांपेक्षा श्रेष्ठ प्रकारचा योगी मला वाटतो," असे भगवंत म्हणतात.

"तो देवांचा देव जाणावा आणि माझे सुखसर्वस्व व माझा आत्मा तो आहे. ज्या पुरुषाला, भजन करणारा, भजन व भज्य अशी भक्तिसाधनांची जी त्रिपुटी, ती सर्व अनुभवाने सदोदित मद्रूपच आहे," असे यावर निरूपण करताना ज्ञानेश्वर म्हणतात.

अशा योगी व परमात्मा यांच्यातील प्रेमाचे वर्णन करणे अशक्य आहे असे माऊली म्हणते. त्यांच्या ऐक्य भावाला जर योग्य उपमा द्यायचीच असेल तर मी देह व तो आत्मा ही होय.

योग म्हणजे परमेश्वराच्या ठिकाणी चित्त स्थिर करून त्याचे परमात्म्याशी ऐक्य करणे होय. प्रेमद्वारा परमेश्वराच्या ठिकाणी चित्तवृत्ती स्थिर करणे ह्याला भक्तियोग म्हणतात. कर्मद्वारा झाली तर कर्मयोग व ज्ञानद्वारा झाली तर ज्ञानयोग.

सगुण परमेश्वराच्या निस्सीम प्रेमाने केलेल्या भक्तियोगात जाणीवरहित निर्विकल्प ऐक्य होत असल्याने व इतर योगात जाणीवसहित ऐक्य होत असल्यामुळे, सर्व योग्यांमध्ये भक्तियोगी युक्ततम होय असे भगवान म्हणतात आणि ज्ञानेश्वरमाऊलीने यावरील निरूपणात ''मी देह तो आत्मा'' या चरणाने तोच भाव दाखविला आहे.

म्हणून ज्याने आत्मस्वरूपाच्या ठिकाणी चित्त स्थिर करून ब्रह्मसुख अनुभविण्याचे जेवढे मार्ग आहेत, त्या मार्गाने जाणाऱ्या सर्व योग्यांपेक्षा, सगुण भगवंताच्या ठिकाणी ज्याचे प्रेम बसले व त्या प्रेमानेच सर्व काही साधते अशी श्रद्धा ठेवून जो अहर्निश भगवंताचे भजन करतो त्याचे चित्त अत्यंत निर्विकल्प अशा साम्यदशेला प्राप्त होत असल्यामुळे, तो सगुणभक्त सर्व योग्यांत श्रेष्ठ व भगवंताशी अत्यंत एकरूप झालेला होय.

।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।





# समारोप

श्री ज्ञानेश्वरांच्या कृपेने 'दैनंदिन जीवनात श्री ज्ञानेश्वरी' हा ३६५ ओव्यांचा भावार्थ दोन खंडात प्रसिद्ध झाला. दुसरा खंड हा आषाढीच्या पवित्र दिवसात प्रसिद्ध झाला हे मी माझे परमभाग्य समजतो. पंढरीच्या वाटेवर भगवंताच्या दर्शनासाठी लाखो भागवतांची पाऊले पडत आहेत. भक्तीचा महापूर ओसंडून वाहतो आहे. भक्तीने सर्वांची हृदये भरून आली आहेत.

अशा वेळी या ज्ञानरूपी ईश्वराच्या ज्ञानेश्वरीतील निवडक ३६५ ओव्या म्हणजे; ३६५ दिवसांची ज्ञानसागरातून केलेली ही यात्राच आहे. ज्ञानाची पताका घेऊन, माऊलींचे हृद्गत जाणण्यासाठी निघालेली ही दिंडीच आहे.

तशी ही यात्रा केवळ ३६५ दिवसांची नाही. ही जीवनभरची यात्रा आहे. ज्ञानेश्वरी हा आपला श्वास झाला पाहिजे. जीवन कृतार्थ करण्याचे ज्ञान या नऊ हजार ओव्यांत आहे. ३६५ ओव्यांतून ही दिशा मिळावी हा माफक हेतू यात आहे. या दोन खंडातून संपूर्ण ज्ञानेश्वरीचे सारभूत तत्त्वज्ञान मांडण्याचा प्रयत्न केला आहे. हे वाचून संपूर्ण ज्ञानेश्वरी वाचण्याची, अभ्यासण्याची जिज्ञासा निर्माण व्हावी; यात या लेखनाचे साफल्य आहे.

गेली १५ वर्षे ज्ञानेश्वरीवर माझी शेकडो प्रवचने झाली. अनेकांनी अशा सारभूत ओव्यांची पुस्तकरूपाने मागणी केली होती. मीही तसा संकल्प केला होता. या संकल्पाची भगवद्कृपेने पूर्तता झाली.

ज्ञानेशांनी भक्तीचे सर्व पैलू यात उलगडून दाखविले आहेत. ज्ञानमार्ग, योगमार्ग, कर्ममार्ग हे तिनही मार्ग ज्ञानेश्वरांच्या भक्तिपंथाला येऊन मिळाले आहेत. सर्व भक्तांना त्यांनी केलेले मार्गदर्शन क्रांतदर्शी आहे. ते सर्वार्थाने पायाभूत आहे.

प्रत्येकाने हे समजून घेऊन आपली वाट आपणच शोधावी. फक्त तो माऊलींनी सांगितलेला राजमार्ग असावा. हा शोधण्यात भगवंताने सर्वांना सुबुद्धी द्यावी ही प्रार्थना.

* * * * *



# दैनंदिन जीवनात श्री ज्ञानेश्वरी

## लेखक - परिचय

| | | |
|---|---|---|
| नांव | : | प्रा. दत्तात्रय नारायण दुभाषी |
| जन्म | : | १९ जानेवारी १९४१ बेळगांव |
| शिक्षण | : | १) एम.ए. (इंग्रजी - संस्कृत) २) एम. ए. (मराठी) |
| व्यवसाय | : | पत्रकार व माध्यमिक शिक्षक म्हणून १० वर्षे व महाविद्यालयीन प्राध्यापक म्हणून ३० वर्षे अशी एकूण ४० वर्षे सेवा. गोपाळकृष्ण गोखले कॉलेज, कोल्हापूर येथून इंग्रजी विभागप्रमुख म्हणून निवृत्त. |
| छंद व आवड | : | • सतत भ्रमण - ५ वेळा अमेरिका - कॅनडा येथे प्रदीर्घ वास्तव्य. युरोप - मिडलईस्ट इ. ठिकाणांचा प्रवास.<br>• वक्तृत्व - नाट्य - लेखन यांच्या विशेष आवडीमुळे वर्तमानपत्रे व मासिकांतून अनेक विषयांवर लेखन व व्याख्याने.<br>• निसर्गात पदभ्रमणाची विशेष आवड.<br>• योग-प्राणायाम यावर प्रबोधन - व्याख्यान व प्रात्यक्षिक. |
| सामाजिक कार्य | : | • श्री ज्ञानेश्वरी, तुकाराम गाथा अशी संतसाहित्यावर व भगवद्गीतेवर गेली १५ वर्षे सतत प्रवचने व व्याख्याने यातून समाजप्रबोधन.<br>• गीता व ज्ञानेश्वरी यावरील लेखमाला प्रसिद्ध.<br>• श्रीमद भगवद्गीतेचे एकूण पाच खंड प्रकाशित.<br>• ईशावास्योपनिषद्, केनोपनिषद् व कठोपनिषद् ही तीन उपनिषदे प्रकाशीत.<br>• तरुणांनो हे तुमच्यासाठी - हे तरुणांसाठी पुस्तक प्रसिद्ध |
| जीवनध्येय | : | • अध्यात्म व तत्त्वज्ञान याचा प्रसार व प्रचार. |
| संपर्क | : | 'हरिप्रसाद', सरदार पार्क, ९०५/१ ओ, प्लॉट नं. ३, देवकर पाणंद, कोल्हापूर - ४१६०१२.<br>दूरध्वनी : ०२३१ - २३२४०३९, भ्रमणध्वनी : ९८२२५१८२४८ |

---





केशव भिकाजी ढवळे

श्री समर्थ सदन, पहिली भटवाडी, मुंबई ४०० ००४.